







नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



ISSN 2456-656X

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

एप्रिल ते जून २०२०




२७ मे २०२०

## मसाप ११४ वा वर्धापन दिन



# मसापच्या ११४ व्या वर्धापन दिनानिमित्त दीपप्रज्वलन

महाराष्ट्र साहित्य परिषदेचा वर्धापन दिन म्हटलं की परिषदेच्या टिळक रस्त्यावरील वास्तूला केली जाणारी विद्युत रोषणाई... आकर्षक रांगोळ्या... इतर भाषेतील नामवंत साहित्यिकांच्या हस्ते पुरस्कार स्वीकारण्यासाठी नवोदित आणि मान्यवर लेखकांची उपस्थिती... सनईच्या सुरात साहित्यरसिकांचे मोगऱ्याची फुले देऊन आणि अत्तर लावून केले जाणारे स्वागत... असे चित्र असते. यावर्षी कोरोना विषाणू संसर्गाच्या पार्श्वभूमीवर परिषदेतर्फे प्रसिद्ध हिंदी साहित्यिक अशोक वाजपेयी यांच्या उपस्थितीत होणारा वर्धापन दिन कार्यक्रम रद्द करण्यात आला. परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहात मुखपट्टी लावून आणि सुरक्षित अंतर राखत मसापचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांच्या हस्ते फक्त दीपप्रज्वलन करण्यात आले. यावेळी प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार, कार्यवाह प्रमोद आडकर, उद्धव कानडे, बंडा जोशी आणि दीपक करंदीकर उपस्थित होते.

प्रा. मिलिंद जोशी म्हणाले, 'परिषदेला साहित्याभिमुख आणि लोकाभिमुख करताना परिषदेने अनेक दर्जेदार कार्यक्रम रसिकांना दिले त्याचबरोबर मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठी केलेला पाठपुरावा, दिल्लीत जाऊन उठविलेला आवाज, मराठी भाषा शिक्षणाचा कायदा सक्तीचा व्हावा यासाठी घेतलेला पुढाकार, मुंबईत झालेल्या धरणे आंदोलनात नोंदविलेला लक्षणीय सहभाग, संमेलन अध्यक्षपद सन्मानाने दिले जावे याच्या घटना बदलासाठी घेतलेली आग्रही भूमिका, गेली पाच वर्षे साहित्य सेतूच्या सहकार्याने घेतलेल्या लेखन कार्यशाळा या गोष्टी परिषदेच्या कृतिशीलतेच्या निदर्शक आहेत.

कोरोना संकटाचे सर्वच क्षेत्रावर दूरगामी परिणाम होणार असून साहित्यक्षेत्रही त्याला अपवाद असणार नाही. भविष्यात साहित्यसंस्था, लेखक, प्रकाशक, संपादक, चित्रकार, मुद्रितशोधक, छपाई प्रक्रियेतील सर्व घटक, ग्रंथ वितरक आणि ग्रंथ विक्रेते यांनी परस्परांशी सतत संवाद साधून सामूहिक प्रयत्नांतून येणाऱ्या आव्हानांचा सामना केला पाहिजे मसाप त्यासाठी पुढाकार घेईल.

गेल्या पाच वर्षांपासून साहित्य सेतूच्या सहकार्याने परिषद तंत्रस्नेही झाली असून यापुढे गर्दी टाळण्यासाठी परिषदेचे कार्यक्रम रसिकांना यू-ट्यूब आणि फेसबुक या माध्यमांतून घरबसल्या पाहता येतील. भविष्यातील सर्व आव्हाने पेलण्यास परिषद समर्थ आहे.'






महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र.३७०, एप्रिल ते जून २०२०

संपादक

**डॉ. पुरुषोत्तम काळे**

संपादन समिति

**डॉ. मनोहर जाधव । डॉ. नीलिमा गुंडी**
**डॉ. भास्कर ढोके । डॉ. रणधीर शिंदे**
**डॉ. वर्षा तोडमल**

प्रकाशक

**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह

**महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.
दूरभाष । ०२०-२४४७५९६३
संकेतस्थळ । www.masapapune.org
ई-मेल । masaparishad@gmail.com

कार्यालयाची वेळ ।
सकाळी ९.०० दुपारी १२.००
दुपारी ४.३० ते रात्री ८.००

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत






▮ मुद्रक-प्रकाशक
प्रकाश पायगुडे
प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०

▮ जाहिरात व्यवस्थापक
वि. दा. पिंगळे
९८८१२३५०३३

▮ सपादकीय संयोजन
संदीप खाडे

▮ अक्षरजुळणी व सजावट
लक कलाकल्प

▮ मुखपृष्ठ
जयदीप कडू

▮ मुद्रितशोधन
आरती देवगांवकर

▮ मुद्रणस्थळ
एस. ए. प्रिंटर्स, एल. एल. पी.
फ्लॅट नं. ५, ३ रा मजला,
सिद्धीविनायक अपा.,
शिवदर्शन, पुणे ४११००९

मूल्य : १५ रुपये

▮ प्रकाशन क्र. ३७०
एप्रिल ते जून २०२०



# अंतरंग

मसाप पत्रिका
एप्रिल ते जून २०२० अंक

❖ मानवी इहवादी सौंदर्यसिद्धांत । यशवंत मनोहर । ५
❖ रत्नाकर मतकरी : सव्यसाची अष्टमार्गी । विजय तापस । २४
❖ वाङ्मयेतिहासाचे अध्ययन व अध्यापन ।
प्रा. डॉ. राजाराम भैलुमे । २८
❖ अरुणा ढेरे यांच्या समग्र साहित्याचा अभ्यास : अरुणोदय ।
डॉ. चंद्रकांत भगवंत पोतदार । ३२
❖ महाभारतातील दोन कृष्ण । भिवा कांबळे । ३५
❖ अण्णाभाऊ साठे यांच्या साहित्यातील स्त्री जाणिवा -
डॉ. वृंदा सुभाष कौजलगीकर । ४१
❖ उपेक्षितांचे चित्रण करणारे कथालेखक अण्णाभाऊ साठे ।
सोमनाथ महादेव दडस । ४६
❖ पिढीजात : शासकीय व्यवस्थेचं समंजस उत्खनन ! ।
पी. विठ्ठल । ५०
❖ ज्ञानाचे 'अग्निहोत्र' व्रत आचरणारा ज्ञानतपस्वी-
डॉ. अशोक कामत । दीपक करंदीकर । ६०
❖ डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे शंभर वर्षांपूर्वीचे 'मूकनायक'-
डॉ. हरिशंद्र निर्मळे । ६६
❖ यशवंतराव चव्हाण यांच्या भाषणांची वाङ्मयीन गुणवत्ता ।
डॉ. भास्कर ढोके । ७३
❖ आत्मशोधाकडून सत्यशोधाकडे जाणारी कादंबरी ।
राजीव जोशी । ७७
❖ 'एका स्वर्गस्थ देशाच्या गोष्टी'ची उद्बोधक गोष्ट-
प्रा. डॉ. सुधाकर शेलार । ८३
❖ लेखनातील क्रांतिकार्य । प्रा. डॉ. गणेश राऊत । ८८
❖ बाईपणाचा ताळेबंद- स्मरणवेळा । डॉ. संजय नगरकर । ९१
❖ आत्मभानोत्तर काळाचे हुंकार- फक्त सैल झालाय दोर ।
डॉ. फुला बागूल । ९८



अनुक्रमणिका



## संपादकीय

# काळ तर मोठा कठीण आला...

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या एप्रिल ते जून २०२० च्या अंकाचे संपादकीय लिहिताना आज आषाढी एकादशीच्या दिवशी महाराष्ट्राचे मुख्यमंत्री मा. उद्धव ठाकरे यांनी पंढरीच्या विठ्ठलाकडे 'जगातून करोनाची महासाथ नाहीशी होऊ दे,' ही प्रार्थना केली. हीच भावना सर्व महाराष्ट्रीय जनतेच्या मनात आहे. चार वेळा टाळेबंदी आणि आता टप्प्या-टप्प्याने सार्वजनिक व्यवहार पूर्वपदावर आणताना करोनाबाधितांची संख्या वाढतच आहे. महाराष्ट्राचे दैवत विठ्ठलाची वारी रद्द करून संतांच्या पादुका एस.टी ने पंढरपूरला नेण्यात आल्या. गणेशोत्सवावरदेखील निर्बंध येणार आहेत. सारेच सार्वजनिक जीवन ठप्प झाले. जागतिकीकरणाची चक्रे उलटी फिरवणारी ही कोविड-१९ विषाणूची महासाथ संपुष्टात येण्याची कोणतीही लक्षणे सध्या तरी आढळून येत नाहीत. या महासाथीचा मुकाबला करताना अनेक आरोग्य कर्मचाऱ्यांचा, पोलीस दलातील कर्मचाऱ्यांचा आणि इतर आस्थापनांतील कर्मचाऱ्यांचा मृत्यू झाला. हातावर पोट असणाऱ्या लाखो मजुरांचे फाळणीनंतरचे सर्वांत मोठे स्थलांतर पाहायला मिळाले. यामध्ये मृत्यू पावलेल्या दुर्दैवी मजुरांना, कोविड-१९ महासाथीचा सामना करताना मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांना आणि गलवान खोऱ्यात चीनच्या घुसखोरीला रोखताना हौतात्म्य पत्करलेल्या शूर सैनिकांना भावपूर्ण श्रद्धांजली. ज्येष्ठ शिक्षणतज्ज्ञ श्रीमती लीलाताई पाटील यांचे नुकतेच निधन झाले. त्यांना म. सा. परिषद व पत्रिकेतर्फे भावपूर्ण श्रद्धांजली.

या करोना विषाणूने मराठी साहित्यविश्वावर आघात केला. मराठीतील सर्वोत्तम व्यावसायिक नाटककार, गूढ कथाकार आणि बालरंगभूमीला उर्जितावस्था आणणारे साहित्यिक विचारवंत रत्नाकर मतकरी यांचा मृत्यू करोना विषाणूसंसर्गाने झाला. ही अतिशय दुःखद घटना समस्त मराठी साहित्यविश्वाला अतिशय वेदनादायी आहे. मा. रत्नाकर मतकरी यांना महाराष्ट्र साहित्य पत्रिका आणि म. सा. परिषदेतर्फे भावपूर्ण श्रद्धांजली.

या करोना महासाथीमुळे सर्वांना आपापल्या घरात बसावे लागले. सार्वजनिक कार्यक्रम आणि समारंभ रद्द करावे लागले. या सार्वजनिक टाळेबंदीला साहित्यविश्वही अपवाद नाही. महाराष्ट्र साहित्य परिषदेचा वर्धापन दिन आणि विविध पारितोषिक वितरणाचा कार्यक्रम रद्द करावा लागला. कार्यकारिणीची सभाही अनिश्चित काळाकरिता पुढे ढकलावी लागली. परिषदेत होणारे विविध कार्यक्रमही रद्द झाले. जानेवारी ते मार्च २०२० चा म. सा. पत्रिकेचा अंक छपाईस जात असताना पोस्ट खात्याची वितरणव्यवस्था बंद पडल्याने अंक छापता आला नाही. परिस्थितीत सुधारणा होऊन ती पूर्वपदावर येईल याची काही काळ वाट पाहिली; परंतु तसे न घडल्याने अंक ई-अंक स्वरूपात सर्वांना ई-मेल करावा, असे ठरवून तो परिषदेच्या संकेत स्थळावर प्रकाशित करण्यात आला. हा ही अंक ई-अंक स्वरूपातच निघेल. म.सा. पत्रिकेमध्ये विविध शाखांची कार्यवृत्ते प्रकाशित होत असतात. निर्बंधामुळे शाखांचेही कार्यक्रम होऊ शकलेले नाहीत. त्यामुळे या अंकात कार्यवृत्ते दिलेली नाहीत.



अनुक्रमणिका

'पुनश्च हरिओम' म्हणून सामाजिक व्यवहार पूर्ववत करण्याच्या प्रयत्नांना करोनाबाधितांच्या वाढत्या संख्येने खीळ बसते आहे. शाळा-महाविद्यालये, ग्रंथविक्री करणारी दुकाने बंद आहेत. महाजालावरून ग्रंथविक्रीला चालना मिळावी. पुस्तकालये योग्य ती काळजी घेऊन उघडायला हवीत. करोना विषाणूचा नाश होईल या भ्रमात राहण्यापेक्षा प्रतिबंधात्मक काळजी घेऊन जीवन पूर्ववत करण्याचे प्रयत्न व्हायला हवेत. किमान वर्षाअखेरीपर्यंत लस उपलब्ध होईल, असा एक अंदाज आहे.

करोना विषाणूच्या या महासाथीचा मराठी साहित्यावर, साहित्यविश्वावर मोठाच परिणाम होत आहे. अभूतपूर्व अशा या संकटाचे चित्रण मराठी साहित्यात विशेषतः कथात्म साहित्यात कसे उमटेल हे पाहणे औत्सुक्याचे ठरावे. साठोत्तरी, नव्वदोत्तरी अशा संज्ञा मराठी साहित्यात असताना वेबिनार्स घेऊन 'करोनोत्तरी मराठी साहित्य' कसे असेल याचे अंदाज वर्तवले जात आहेत. या चर्चा कितीही उत्साहाने केल्या जात असल्या तरी सद्यकालीन भयावह वास्तवाचे प्रतिरूपण आणि त्याचे साहित्यविश्वावर होणारे परिणाम याचा द्रष्टेपणाने वेध अपवादात्मकरीत्याच घेतला गेला. ही निराशाजनक, भयावह आणि अनिश्चित परिस्थिती उत्तम साहित्यनिर्मितीला नक्कीच प्रेरणा देईल. मुख्य म्हणजे ही परिस्थिती बदलून सारे पूर्ववत होईल असा आशावाद त्यातून नक्कीच प्रगट होईल असा विश्वास वाटतो.

या अंकात ९व्या अण्णाभाऊ साठे साहित्य संमेलनाचे अध्यक्ष यशवंत मनोहर यांनी अध्यक्षपदावरून मांडलेल्या विचारांचा दीर्घ लेख 'मानवी न्यायाचा इहवादी सिद्धांत' हा विचारप्रवर्तक आहे. प्रा. विजय तापस यांचा रत्नाकर मतकरींवरील आदरांजलीपर लेख मतकरींच्या साहित्यिक व्यक्तिमत्त्वाचा परामर्श घेणारा आहे. अण्णाभाऊ साठे यांच्या जन्मशताब्दीनिमित्ताने त्यांच्या साहित्यावरील दोन लेख, मराठीतील बृहद्कादंबऱ्या पिढीजात आणि सातपाटील कुलवृत्तांत यावरील पी. विठ्ठल आणि राजीव जोशी यांचे समीक्षा लेख ही या अंकाची वैशिष्ट्ये आहेत. यशवंतराव चव्हाण यांच्या भाषणांची वाङ्मयीन गुणवत्ता हा प्रा. भास्कर ढोके यांचा लेख यशवंतराव चव्हाण साहेबांच्या भाषा, साहित्य, कला यांविषयीची मर्म दृष्टी प्रगट करतो. डॉ. सुधाकर शेलार यांचा 'स्वर्गस्थ देशाच्या गोष्टी' या संजय कळमकरांच्या विनोदी कादंबरीवरील लेख या कादंबरीविषयी उत्सुकता निर्माण करणारा आहे. ज्येष्ठ लेखिका प्रतिभा रानडे यांच्या लेखसंग्रहावरील डॉ. संजय नगरकर यांचा लेख आणि क्रांतिकारकांचे चरित्रकार विष्णू श्रीधर जोशी यांच्यावरील 'लेखनातील क्रांतिकार्य' हा डॉ. गणेश राऊत यांचा लेख अभ्यासपूर्ण आहे. पद्मरेखा धनकर यांच्या 'फक्त सैल झालाय दोर' या काव्यसंग्रहाचे परीक्षण धनकर यांच्या कवितेतली सौंदर्यस्थळे दर्शविणारे आहे. संतसाहित्याचे अभ्यासक, ख्यातकीर्त लेखक आणि महाराष्ट्र साहित्य परिषदेचे माजी पदाधिकारी डॉ. अशोक कामत यांच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाचा आणि कर्तृत्वाचा परिचय करून देणारा दीपक करंदीकर यांचा लेख कामतांच्या विद्वत्तेची आणि व्यासंगाची साक्ष पटवतो. प्राचार्य डॉ. निर्मळे यांचा 'मूकनायक' वरील लेख अभ्यासपूर्ण आहे.

नेहमी पृष्ठसंख्येचे बंधन असल्याने लेखांची संख्या आणि व्याप्ती यावर मर्यादा येत असत; परंतु हा ई-अंक असल्याने यामध्ये काही दीर्घ लेख घेत आहोत. करोना महासाथीच्या काळामध्ये आपण सर्वांनी आरोग्याची काळजी घ्यावी. हा कठीण काळ नक्कीच जाईल, निराशेचे मळभ मनावर साचू देऊ नये. वाचन, लेखन आणि चिंतन करून साहित्यनिर्मिती व्हावी यासाठी सर्वांना मनःपूर्वक शुभेच्छा!

कोविड-१९ च्या महासाथीत पिंपरी चिंचवड महाराष्ट्र साहित्य परिषद शाखेने ३१,०००/- रु. मुख्यमंत्री सहाय्यता निधीला दिले आणि नाशिक रोड शाखेने टाळेबंदीत वाचन चळवळीला चालना देण्याचे तसेच गरजुंना अन्नदान करण्याचे अभिमानास्पद कार्य केले या दोन्ही शाखांच्या पदाधिकाऱ्यांचे हार्दिक अभिनंदन!

या अंकावरील प्रतिक्रियांच्या आणि सूचनांच्या प्रतीक्षेत आम्ही आहोत, त्या जरूर द्याव्यात ही विनंती.

डॉ. पुरुषोत्तम काळे.
चलभाषः ९४०४९३७७१०
ई-मेलः purshottamdkale@gmail.com

---

हा अंक मसापच्या www.masapapune.org या संकेतस्थळावर उपलब्ध आहे.

❖❖

# मानवी न्यायाचा इहवादी सौंदर्यसिद्धान्त

नवव्या अण्णाभाऊ साठे
साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून
ख्यातकीर्त समीक्षक आणि विचारवंत
मा.डॉ. यशवंत मनोहर
यांनी मांडलेल्या विचारांचे लेखरूप.

■■ यशवंत मनोहर

प्रथम आपण अण्णाभाऊ नावाच्या युगसाक्षी प्रतिभेला आदरपूर्वक अभिवादन करू. कॉ. अण्णाभाऊ साठेंच्या नावाने भरणारे हे नववे साहित्य संमेलन आहे आणि अमरावती या प्रज्ञा-प्रतिभांचा सन्मान करणाऱ्या आणि स्वतःही वाङ्मयीन कर्तृत्वाने फुलणाऱ्या प्रतिभासर्जक नगरीत हे संमेलन भरत आहे, ही अमरावतीच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाला अधिकच तेजोमय करणारी बाब आहे.

यावेळी आपण सर्वच हे संमेलन सुरू करणाऱ्या कॉम्रेड गोविंदराव पानसरे यांना धन्यवादही देऊ आणि त्यांना विनम्र अभिवादनही करू. कॉम्रेड अण्णाभाऊ साठे साहित्यसंमेलन हे केवळ साहित्यसंमेलन नाही. एक मोठे क्रांतिकारी सामाजिक अभिसरण अभिप्रेत असलेले ते सामाजिक समेलनही आहे. गोविंदराव पानसरे यांना संमेलनाच्या निमित्ताने एक सर्वव्यापी राजकारण उभे करायचे होते. एका क्रांतिकारी वर्गभानाची निर्मिती हा उद्देश या संमेलनाच्या पाठीशी उभा आहे. अण्णाभाऊ साठे साहित्य संमेलन आता परिवर्तनवादी मराठी माणसाच्या जीवनात एक चळवळ झालेले आहे. एक आंदोलन झालेले आहे. समाजाला क्रांतिकारी करणारा, आधुनिक करणारा आणि राजकीय वर्गभान प्रखर करणारा उपक्रम सुरू केल्याबद्दल आदरणीय कॉ. गोविंद पानसरे यांच्या प्रेरक स्मृतीला आपण सर्वच अभिवादन करू.

गोविंदराव पानसरे मला सर्वच दृष्टींनी वडील भावासारखे होते. 'शिवाजी कोण होता?' या त्यांच्या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीचे प्रकाशन नागपूरच्या त्या वेळच्या धनवटे रंगमंदिरात झाले होते. या प्रकाशन समारंभाचे मला त्यांनी अध्यक्ष केले होते. तेव्हापासून आम्ही एका जागतिक Radical बौद्धिक कुटुंबाचे सभासद झालो. ते केव्हाही नागपुरात आले की, माझ्याकडे आल्याशिवाय राहत नसत. तास-दोन तास चर्चा करीत. एकदोनदा आम्ही एकत्र जेवण केले. चर्चा कधी थांबत नसत. सोलापूरच्या विद्रोही संमेलनात माझे पहिल्याच दिवशी विशेष व्याख्यान होते आणि दुसऱ्या दिवशीच त्यांच्या हस्ते समारोप होता. दोन्ही दिवस आम्ही एकत्र होतो. चर्चा थांबत नव्हत्या. किशोर ढमालेंना त्यांनी मी कोणते सूत्र मांडू हे विचारले. आमच्या चर्चा विद्रोहींना एकत्र आणण्याच्या संदर्भात प्रामुख्याने झाल्या. एकदा त्यांनी त्यांच्या मुलाच्या (स्मृतिशेष कॉ. अविनाश) नावाने चालणाऱ्या व्याख्यानमालेत मला व्याख्यान द्यायला कोल्हापूरला बोलावले. ते स्वतः अध्यक्षच होते या व्याख्यानाचे. नागपूरच्या अण्णाभाऊ साठे संमेलनाचे एकनाथराव आव्हाड अध्यक्ष होते. मला गोविंदरावांनी समारोपाला बोलावले. मी घेतलेल्या भूमिकेचे मोल त्यांनी त्याहीवेळी जाहीरपणे मांडले. अनेकदा ते मला फोन करीत. बाबासाहेबांच्या एखाद्या विधानाचा संदर्भ विचारीत आणि मार्क्स- आंबेडकर साम्यस्थळांच्या चर्चा आमच्या चालत. तत्त्व आणि तपशील यांच्या जागा या शहाण्या माणसाला माहीत होत्या. साधनांचा तपशील बाजूला

करून साध्याच्या आणि ध्येयाच्या दिशेने आमची चर्चा जात असे. मला त्यांनी 'विचारधन' ची प्रत फोन करून मागितली होती. ती मी एका व्यक्तीकडून झेरॉक्स करून घेतली; पण त्यांना ती पाठवायच्या आधीच त्यांचे जीवन धर्मांधांनी संपवले. अजून विचारधनची प्रत माझ्याजवळ आहे.

ते आज आपल्यात नाहीत. ते आज हयात असते, तर अण्णाभाऊ साठे साहित्य संमेलनाचे अध्यक्ष त्यांनीच मला केले असते आणि गौरवाने ते संमेलनात हजरही राहिले असते. माझ्यासाठीही तो अपार गौरवाचा भाग असला असता. श्रमिक प्रतिष्ठानची सर्व पुस्तके ते मला पाठवित. गोविंदराव पानसरे म्हणजे आमच्यातला एक शहाणा मनुष्य. निराग्रही वृत्तीने पुढल्या माणसाला परिवर्तनाशी जोडून घेणारा मनुष्य. परिवर्तनरोधकांचा बौद्धिक पराभव करण्यासाठी, परिवर्तनाच्या तर्कशुद्ध विचाराएवढे. मोठे हत्यार नाही हा त्यांच्या या आयुष्याचा निष्कर्ष आपणा सर्वांनाच आदरणीय आहे. आपण सर्वच त्याना आणि त्यांच्या निष्कर्षाला अभिवादन करू.

अण्णाभाऊ साठे संमेलन म्हणजे व्यवस्था परिवर्तनाची चळवळ आहे. या चळवळीला गोविंदरावांनी एक झगमगते व्यक्तिमत्त्व प्राप्त करून दिलेले आहे. सर्वच उपेक्षितांना आणि शोषिताना सामाजिक न्यायाच्या प्रस्थापनेसाठी कळकळीची साद घालणारे एक विधायक विचारपीठ, प्रबोधनपीठ आणि प्रज्ञा-प्रतिभावंतांना बदललेल्या परिस्थितीत त्यांच्या बदलत्या जबाबदारीची गंभीरपणे जाणीव करून देणारे प्रेरणापीठ म्हणून आदरणीय असलेल्या या संमेलनाचे अध्यक्ष करून माझा सन्मान करणाऱ्या उत्तमराव कांबळे, प्रा. प्रसेनजित तेलंग, काशीनाथ बऱ्हाटे आणि त्यांचे सर्व संयोजक सहकारी यांच्याप्रति कृतज्ञता व्यक्त करतो.

कॉ. अण्णाभाऊ साठे यांच्या नावाने आयोजिलेल्या या साहित्यसंमेलनात मी अण्णाभाऊ साठे यांच्यासंबंधी फार बोलणार नाही. संमेलनात तत्त्वतः तशी गरजही नसते. मी आजच्या समाजाच्या जखमांसंबंधी बोलेन. प्रस्थापित व्यवस्थेचे, आजच्या असत्यसत्ताक व्यवस्थेच्या साहित्यसंस्कृतीच्या राजकारणाचे स्वरूप संक्षेपाने आपणासमोर मांडावे आणि आजच्या वैश्विक संदर्भात आणि त्यातील सत्तासंघर्षाच्या धुमश्चक्रीत आपल्या आणि जगातीलही अन्यायग्रस्तांच्या मुक्तीचे, मुक्तीच्या साहित्याचे आणि संस्कृतीचे राजकारण विशद करण्याचा प्रयत्न करावा, असे मला वाटते.

कॉ. अण्णाभाऊ साठे या प्रतिभावंताबद्दल मला अतोनात आदर आहे. या आदराचे पहिले कारण केवळ ४९ वर्षांच्या आयुष्यात या प्रतिभावंताने केलेल्या लेखनाचा अफाटपणा हे आहे. जवळजवळ पन्नास-पंचावन्न पुस्तके त्यांनी लिहिली. ही पुस्तके काही आकाशातून पडली नाहीत वा जमिनीतून उगवली नाहीत. ती अण्णाभाऊंनी लिहिली. वाचन करणे, चिंतन करणे आणि त्या त्या वेळी कथेची, कादंबरीची, पोवाड्याची, वगनाट्याची वा इतरही लेखनाची निर्मिती निश्चित करणे, तिच्यातले टप्पे-वळणे निश्चित करणे, शेवट निश्चित करणे, ही प्रक्रिया सोपी नाही. काय मांडायचे, पात्रे कशी उभी करायची, त्यांच्या माथ्यात काय द्यायचे या सर्वच गोष्टींचा आराखडा डोळ्यांपुढे जिवंत उभा करायचा आणि नंतर लेखन करायचे हे सर्व कष्टाचे काम आहे. ही इतकी पुस्तके लिहायला त्यांना तासंतास बसावे लागले. जेवणाकडे, प्रकृतीकडे, आरामाकडे दुर्लक्ष करावे लागले. शिवाय लिहिताना नेमकी, प्रवाही आणि परिणामशाली भाषा तयार करणे हे काम अफाट कष्टांचेच आहे. हे असे लेखन माणसातली प्रतिभा जिद्दीला पेटल्याशिवाय होत नाही. अण्णाभाऊंनी हे अफाट लेखन करण्यासाठी घेतलेल्या कष्टांना, त्यांच्या झपाटलेपणाला आणि अख्ख्या जीवनासाठी स्वतःच्या जीवनाकडे दुर्लक्ष करणाऱ्या त्यांच्या बेफाट वृत्तीला मी वंदनच करतो.

अण्णाभाऊ म्हणजे त्यांच्याभोवती परंपरेने रचलेले तुरुंग तोडणारे वादळ! अभावाशिवाय, अंधाराशिवाय आणि उपेक्षेशिवाय त्यांच्या आयुष्याच्या प्रारंभाजवळ काहीही नाही. अण्णाभाऊ नावाची ही पहाट नकारात उगवली. ही वाट निखारे तुडवत सरकत होती. अशाही वेळी अण्णाभाऊंनी थांबण्याची चूक कधी केली नाही. अभावाचे ऐकले नाही. अडचणींपुढे ते कधी झुकले नाहीत आणि तुरुंगांच्या भिंतीपुढे गुडघे टेकून रडत बसले नाहीत. थांबणे ही गोष्ट नसलेले आयुष्य अण्णाभाऊंनी निर्माण केले. वाटेगाववरून सुरू झालेला प्रवास, पुढे लेखनाचा प्रवास अखंडच होता. चळवळीसाठी झालेला प्रवास अखंडच होता. मृत्यूपर्यंत अण्णाभाऊ साठे या प्रवासातच आहेत. वाटेगाव ते मुंबई हा प्रवास रशियाच्या प्रवासापेक्षा अवघड होता. वाटेगावरून सुरू झालेला प्रवास अण्णा



**आपल्यात विविधता आहे, हिंदू, मुस्लिम, ख्रिश्चन, जैन, शीख, बौद्ध असे धार्मिक भेद आहेत आणि सिंधी, मद्रासी, बंगाली असे प्रांत भेद आहेत; पण आपण उत्कट राष्ट्रीय भावना आपल्या हृदयात निर्माण करण्याचा प्रयत्न केला नाही. त्यामुळे देशापुढे असंख्य आव्हाने उभी राहिली म्हणून आपण भारतीयत्वाचा आग्रह धरतो.**

भाऊंना निर्माण करता आला नसता, तर पुढे बलाढ्य साहित्याचा आणि रशियाचाही प्रवास शक्य झाला नसता. म्हणून वाटेगाववरून सुरू झालेला प्रवास मला फार मूलभूत आणि सर्जनशील वाटतो. हा प्रवास सुरू करण्यासाठी जी जिद्दी प्रज्ञा त्यांच्या लहानपणाला लाभली होती तिचे मोल मला फार वाटते. या जिद्दीने त्यांना वाट नसलेल्या अंधाराबाहेर काढले आणि पुढे याच जिद्दीच्या विस्तारलेल्या क्षितिजाने त्यांना महाराष्ट्राचा क्रांतिकारी साहित्यिक म्हणून सन्मानित केले. मी अण्णाभाऊंच्या या युगंधर जिद्दीला मनःपूर्वक वंदन करतो.

मी अण्णाभाऊना बघितले नाही. माझी त्यांच्याशी भेटही झाली नाही; पण मी त्यांना त्यांच्या साहित्यातच साक्षात बघितले. त्यांच्या शब्दांनी जपून ठेवलेले निखाऱ्यांचे अण्णाभाऊ मी बघितले.

१९७७ च्या मध्यावर दोन-तीन छोट्या छोट्या गोष्टी मात्र अण्णाभाऊंसबंधी माझ्या हातून घडल्या. त्या वेळी मी नागपूरच्या मॉरिस कॉलेजमध्ये मराठीचा प्राध्यापक होतो. कविता आणि समीक्षा लिहीत होतो. जमेल तसा चळवळीत भाग घेत होतो. अजून माझे एकही पुस्तक प्रकाशित झाले नव्हते. त्या वेळी प्रकाश खरात, भाऊ पचभाई, चंद्रकांत वानखेडे असे नव्याने लिहायला लागलेले तरुण माझ्यासोबत होते. विदर्भ साहित्य संघात अण्णाभाऊंचा फोटो लावायचा आम्ही निर्णय घेतला. प्रा. धनंजय वर्मा या पोर्टेट मास्टरकडून मी अण्णाभाऊंचा फोटो तयार करून घेतला. ते माझे मित्र. प्रेमाखातर त्यांनी तो विनामूल्य करून दिला. तो फोटो आम्ही लावला. त्याच निमित्ताने नागपुरात माझी दोन व्याख्याने अण्णाभाऊंवर झाली. एक वि. सा. संघाच्या गडकरी सभागृहात झाले आणि दुसरे महालमधील देवडिया कॉंग्रेस भवनामध्ये झाले. १५ ऑक्टोबर १९७७ मध्ये 'उत्थानगुंफा' हा माझा कवितासंग्रह प्रकाशित झाला होता. १४ जानेवारी १९७८ ला माझी एकाच वेळी दोन पुस्तके प्रकाशित झाली. दोन्ही पुस्तकांमध्ये ही दोन व्याख्याने लेखांच्या रूपाने आली आहेत. पुढे नागपूर विद्यापीठातली अण्णाभाऊ साठ्यांवरची पहिली पीएच.डी. मी करवून घेतली. या काही फार मोठ्या गोष्टी नव्हेत. तरी आज या सर्वच गोष्टींना मी अण्णाभाऊंना नम्रपणे केलेले अभिवादन मानतो.

मी अण्णाभाऊंना वंदन करतो म्हणजे त्यांच्या झपाटलेपणालाच वंदन करतो. त्यांच्या जिद्दी प्रतिभेला आणि त्यांनी लेखनासाठी घेतलेल्या कष्टांना वंदन करतो. अभाव तुडवत जगणाऱ्या अण्णाभाऊ नावाच्या अस्वस्थ जीवाला स्वस्थपणे राहू न देणाऱ्या त्यांच्यातील बंडखोर

ध्यासाला वंदन करतो. श्रेण्यांचे जहर निर्माण करणाऱ्या संस्कृतीचा दारुण पराभव करणाऱ्या त्यांच्यातील निखळ मानवी शक्तीच्या उफाळाला वंदन करतो. इथल्या सामाजिक, आर्थिक, वाङ्मयीन आणि नैतिक असभ्येतला सभ्यता शिकविणाऱ्या त्यांच्या कुंपणातीत सर्जकतेला वंदन करतो. अण्णाभाऊंनी अंधाराचे श्वास घेतले आणि निःश्वासातून उजेड बाहेर सोडला. त्यांचे विराट साहित्य मला या उजेडाच्या उच्छ्वासासारखे वाटते. भोवतीच्या अंधारावर मात करून आयुष्यभर मोहोरत राहिलेल्या या उजेडाच्या झाडाला मी वंदन करतो. असे झाड होणे सोपे नसते. त्यामुळे अशी लखलखत्या शब्दांची झाडे साहित्यातही अल्पच असतात. अण्णाभाऊ हे झाड त्यातले एक! मी या झाडाला वंदन करतो म्हणजे त्याच्या अजिंक्य वाङ्मयीन अस्तित्वालाच वंदन करतो.

अण्णाभाऊ साठे म्हणजे व्यवस्थेच्या बुरुजाला धडका मारणारे अंदाधुंद वादळ! अण्णाभाऊ साठे यांच्या पस्तीस कादबऱ्या प्रकाशित झाल्या. तेरा कथासंग्रह प्रकाशित झाले. चौदा वगनाट्ये प्रकाशित झाली. दहा पोवाडे आणि गीते प्रकाशित झाली. एक नाटक आणि एक प्रवासवर्णनही प्रकाशित झाले. आजच्या सर्वच लेखक- लेखिकांनी अण्णभाऊ साठ्यांच्या लेखनामागील कष्ट आणि ध्यास या दोन्ही गोष्टी काळजीपूर्वक समजावून घ्यायला हव्यात. लेखनाचा हा झपाटा डोळ्यांपुढे आणला तरी कोणताही संवेदनशील लेखक थक्क होईल आणि अंतर्मुखही होईल. शब्दांचा एक छोटासा डोंगरच होईल एवढे हे लेखन आहे. हा डोंगर जन्माला घालणारा बेहिशेबी निर्धार समजावून घेतल्याशिवाय अण्णाभाऊ साठ्यांसंबंधी आदर कसा बाळगणार? या प्रतिभावंताने एकोणपन्नास वर्षांच्या काळात अण्णाभाऊ साठे नावाचे पुस्तकांचे एक जिवंत गावच जन्माला घातले. अण्णाभाऊ साठ्यांचे युद्ध एकाच वेळी त्यांच्या शरीराशी, मनाशी, परिस्थितीशी आणि शोषणव्यवस्थेशीही होते. आपण सर्वांनीच अंतर्मुख व्हावे, आपण आपल्या आयुष्यातील वेळ किती बेपर्वाईने गमावतो याच्या पश्चात्तापाची जाणीव आपल्याला व्हावी आणि आपण आपले सर्जनशील डोके पडीक ठेवून आपणच आपल्यावर केवढा अन्याय करतो याच्या जाणिवेने अस्वस्थ व्हावे, असे हे अण्णाभाऊंचे निर्मितीचे तुफान आहे. आपण सर्वांनी या लेखनाचा प्रपंच पाहून गंभीर व्हावे, जबाबदार व्हावे आणि स्वतःला आजच्या संदर्भातले अन्वर्थक लेखन करणारे अण्णाभाऊ साठे करावे. अण्णाभाऊ साठ्यांसंबंधीचा आदर यापेक्षा अधिक चांगल्या पद्धतीने व्यक्त करता येणार नाही असेच मला नम्रपणे वाटते.

कम्युनिस्ट पार्टीच्या कार्यालयात पोस्टर्सचे ढीग असत. अण्णाभाऊ साठे खूपदा त्या ढिगांवर बसून लिहीत. बसून थकले की, त्या ढिगावरच लोटून लिहीत आणि असे हे अंधार कापणारे लेखन मेणबत्तीच्या उजेडात चालत असे. अडचणी पुढे करून लेखनासकट अनेक गोष्टी टाळणाऱ्यांसाठी हे अण्णाभाऊ साठे आदर्श होऊ शकत नाहीत. त्यांचा माणसाच्या झुंजीवर विश्वास होता. अण्णाभाऊ अभावापुढे हात टेकून रडत बसले नाहीत. लेखन ही त्यांच्यासाठी लढाईच होती आणि ते आयुष्यभर ही लढाई लढत राहिले. मी या जिद्दी प्रतिभावंताला वंदन करतो त्याचे हे कारण आहे.

देश सुखी व्हावा, समृद्ध व्हावा आणि सभ्य व्हावा, इथे समता नांदावी असे स्वप्नांचे क्षितिज माथ्यात घेऊन जगणाऱ्या या प्रतिभावंताला वाटत होते. काय वाटेल ते झाले तरी चालेल; पण माणसांना विद्रूप आणि लाचार झालेले मी पाहू शकणार नाही असे ते म्हणत. 'कुत्र्यासारखे काय मरता, उकिरड्याचीही दशा पालटते. तुम्ही तर माणसे आहात' असा शक्तीचा प्रबंध शब्दात बांधणाऱ्या या धुदावलेल्या प्रपाताला मी मनापासून वंदन करतो.

कम्युनिस्ट पक्षाने अण्णाभाऊंमधला लेखक जागवला आणि प्रज्वलित केला हे खरेच आहे. अण्णाभाऊ साठ्यांची प्रतिभा लिहिता येत होते म्हणून मशीनसारखी वागली नाही. तिने स्वतःचे रूपांतर मिशनमध्ये केले होते असेच मला वाटते.

भारतात दोन परस्परविरोधी विचारपरंपरा आहेत. एक इहवादी परंपरा आहे. ती सिंधूसंस्कृतीपासून आदिसांख्य, लोकायत, बुद्ध, फुले, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्यापर्यंत विज्ञानशीलतेचा आणि न्यायाचा अजिंक्य आवाज मांडत आहे. हीच एतद्देशीय भारतीय परंपरा आहे आणि दुसरी वेदांपासून सुरू झालेली विषमतेची ब्राह्मणवादी परंपरा आहे. ती देव-दैववादी आणि मोक्ष-परलोकवादी परंपरा आहे. राम, गीता, मनुस्मृती, ज्ञानेश्वर, रामदास, टिळक, गोळवलकर या मार्गाने आजवर ती विषमतेची आणि शोषणाची जाहिरात करीत आहे. हा मोठा संघर्षच आहे. हा केवळ तत्त्वज्ञानातला संघर्ष नाही.



अनुक्रमणिका

प्रत्यक्ष जीवनातलाही संघर्ष आहे. या दोन भूमिकांचा केवळ संघर्षच इतिहासात नाही, तर त्यांची निकराची युद्धेही इतिहासात आहेत.

मला प्रश्न असा पडतो की, मार्क्सचे तत्त्वज्ञान वरील दोन परंपरांमधल्या कोणत्या परंपरेचे मित्र तत्त्वज्ञान ठरू शकते? 'भारतीय' परंपरेशी मार्क्सवादी डिस्कोर्स जुळेल की वर्ण, जाती, स्त्री-पुरुषविषमता आणि त्या अनुषंगाने सामाजिक आणि आर्थिक शोषण चिरंतन करणाऱ्या अध्यात्मवादी वैदिक ब्राह्मणी परंपरेशी जुळेल? मार्क्सने स्वतः भारतीय तत्त्वज्ञानाची वर्गीय मांडणी कशी केली असती?

पुरुषसत्ताकाची, ब्राह्मणसत्ताकाची, जातीसत्ताकाची बाजू मार्क्सने घेतली असती काय? माझ्या अल्पबुद्धीला हे नम्रपणे वाटते की, मार्क्सने भारतीयत्वाची बाजू घेऊनच वर्गसंघर्ष मांडला असता. खं.त्र्यं. सुळे (शेष) हे म्हणतात, ''सावरकर टिळक, गांधी आणि अरविंद बाबू यांच्या तत्त्वज्ञानातून मी मार्क्सवादी झालो.'' युनिव्हर्स ऑफ वेदान्त या पुस्तकात बानी देशपांडे म्हणतात- आइन्स्टाइननंतरच्या भौतिक विज्ञानातील भूततत्त्व, अवकाश आणि काल या कल्पना पूर्वीच वेदान्तात मांडण्यात आल्या आहेत. मार्क्सचा भौतिकवादी द्वंद्वविरोधी विकासवाद वेदान्तात अधिक प्रगल्भ रूपात मांडला आहे आणि योगविद्या म्हणजेच वेदान्त्यांचा द्वंद्वविरोधी विकासवादच होय. ईश्वर, ब्रह्म यांना भौतिक सत्य मानणारी ही भूमिका अवकाश-काल यांच्या अखंडत्वात ब्रह्माचे अस्तित्व मांडण्याचा दावाही करते. मोक्षद्वाराची गुरुकिल्ली जो गीताग्रंथ तो संस्कृतबद्ध. त्या ग्रंथाला ज्ञानेश्वराने संस्कृतातून अमृततुल्य मराठीत उतरविले, 'स्वर्गातील वर्गभेद मांडून काढले' असे १९७५ सालच्या लोकवाङ्मयात श्री.अ. डांगे म्हणतात.

हे सर्व बघितले म्हणजे हे स्पष्टपणे जाणवते की, ही मार्क्सला अभिप्रेत वर्गरचना असणे अशक्य आहे. ही तर्कविसंगत, बेंगरूळ मांडणी आहे आणि ती येथील उच्चवर्णीयांनी केलेली आहे. स्वतः मार्क्सने भारतातील मूल्यांचा आणि तत्त्वज्ञानांचा संघर्ष कसा मांडला असता? साहित्यामध्येही त्याने त्याच्या तत्त्वज्ञानाशी कोणती परंपरा सुसंगत मानली असती? भारतातील सर्वहारा आणि शोषित वर्गाच्या सन्मानासाठी मार्क्सने कोणती परंपरा उपकारक ठरविली असती?

बाबासाहेब आंबेडकरांनी भारतातील वर्गसंघर्ष आणि वर्गयुद्धही मांडले. 'भांडवलशाही आणि ब्राह्मणवाद हे कामगारांचे दोन शत्रू आहेत' असे त्यांनी १९३८ च्या मनमाडच्या भाषणात सांगितले. असाच वर्गविग्रह मार्क्स भारतात जन्माला आला असता, तर त्यानेही मांडला असता. भारतातील ब्राह्मण मार्क्सवाद्यांना असा मूल्यवर्गसंघर्ष का मांडता आला नाही? हा प्रश्न मला पडलेला आहे.

अण्णाभाऊ साठ्यांनी राम, भगवद्गीता, ज्ञानेश्वर, एकनाथ, समर्थ रामदास, लोकमान्य टिळक, वासुदेव बळवंत फडके अशा परंपरेचा उल्लेख ओघाने केला आहे. त्यांच्या गीतांमधून आणि पोवाड्यांमधून दिसते. ही सर्वच परंपरा चातुर्वर्ण्याची समर्थकही आहे आणि ती चैतन्यवादीही आहेच.

शोषकांचा वर्ग कोणता? त्यांचा विचारव्यूह कोणता? त्यांची परंपरा कोणती? या परंपरेला कोणता समाज, रीतिरिवाज आदर्श वाटतात? या प्रश्नांची उत्तरे निश्चित करता यायला हवीत. त्याशिवाय शोषणाचा आणि विषमतेचा अंत करता येणार नाही. शोषण नष्ट व्हावे. शोषण करण्याचे शोषकांचे तत्त्वज्ञान मात्र पवित्रच आहे. ही भूमिका अतार्किक आहे. भारतीय उच्चवर्णीय मार्क्सवाद्यांनी ही अतार्किक भूमिका पुरस्कारिली असे दिसते. मार्क्सने भारतातील वर्गसंघर्ष कसा मांडला असता हे लक्षात घेण्याची वा बाबासाहेबांनी मांडला तो वर्गसंघर्ष लक्षात घेण्याची वैदिक परंपरेत घडण झालेल्या उच्चवर्णीय कम्युनिस्टांना गरजच वाटली नाही. त्यांनी जी वैदिक परंपरा पवित्र मानली आणि पुरस्कारिली त्यामुळे जर साम्यवाद प्रस्थापित होत असेल, तर मग मार्क्सची गरज काय होती असाही प्रश्न निर्माण होतो. अण्णाभाऊ साठ्यांनी मार्क्सचा स्वीकार केला, वा ते मार्क्सवादी होते याचा हा अर्थ आहे काय? हा वैदिकांच्या अनुकरणाचा संसर्ग आहे, असे कोणी म्हटले तर आपण काय करणार?

बाबासाहेब आंबेडकरांची जयंती साजरी करायची की नाही या प्रश्नावरून कम्युनिस्टांमध्ये वादावादी झाली होती. 'जग बदल घालुनी घाव, सांगून गेले मला भीमराव' हे गीत अण्णाभाऊंनी लिहिले तेव्हा त्याचा जाब अण्णाभाऊ साठेंना विचारला गेला होता. बाबासाहेबांवर अण्णाभाऊंनी हे गीत लिहिले हाच वादाचा मुद्दा नव्हता, तर १९३८ च्या मनमाडच्या भाषणातील बाबासाहेबांची

द्विविध शोषणाची भूमिका अण्णाभाऊ साठेंनी सन्मानिली होती हाही राग असावा. या गीतात सर्वच परिवर्तनवाद्यांच्या एकजुटीचा प्रस्ताव आहे. समन्याय हाच समाजरचनेचा निष्कर्ष असावा. लोकशाही, सर्वसमावेशकता, सेक्युलॅरिझम, सामाजिक आणि आर्थिक समता असलेला समाजवाद या भारतीयत्वाचा पुरस्कार यापुढील काळात जाणते साम्यवादीही करायला लागले, काही कट्टर पोथीनिष्ठ सोडले, तर डाव्यांमधील आणि परिवर्तनवाद्यांमधील वैचारिक सीमा वितळत आहेत. परिभाषा जरा निराळी; पण ध्येयभाषा एक असे वातावरण मधल्या काळात तयार होत आले आहे.

मी विज्ञाननिष्ठ आहे. बुद्धिप्रामाण्यवादी आहे. सर्वन्यायवादी आहे. सतत पुनर्रचनाशील आहे. या माझ्या विचारसरणीत आणि जीवनशैलीत जाती, धर्म, वर्ग, स्त्री-पुरुष विषमता कुठेही बसत नाही. ही भूमिका माझी वैश्विकच आहे. आंतरराष्ट्रीयता असे या मूल्यप्रबंधाचे रूप आहे. जगातले जे जे विचार या भूमिकेत बसतात त्या सर्व विचारांचे मी आंतरराष्ट्रीय कुटुंब मानतो. आपण तपशिलावरून भांडतो आणि वेगवेगळे राहतो. अल्पसंख्य होतो आणि दुबळे होतो. आपण तपशिलावरून भाडण्यात जास्त शक्ती खर्च करतो आणि सत्तापरिघाबाहेर राहतो. आपले सर्वांचे साध्य एकच आहे. समन्याय. सर्वांना समान सन्मान हे आपले साध्य आहे. स्त्री असो वा पुरुष असो या सर्वांनाच समान मूल्य आहे. हे ध्येय आपल्या कोणत्याही महानायकाने नाकारले नाही. बुद्ध आणि मार्क्स यांचे साध्य एकच आहे. साधनात तेवढा वेगवेगळेपणा आहे. हे बाबासाहेब आंबेडकरांनी आणखी किती स्पष्ट शब्दांत सांगायला हवे? पण आपली भांडणाची आवड आपल्याला साधनांवरूनच झुंजवते. झुंजवते आणि उद्ध्वस्त करते. शोषक सत्ता अधिकाधिक शक्तिशाली होत जाते आणि आपण भयानक तपशीलप्रेमी लोक भांडत राहतो. तत्त्व आणि तपशील यातला भेद लक्षातच घेत नाही. तत्त्व म्हणजे साध्य. तपशील म्हणजे काळाच्या मर्यादा असलेली म्हणून दर नव्या काळात बदलत राहणारी साधने! भौतिक विकासानुसार या साधनांनी बदललेच पाहिजे. इथे फलप्रामाण्यावादाचा मुद्दाही लक्षात घ्यावा लागेल. जे साधन आपल्याला साध्यापर्यंत पोचवू शकते ते महत्त्वाचे. इतर साधनांशी फारकत घ्यायला हवी. ज्या साधनांशी फारकत घ्यायला हवी त्यांच्यावरच्या खुळ्या प्रेमामुळे भांडण्यात शक्ती खर्च करू नये आणि आपल्या अज्ञानाचा उत्साही आविष्कार करू नये. हे अज्ञान आपल्याला फक्त नेस्तनाबूत करू शकते. आपले अज्ञान आपणाला आता प्रज्ञानात रूपांतरित करता यायला हवे.

व्यवस्था म्हणजे काय? तिचे स्वरूप आणि पद्धती सत्तेच्या गरजेप्रमाणे कशी बदलते? व्यवस्था परिवर्तन म्हणजे काय? व्यवस्था परिवर्तनाचे तत्त्वज्ञान कोणते? ते आपल्याकडून कोणती अपेक्षा करते? एकत्र येणे सर्वच अन्यायग्रस्तांच्या हिताचे कसे आहे? हे कळले, होणाऱ्या अन्यायाचा अर्थ आणि आशय कळला की, माणसे क्रमाने आपल्या व्यवस्थादत्त चौकटी फेकत जातात. त्यांच्या एकत्र येण्याच्या मार्गातील कुंपणे नष्ट करत जातात. समन्यायाच्या मळ्याला कोणतेही कुंपण पडणे विघातक असते हे सर्वच अन्यायग्रस्तांना कळत जाते आणि तपशिलाचा पराभव करत माणसे साध्याच्या शिखरावर पोचतात. विषमतारहित विविधतेने मोहोरत राहतात. इथे त्यांना सर्वच उजेडांचा महोत्सव सुरू झाल्याचा सौंदर्यानुभव येतो. या शिखराला आपण भारतीयत्वाचा मूल्यकोश किंवा मानवी न्याय म्हणू!

'भारतीयत्व' या संकल्पनेचा अर्थ 'मानवी न्याय' हाच आहे. भारतीयत्व हा मानवी जीवन सतत उन्नयनशील ठेवणाऱ्या वैश्विक मूल्यांचा एक कोश आहे. भारत हे आपल्या देशाचे नाव आहे आणि ते केवळ एका भूखंडाचे नाव नाही. पृथ्वीच्या पाठीवरील एखाद्या विवक्षित भूभागाचे वा जमिनीच्या काही क्षेत्रफळाचे केवळ ते नाव नाही. भारत हे मानवी जीवनाला सतत उज्ज्वल करीत राहणाऱ्या महान मूल्यप्रबंधाचे नाव आहे. भारताच्या याच मूल्यमयतेच्या महानतेचा निर्देश आपण भारतीयत्व या संकल्पनेने करतो.

भारतीयत्व ही एक मूल्यपरंपराही आहे. ती आदर्श मूल्यांचे प्रतीक म्हणून भारताच्या संविधानात मांडली असली तरी ती भारतात सिंधूसंस्कृतीच्या काळापासून नांदत आलेली आहे आणि ती आजवर अधिकच काटेकोर आणि अर्थसुंदर होत आलेली आहे.

मुळात भारतात सिंधूसंस्कृती होती. तिचा काळ इ. स. पूर्व अडीच ते तीन हजार वर्षे मानला जातो. ही संस्कृती विकसित आणि नागरसंस्कृती होती. या काळात भारताबाहेरच्या जगात इजिप्शियन आणि मेसोपोटेमियन अशा संस्कृती अस्तित्वात होत्या. इ. स. पूर्व १५०० ते

२००० च्या सुमारास युरेशियाच्या कझाकिस्तान या भागातून आर्य इथे आले. संस्कृत भाषा आणि यज्ञ त्यांच्यासोबत इथे आले. आर्य हे मूळ भारतीय निवासी नव्हते. ते येण्यापूर्वी इथे हडप्पा किंवा सिंधू संस्कृती होती. ही संस्कृती इहवादी होती. तिच्यात वेगवेगळे व्यवसाय करणारे लोक होते; पण जाती वा वर्ण नव्हते. वर्णसंस्था आर्यांनी भारतात आणली आणि आर्यांचे चिरंतन अस्तित्व ब्राह्मण म्हणून प्रस्थापित करण्यासाठी तिला कर्मविपाकाच्या सूत्रात बांधले. हे सूत्र खोटे आहे. ते कोणत्याच तर्कात बसत नाही; पण या सूत्राने अपरिवर्तनीय विषमताही निर्माण केली आणि शोषणही निर्माण केले. वेदनिर्मितीचा काळ इ. स. पूर्व १२०० वर्षे मानला, तर इ. स. पूर्व आठशेच्या सुमारास वैदिकांच्या वर्णसंस्थेची समाजरचना प्रत्यक्षात येऊ लागली होती, असे म्हणता येते. हा काळ महावीर वा बुद्धापूर्वीचा सामान्यत: दीडशे - दोनशे वर्षांचा आहे. म्हणजे इ. स. पूर्व हजार वर्षांआधी भारतात वर्णसंस्था नव्हती. तर्कतीर्थांनी 'ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र अशी चातुर्वर्ण्याची कल्पना वेदातली आहे' असे (वैदिक संस्कृतीचा विकास . १९७२, प्रस्तावना पृ.७) म्हटले आहे. म्हणजे वेदांपासून इथे चार वर्णांचा समाज सुरू झाला. तो वैदिकांनी सुरू केला. हे चार वर्ण वैदिकांनी पूर्वजन्मीच्या खोट्या कल्पनेशी बांधले आणि कर्मविपाक नावाची वर्ण-जाती चिरंतन ठरवणारी फसवणूक इथे सुरू केली. ब्राह्मण या वर्णाचे वर्चस्व वैदिकांनी निर्माण केले. चातुर्वर्ण्याच्या वैदिक धर्माला म्हणूनच ब्राह्मणधर्मही म्हटले जाते. मूळ भारतीय निवासी नसलेल्या आर्यांनी म्हणजे त्यांच्या वसाहतवादाने इथे वर्णसंस्था आणि यज्ञसंस्था आणली आणि परलोकाची व स्वर्ग-नरकाची कल्पना आणली.

याचा अर्थ वेदपूर्व काळात इथे निखळ इहवादी संस्कृती होती. ती श्रमिकांची आणि कष्टकऱ्यांची संस्कृती होती. तिच्यात वर्णसंस्था, यज्ञसंस्था नव्हती. पृथ्वीच्या पाठीवरचेच निखळ मानवी जीवन जगणारी ही सिंधू संस्कृतीमधील नागवंशाची वा द्रविड लोकांची संस्कृती होती. आदिसांख्य, लोकायत ही निधर्मी, इहवादी, निसर्गमनस्क तत्त्वज्ञाने त्यांची तत्त्वज्ञाने होती. महावीरांपूर्वीच्या तेवीस तीर्थंकरांची आणि बुद्धापूर्वीच्या सत्तावीस बुद्धांची मिथके मांडली गेली आहेत. ही मिथके अवतार सूचित करीत नाहीत कारण वेदपूर्व सिंधू संस्कृतीत अशी अध्यात्माची, अवतारांची वा परलोकाची कल्पनाच नाही. तीर्थंकर वा बुद्धपूर्व बुद्ध ह्यांच्या निर्देशाचा अर्थ इहवादी संस्कृतीचे भरणपोषण करणाऱ्या विवेकी प्रबोधनकारांचा वर्ग त्या काळात होता असा आहे. सिंधू संस्कृतीमधील नाग समाजामध्ये ऐहिक नीती होती. ती धर्मातीत, ईश्वरातीत आणि सौहार्दाची नीती होती आणि भारताबाहेरील इजिप्शियन आणि मेसोपोटेमियन या विकसित संस्कृतीप्रमाणे तीही भौतिक आणि नैतिकदृष्ट्या समृद्ध संस्कृती होती. हिलाच आपण हडप्पा आणि मोहेंजोदारोची संस्कृती म्हणतो.

आदिसांख्य, लोकायत, महावीरपूर्व तीर्थंकर, बुद्धपूर्व बुद्ध, महावीर आणि बुद्ध यांचा जन्म याच नागवंशात झाला होता. इ. स. पूर्व काळात ही नाग-द्रविडांची सिंधूसंस्कृती नांदत होती. इ. स. पूर्व हजारपासून तिच्या विरोधात काम करणारी विषमतेची आणि ब्राह्मणवर्चस्वाची वैदिक संस्कृती सुरू झाली. या पुढल्या काळात नाग-द्रविड संस्कृतीचे नेतृत्व महावीर, लोकायत आणि बुद्ध यांनी केले. सिंधू संस्कृतीमधील इहवादी समाजरचनेची पायाभूत तत्त्वे या सर्वांच्याच चिंतनाच्या केंद्रस्थानी होती. सिंधू संस्कृतीमधील ऐहिकतेविरोधात, समतेविरोधात आणि निधर्मीपणाच्या विरोधात सुरू झालेल्या वैदिक धर्माविरुद्ध आणि संस्कृतीविरुद्ध महावीराने आणि बुद्धाने मूलगामी संघर्ष सुरू केला. या सर्व काळात आधीचे आदिसांख्य, लोकायत हेही त्यांच्यासोबत होतेच. इहवाद-परलोकवाद, वर्णसंस्थाविरोध-वर्णसंस्था, भौतिक नीती-

**साहित्यात जीवनाचे चित्रण येते. याचा अर्थ साहित्यात माणसांच्या सामाजिक, आर्थिक अशा सर्वच पातळ्यांवरील संबंधांचे चित्रण येते. साहित्यात एका जातीगटाचे वा वर्गाचे चित्रण येत नाही, तर या जातीगटांच्या संबंधांचे वा वर्गांच्या संबंधांचे चित्रण आणि मूल्यन येते. हे मानवी संबंधांवरचे विवेकी भाष्य असते. कोणीतरी अन्याय करणारा असल्याशिवाय अन्यायग्रस्त वर्ग निर्माण होत नाही.**



अनुक्रमणिका

अध्यात्म असा हा संग्राम सुरू झाला. हा निधर्मीपणा विरुद्ध धर्म असाच संघर्ष होता. सिंधू संस्कृतीच्या कोणत्याही तत्त्वज्ञाने धर्म स्थापन केला नाही, कारण त्यांना समाजाला स्थितीशील करणे मान्य नव्हते. समाज खुला आणि पुनर्रचनाशील असावा यासाठी त्यांचे प्रयत्न होते म्हणून त्यांनी धर्म स्थापन केला नाही. वैदिक आणि भारतीय या दोन परस्परविरोधी परंपरांमधला हा संघर्ष आहे. याचा अर्थ हा दोन मूल्यसरणींमधला किंवा दोन जीवनपद्धतींमधला संघर्ष आहे.

इ. स. पूर्व सातव्या- आठव्या शतकात वैदिकधर्माची म्हणजे वर्णधर्माची म्हणजे ब्राह्मण या वर्णाचे सर्वतोपरी महत्त्व प्रस्थापित करणाऱ्या धर्माची स्थापना झाली. हा काळ बुद्धापूर्वीचा किमान दीड-दोनशे वर्षांचा आहे. ब्राह्मण वर्चस्वासाठी आटापिटा करणाऱ्या या वैदिक धर्माला इ. सनाच्या १००० वर्षांच्या नंतर हिंदू हा शब्द चिकटला. हा काळ चक्रधरांच्या, संत नामदेवांच्या आणि चोखामेळ्यांच्या पूर्वीचा काळ आहे. हे सर्व लोक १२ व्या १३ व्या शतकात येतात. हिंदू या शब्दासंबंधी राजारामशास्त्री भागवत काय म्हणतात ते मी उद्धृत करतो. त्यांच्या (लेखसंग्रह खंड-५, संपादक :दुर्गा भागवत, वरदा बुक्स, पुणे, पृ. २६१ ते २६३) संशोधनात ते म्हणतात- 'हिंदू' शब्दाचा अर्थ फारसीत गुलाम होतो. हिंदू म्हणजे 'सिंधू' (नदी वाहणारा उत्तरेकडचा मुलुख), 'सिंद-सिंध व हिंदू' हे दोन्ही शब्द सिंधू शब्दापासून आहेत;इतकेच की 'हिंदू' शब्द केवळ मुसलमानांनी जन्मविलेला असून त्यांच्यापासून पुढे इकडच्या लोकांनी उचललेला आहे. 'हिंद' व 'हिंदू' हे शब्द सख्खे वंधू होत. दोघांनाही जन्मविणारे मुसलमान होते. गझनीकर महमूद वगैरे तुर्क मंडळी पहिल्याने देशावर किंवा या भरतखंडावर स्वारी करू लागली. ती सगळी जातीने तुर्क असून फारसी भाषा समजणारी व दरबारी बोलणारी होती. या हिंद पलीकडच्यांनी हिंद अलीकडचे इतके लोक कैदी करून नेले व गुलाम म्हणून विकले की 'हिंदू' शब्द अफगाण लोकात 'गुलाम' वाचक होऊन राहिला; हा शब्द रूम प्रांती म्हणजे आशिया मायनरमध्ये गेला व इ. स. १४ शतकातील जलालुद्दीन रूमीने तो आपल्या काव्यात दाखल करून ठेवला आहे. 'हिंदुस्थान' म्हणजे 'हिंदू' चे म्हणजे 'मुसलमानांची गुलामगिरी करणारांचे स्थान' हिंदूधर्म म्हणजे 'मुसलमानांची गुलामगिरी करणारांचा धर्म' याप्रमाणे 'हिंदू', 'हिंदू धर्म' या दोन शब्दांचे रहस्य आहे.

जर 'हिंदू' शब्दच संस्कृत सारस्वतात कोठेही येत नाही तर हिंदू-धर्म शब्द तरी कोठून येणार? 'हिंदू' शब्द इ. स. १००० पुढे जन्मलेला आहे. आज हा शब्द ९०० वर्षांहून जास्त प्राचीन नाही. 'हिंदू' शब्द जन्मास आल्यानंतर पुढे 'हिंदू-धर्म' शब्द जन्मला. तो ९०० वर्षांचाही म्हणता येत नाही.' हे लक्षात घेतले तरी वैदिक धर्मालाच वा ब्राह्मणधर्मालाच हिंदू धर्म म्हणण्याची प्रथा पडली हे खरे आहे असेच म्हटले पाहिजे. कारण त्या दोघांचीही तात्त्वज्ञानिक आणि व्यावहारिक वर्तनाविषयीची आशयसूत्रे समानच आहेत. ही बाब महत्त्वाची आहे. देवदैवते तीच, स्वर्ग-नरकाच्या, परलोकाच्या, वर्णांच्या, जातींच्या आणि त्यांच्या पावित्र्यासंबंधीच्या कल्पना सारख्याच आहेत. वेदांना, त्यातील तत्त्वज्ञानांना संत प्रमाण मानतात. पुढे हिंदूही मानतात. आजवर मानतात. प्रबोधन झाले. मार्क्सवादी चळवळ झाली. बाबासाहेब आंबेडकरांची चळवळ आहे. जागतिकीकरणाचे वादळ उठले आणि स्थिरावलेही; पण हिंदू म्हणवणारांच्या मनातील वैदिक श्रद्धा कायम आहेत. वरील सर्वच गोष्टी घडल्या, आधुनिकता आली; पण अनेक मराठी साहित्यिकांच्या प्रतिभा वैदिक जीवनदृष्टी पवित्र मानणाऱ्या हिंदू धर्मातच अडकून आहेत. हे जसे महानगरीय नगरीय साहित्यिकांच्या संदर्भात म्हणता येते तसे गावगाड्यातील प्रतिभांच्या संदर्भातही म्हणता येते. शहरगाडा आणि गावगाडा या दोन्ही संरचनांची भाषा वेगळी भासली तरी मनांचे कूळ एकच आहे.

आपले एक महान क्रांतिकारक आणि शोषक-शोषित यांच्या वर्गीय तत्त्वज्ञानातील निकराच्या संघर्षाची आग उधळणारे जोतीराव फुले इ. स. १८८९ च्या एप्रिलमध्ये लिहून पूर्ण केलेल्या सार्वजनिक सत्यधर्म पुस्तकात म्हणतात. 'कारण मोघम नाव हिंदूंचे आणि उपभोग घेणारे एकटे ब्राह्मण.'( संदर्भ : म. फुले समग्र वाङ्मय,आवृत्ती पाचवी, १९९१. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, पृ. ४९३) तर असा हा ब्राह्मण हितसंबंध आणि बाकीचे बहुसंख्य लोकांचे हितसंबंध यांच्यातील संघर्ष आहे आणि तो परस्परविरोधी विचारसरणींशी संबंधित आहे.

नुसता शोषक-शोषित हा संघर्ष मोघम होतो. शोषकांच्या तत्त्वज्ञानाविरुद्ध शोषितांनी निर्माण केलेल्या

तत्त्वज्ञानाचा संघर्ष व्हावा लागतो. शोषकांचे-ब्राह्मणवादी वा भांडवली तत्त्वज्ञान प्रमाण मानायचे आणि ब्राह्मणांच्या आणि भांडवलदारांच्या शोषणाविरुद्ध आंदोलन चालवायचे हे आपल्याकडे सतत होताना दिसते. अमेरिकेत काळ्यांचा गोऱ्याविरुद्ध संघर्ष असतो; पण गोऱ्यांचे तत्त्वज्ञान आणि काळ्यांचे तत्त्वज्ञान एकच असते. त्यांचा धर्म एकच असतो. या सर्व गोष्टी जमिनीवरची हरळी कापण्यासारखे; पण जमिनीतल्या हरळीची मुळं कायम ठेवण्यासारखेच असते. हरळी परत उगवण्याच्या शक्यता म्हणजे मुळे तुम्ही कायमच ठेवता. म्हणजे तुमच्या पिढीपुरते शोषण काही काळासाठी संपल्यासारखे वाटले तरी तुम्ही कायम ठेवलेल्या मुळांमधून पुन्हा शोषणाची हरळी उगवेल आणि तुमच्या पुढच्या पिढ्यांचे शोषण होईल. हा बेस कायमच ठेवून सुपरस्ट्रक्चर केवळ बदलण्याचा मुद्दा असतो. झाडाच्या फांद्या तोडून प्रश्न मिटत नाही. तुम्हाला वाटते त्यामुळे वास्तव बदलेल; पण तो भ्रम असतो. फांद्या परत येतात. मागच्या पानावरची कथा पुन्हा पुढच्या पानावर सुरू होते. त्यामुळेच शोषण ही वस्तुस्थिती ज्या तत्त्वज्ञानांनी घडवलेली मने, या मनांवर संस्कार करणाऱ्या सर्व गोष्टी बदलाव्या लागतात. शोषण आणि शोषणाचे तत्त्वज्ञान हा सर्व दुष्ट खेळच नाकारावा लागतो. हे व्हायला हवे असते. क्रांतीसाठी हे आवश्यक असते; पण माणसे अन्याय नाकारण्यापर्यंतही येत नाहीत. त्यांच्या मनाची धार्मिक घडणच त्यांना तसे करू देत नाही. पण अन्याय नाकारण्यासाठी एखादवेळी माणसे पुढं आली तरी अन्यायाच्या मुळाशी असलेले तत्त्वज्ञान नाकारणे माणसांना जमत नाही. असे तत्त्वज्ञान बदलण्याच्या गोष्टी पुढे आल्या की, माणसे नाराज होतात. आपल्या परिवर्तनाच्या चळवळींचा दुबळेपणा या स्थितीशी निगडित आहे. धर्मांनी दिलेल्या वेगवेगळ्या विघटनशील अस्मितांच्या खुंट्यांना माणसे स्वतःला टांगून घेतात. त्यामुळे परिवर्तनाच्या चळवळीचा या क्रांतीचा जीव आपल्याकडे सततच टांगणीला लागलेला असतो.

अधिकाधिक उज्ज्वल जीवन जगू इच्छिणाऱ्या आणि सतत प्रवाही राहू इच्छिणाऱ्या माणसाला आणि सतत नवनवोन्मेषशाली जगणे जगू इच्छिणाऱ्या साहित्यिकाला त्याची भावनिक आणि वैचारिक परंपरा कळायला हवी. सर्वसमावेशकतेशी म्हणजे आंतरराष्ट्रीयतावादी असीमतेशी आपल्याला आपले मन जोडता यायला हवे. वर्गकेंद्री, जातकेंद्री, धर्मकेंद्री, प्रदेशकेंद्री आणि लिंगभावकेंद्री परंपरांनी आपल्या मनांना वेगवेगळ्या पिंजऱ्यात डांबलेले आहे. त्यामुळे आपण 'माणूस' या निरुपाधिक अवकाशाशी नातेच प्रस्थापित करू शकत नाही त्यामुळे आपल्यात परस्परांवर दृढविश्वास ठेवणारे सौहार्द निर्माण होऊ शकत नाही. त्याचे कारण हे पिंजरे! विलगीकरणाचे तुरुंग! किंवा आपल्या दौर्बल्याची चिरंतनता जपणारे कोंडवाडे!

असे कोंडवाडे निर्माण करणारी परंपराही आपल्याकडे आहे आणि माणसांना मुक्त करणारी, स्वातंत्र्याचे पंख देणारी परंपराही आपल्याकडे आहे. जातसत्ताक, वर्गसत्ताक, धर्मसत्ताक, पुरुषसत्ताक, अंधश्रद्धासत्ताक, असत्यसत्ताक, देवदैवसत्ताक, अन्यायसत्ताक, विषमतासत्ताक, शोषणसत्ताक, आणि फसवणूकसत्ताक अशी सर्व सत्ताकांचे जतन आणि संवर्धन करणारी एक परंपरा आपल्याकडे आहे आणि या सर्व सत्ताकांचा अंत करण्याची क्षमता असलेली, ही सर्व सत्ताके उद्ध्वस्त करून सुंदर, नितळ, निरामय, विज्ञानशील आणि निखळ इहवादी माणूसपणाचा महोत्सव सिद्ध करू शकणारी वैचारिक आणि भावनिक परंपराही आपल्याकडे आहे. ही परंपरा जगात 'भारतीय' म्हणून ओळखली जाते.

ही भारतीय परंपरा एतद्देशीय आहे. ती सिंधू संस्कृतीपासून सुरू होते आणि आदिसांख्य, लोकायत, महावीर बुद्ध, अशोक, बृहद्रथ, अश्वघोष, फुले, बाबासाहेब आंबेडकर आणि भारतीय संविधान असा उजेडाचा, मानवी सौहार्दाचा प्रवास करीत आपल्यापर्यंत येते.

ही परंपरा डॉग्मॅटिक नाही तर प्रॅग्मॅटिक आहे. ती सतत प्रवाही आणि पुनर्रचनाशील आहे. ती विज्ञानशील आहे. याचा अर्थ ती बुद्धिप्रामाण्यवादी वा विवेकवादी आहे. ही परंपरा सर्वसमावेशक आहे. कुणाचेही वर्चस्व वा कोणाचीही अंकितता या परंपरेच्या कोणत्याही अनुच्छेदात बसत नाही. ही कायम खुली, स्वतःला अद्ययावत करीत आणि नवनवे उन्मेष प्रकट करीत जाणारी आणि माणसाला कुठेही न थांबणारे नवल मानणारी, माणसालाच जीवनाचे, तत्त्वज्ञानाचे आणि साहित्याचे केंद्र मानणारी परंपरा आहे.

ही परंपरा स्वतःला प्रथमही, शेवटीही आणि केव्हाही केवळ भारतीयच माना आणि म्हणा असा Wisdom चा असीम धडा देणारी परंपरा आहे. ही परंपरा मूल्यतःच मग वैश्विक संदर्भात स्वतःला वैश्विक मानायला सांगणारी



अनुक्रमणिका

आणि स्वत:ला आंतरराष्ट्रीयत्वात गुंफायला सांगणारी सर्वव्यापी परंपरा आहे. या परंपरेला बर्लिनच्या कोणत्याही भिंतीच नाहीत. हे असीम अवकाशाचेच चारित्र्य आहे.

ही नियतीवादी वा प्राक्तनवादी परंपरा नव्हे. तिने माणसालाच परम केले. त्याला सर्वेसर्वा केले आणि हा माणूसच माणसांच्या राज्याच्या प्रस्थापनेसाठी आपली बुद्धी पणाला लावतो आहे. "I Know of nothing finer, more complex, more interesting than man, he is everything." असे तुम्हा आम्हा सर्वांचाच आदरणीय साहित्यिक मॅक्झिम गॉर्की म्हणाला होता. आपली भारतीय परंपराही अशीच पूर्णतः इहवादी आहे आणि तिने माणसालाच सिंधू संस्कृतीपासून आजवर 'एव्हरीथिंग' मानले आहे. ही विज्ञानशील म्हणजे प्रयोगशील बौद्धिक आणि भावनिक परंपरा आहे आणि ती नियतीचाही पराभव करणारी परंपरा आहे. डीएनए आणि जनुके म्हणजे नियतीचे वा प्राक्तनाचेच प्रस्ताव आहेत. प्रत्येकच माणसाने कसे जगावे याची धर्माने, ईश्वराने ठरवून दिलेली विषयपत्रिका म्हणजे नियती. या विषयपत्रिकेत बदल करण्याचे स्वातंत्र्यही माणसाला नाही वा तशी शक्तीही त्याच्यात नाही. माणसाच्या नशिबाने त्याच्या ठरवून दिलेल्या जगण्यात तिळमात्रही बदल करण्याची कोणती तरतूद ठेवलेली नाही. माणूस या नियतीनुसार आणि तिच्या नियमानुसार यंत्रवत जगण्यासाठीच केवळ आहे. तो नवीन नियमही जन्माला घालू शकत नाही. ठरवून दिलेल्या नियमांबाहेरचे जगूही शकत नाही. ही नियतीवादी परंपरा वैदिक वा ब्राह्मणी परंपरेचीच उप-परंपरा आहे.

भारतीय परंपरा अशी कोणती नियती, दैव वा प्राक्तन मानीत नाही. याचा अर्थ ती डीएनए आणि जनुकांचीही दादागिरी मानीत नाही असा आहे. स्टीफन हॉकिंग हा आपल्या बौद्धिक परंपरेने परम आदर बाळगावा असा शास्त्रज्ञ आहे. त्याने माणूस आपल्या बुद्धीशक्तीच्या बळावर डीएनए आणि जनुके यांना आव्हान देऊ शकतो आणि बदलू शकतो असे म्हटलेले आहे. कपिलांनी, चार्वाकांनी, बुद्धांनी, सम्राट अशोकाने, जोतीराव फुल्यांनी आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आपल्या डीएनएचा आणि जनुकांचा पराभवच केला. माणसांना बोन्साय करणाऱ्या वैदिकांनी नेमून दिलेले डीएनए वा जनुके वा नियती आपल्या महानायकांनी ठोकरून लावली. त्यांनी त्यांच्यावर लादलेल्या नियतीचा, जनुकांचा आणि डीएनएचा दारुण पराभवच केला.

भारतीय मूल्यपरंपरेचा माणसाच्या प्रज्ञेवर आणि त्याच्या बौद्धिक साहसावर अपार विश्वास आहे. ही या माणसाची दुर्दम्य साहसशीलता भारतीय परंपरेला अपार गौरवाची गोष्ट वाटते. आपली ही भारतीय चिंतनपरंपरा सेक्युलर म्हणजे इहवादीच आहे. ही परंपरा श्रेणीविहीन मानवी संबंधांची वा बंधुतामय नीतीची प्रवर्तक जीवनशैली आहे. ईश्वराऐवजी भारतीय तत्त्वज्ञांनी ही नीतीच प्रमाण मानली. मानवाला ईश्वरावलंबी करण्याऐवजी त्यांनी मानवाला स्वत.वलंबी केले. हा ध्येयप्रबंध वैदिकांच्या विरोधातच होता. भारतीय तत्त्वज्ञांनी जगाला सर्वप्रथम बुद्धिप्रामाण्यवादी, मुक्ततत्त्वादी असे मानवी सौहार्दाचे तत्त्वज्ञान दिले. त्यांची समता आणि बंधुता ही मूल्ये मोकाट नाहीत. त्यांच्यावर भगिनीत्वाचे आणि बंधुत्वाचे नियंत्रण आहे, म्हणून समतेला स्वातंत्र्यापासून धोका संभवत नाही आणि स्वातंत्र्याला समतेची भीती वाटत नाही. एका ठिकाणाला चिकटून राहू नका. नवनव्या आव्हानांना आणि बदलांना सामोरे जा. त्यांच्याशी सामना करताना त्यांच्यावर मात करता येईल अशी स्वतःची सतत पुनर्रचना करा. प्रॅग्मॅटिस्ट व्हा. परस्परांना उपकारक ठरणारे सर्वांचे हित महत्त्वाचे आहे. त्यासाठी आवश्यक त्या विधायक साधनांची सतत निर्मिती करा, असे भारतीय तत्त्वज्ञांचे तत्त्वज्ञान सांगते.

ही भारतीय परंपरा वैज्ञानिक दृष्टीवर पोसलेली आहे. या परंपरेने गणराज्ये किंवा लोकशाही पुरस्कारिली. कुठल्याही प्रकारच्या, कुठल्याही क्षेत्रातील वर्चस्वाला आणि वर्चस्वाने, हुकूमशाहीने नियंत्रित होणाऱ्या मानवी व्यवहारांना तिचा विरोधच आहे. फॅसिझम आणि परलोकवादाचा अख्खा प्रकल्पच या भारतीय परंपरेला मान्य नाही. चातुर्वर्ण्य नावाचे वैदिकांचे अर्थशास्त्र,नीतीशास्त्र, राज्यशास्त्र आणि समाजशास्त्रही कर्मविपाकावर म्हणजे विषमतेवरच उभे होते आणि कर्मविपाक तर शोषितांना शोषकाचा पत्ता लागू नये, असा दुष्ट कटच होता. भारतातील श्रमपरंपरेने या कटाला सतत विरोधच केलेला आहे. श्रमणपरंपरा उरात वागवणाऱ्या भारतीय जीवनशैलीने श्रमिकांचे विभाजन केले नाही. समाज खुला राहील, परिवर्तनशील राहील याची काळजी या जीवनशैलीने घेतली. तर्कतीर्थ म्हणतात त्या वैदिक

संस्कृतीपेक्षा विज्ञानशील, जात, वर्ग आणि लिंगभावविहीन भारतीय संस्कृती पूर्णतः वेगळी आहे ! या दोन संस्कृती कोणत्याही पातळीवर एकत्र येऊ शकत नाहीत. या दोन संस्कृती केवळ वेगवेगळ्याच नाहीत, तर त्यांच्यात टोकाचा विरोधही आहे.

ही भारतीय संस्कृती म्हणजे समग्रहितैषी असा मानवी जीवनाच्या सौंदर्याचा सिद्धान्तच आहे. मूलतःच हा सौंदर्यसिद्धान्त आधुनिक आहे. म्हणून नवनव्याने निर्माण होणाऱ्या आधुनिकत्वाच्या महाकथनाचे स्वागतच तो करतो. हा मूल्यसिद्धान्त कोणालाही हिरॅक्लिटस, थेलीस, सॉक्रेटिस, पायथॅगोरस, मार्क्स, देकार्त, सार्त्र, आइनस्टाइन, व्हॉल्टेअर, जॉन ड्युइ, ग्राम्ची, फ्यूअरबा अशा हजारो हजार प्रकाशगोलांना उराशी कवटाळायला सांगतो. विज्ञानशीलता जिथे असेल, माणसांना समन्यायाकडे घेऊन जाणारे जे जे असेल ते ते तुमचे आहे. तुमची ताकद वाढवणारे आहे, असे समजा असा हा भारतीयत्वाचा मूल्यकोश सांगतो. हाच मूल्यकोश भारतीय संविधानात गुंफला गेला आहे.

चांगल्या गोष्टी चांगल्या गोष्टींची शक्ती वाढवितात. परिवर्तनाला परिवर्तन, गतीला गती आणि सौंदर्याला सौंदर्य समृद्ध करते. भारतीयत्वाचा मूल्यकोश संपूर्णच मानवतेला समन्याय देणारा आणि समसन्मान देणारा आहे आणि जगातली मानवहितैषी सर्वच सत्ये या मूल्यकोशाला बंधुसत्ये वाटतात. म्हणून सत्याने सत्याला घाबरायचे नसते. म्हणून जगातील विधायकतेला भारतीय मूल्यकोशातली विधायकता घाबरत नाही कारण भारतीयत्वाची प्रकृती असीम प्रज्ञान हीच आहे.

सर्वांना समान न्याय, सर्वांना सन्मान हाच या भारतीयत्वाचा गाभा आहे. न्याय हे सर्वच इष्ट मूल्यांचे मूल्य आहे. Survival of the fittest किंवा बळी तो कान पिळी या सामाजिक डार्विनिझमच्या विरोधात हा समन्यायाचा सिद्धान्त आहे. हा सिद्धान्त केवळ भारतीय जीवनाच्या सौंदर्याचा सिद्धान्त नाही तर तो एकूण वैश्विक जीवनाच्या सौंदर्याचा सिद्धान्त आहे. इथपर्यंत आपण प्रत्यक्ष मानवी जीवनाचे सौंदर्यशास्त्र मांडण्याचा प्रयत्न केला आता या पुढल्या भागात संक्षेपाने 'साहित्याचे Aesthetics of Justice' मांडण्याचा प्रयत्न करू. त्याआधी न्याय या संकल्पनेचे स्वरूप स्पष्ट करून घेऊ-

न्याय (जस्टिस) ही अत्यंत व्यापक संकल्पना आहे. भारतीय संविधानाच्या उद्देशपत्रिकेत एक मध्यवर्ती नीतितत्त्व म्हणून तिचा अंतर्भाव झालेला आहे. जीवनाच्या सर्वच क्षेत्रांमधील सभ्यता न्याय या नैतिक तत्त्वातच सामावलेली आहे. नीतिमीमांसेमधली ती मूलभूत संकल्पना आहे. एक व्यक्ती- एक मूल्य हा या संकल्पनेचा गाभा आहे. सर्व मानवांना समान सन्मानमूल्य अशी या संकल्पनेची इच्छा आहे. कुठल्याही समाजात कुवत, अभिरुची अशा बाबतीत माणसांमध्ये कमीअधिक तरतमता असते. ही जीवनातली विविधता समंजसपणे समजावून घ्यावी लागते. या विविधतेला विषमतेत ढकलायचे की, या विविधतेला सलोख्याचे सूत्र द्यायचे हे समाजातील शहाण्या लोकांनी ठरवायचे असते. कुवत आणि अभिरुची या गोष्टी गतिमान असतात. कुठल्याही वयात, कुठल्याही वळणावर या गोष्टींमध्ये नवलाचे बदल घडून येऊ शकतात. प्रारंभी सामान्य कुवतीची वाटणारी माणसे आयुष्याच्या उत्तरार्धात असामान्य कामे करून जातात. माणसांच्या आवडीनिवडींमध्येही मूलभूत पातळीवरची स्थित्यंतरे घडून येतात. डीएनए आणि जनुकांचे आशय, दिशा आणि कलही बदलता येतात. ही बाब स्टीफन हॉकिंगसारखा शास्त्रज्ञही सांगतो.

शिवाय वर म्हटली ती विविधता नेहमीसाठी अपरिवर्तनशीलच असते, असे ठामपणे म्हणता येत नाही. विज्ञानच सांगते की, सर्व अनित्य आहे. सर्वच सतत परिवर्तनशील आहे आणि बुद्धांनीही ही बाब अडीच हजार वर्षांपूर्वी सांगितली आहे. याचा अर्थ असा की, माणसांच्या कुवतीची निश्चित उत्तरे देता येणे अवघड आहे. संधी मिळाली, योग्य त्या साधनसुविधा मिळाल्या आणि माणूस जिद्दीला पेटला, तर कुवत आणि आवडीनिवडी या गोष्टींची नवी रूपे साकार होऊ शकतात.

याचा अर्थ व्यक्तीला सर्व प्रकारच्या संधी उपलब्ध करून द्याव्यात. जात,वंश धर्म, संपत्ती, मानमरातब अशा गोष्टींमुळे निर्माण होणारी विषमता नष्ट करता येते. विविधतेला विषमतेच्याच तुरुंगात टाकण्यापेक्षा सर्वांना पंख उपलब्ध करून द्यावेत आणि उडण्यासाठी आकाश मोकळे करून द्यावे. समान वाटप, समान संधी सर्वांना उपलब्ध करून देण्याची गरज ही न्याय या तत्त्वाची अटच आहे. सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक वा राजकीयदृष्ट्या व्यक्ती दुर्बल ठेवल्या गेल्या असतील, तर त्यांना जबाबदारीपूर्वक इतर सबलांसोबत आणण्यासाठी जीवनाने

योजना आखाव्यात. असे झाले, तर एक व्यक्ती एक मूल्य या तत्त्वाचा सौंदर्यसोहळा व्यक्तींना अनुभवता येईल. समाजात न्याय प्रस्थापित व्हावा, कोणावरही अन्याय होऊ नये, विविधतेचा सन्मान व्हावा, सर्वांना सर्व प्रकाशवाटा मुक्त असाव्यात हे न्यायाच्या तत्त्वाचे ध्येय आहे. स्वातंत्र्य, समता, बंधुता, आर्थिक, सामाजिक, राजकीय समान हक्क, स्त्री-पुरुष समानता, सर्वांना शिक्षणाची आणि विकासाची उदंड संधी अशा मूल्यांनी न्यायाची रचना केलेली आहे.

सर्वांना समान न्याय मिळावा असे या न्यायतत्त्वाचे म्हणणे असले तरी भूतकाळात धर्मसंस्थेने आणि समाजसंस्थेने सामाजिक, आर्थिक आणि स्त्री-पुरुष विषमतेला पावित्र्य दिलेले असले. म्हणजे विविधतेला, विषमतेला आणि अन्यायाला पवित्रच मानलेले असते. निसर्गतः माणसे स्वतंत्र म्हणूनच जन्माला येतात. पुढे वर्चस्वप्रस्थापक धूर्त टोळी त्यांना वेगवेगळ्या बंधनात टाकते. विविधतेला विषमतेत रूपांतरित करते. हजारो वर्षांच्या संस्कारांमुळे आणि देव-दैवाच्या भीतीमुळे बहुतांश स्त्री-पुरुष माणसे विषमतेलाच अपरिवर्तनीय वास्तव, अन्यायालाच न्याय आणि दास्यालाच नैसर्गिक मानत असतात आणि वर्चस्ववाद्यांच्या राजकारणानुसारच हे चाललेले असतेच; पण या गुलामीची, अन्यायाची, फसवणुकीची जाणीव करून देणारे तेजोनिधी समाजात वेळोवेळी येतातच आणि न्यायासाठी, मानवी सन्मानासाठी आरपारच्या चळवळी सुरू होतात. समाज बदलत जातो. हा सन्मान माणसांना समाजात निर्भयपणे वावरायची ऊर्जा देतो; पण या निर्भय सन्मानाचेच भय सत्तापीठे घेतात आणि या निर्भय सन्मानावर गोळ्या झाडल्या जातात.

न्याय ही पूर्णतः वैश्विक संकल्पनाच आहे. याचा अर्थ ती कुठल्याही विशिष्ट देश-काल वा परिस्थितीपुरती मर्यादित नाही. शिवाय अखिल मानवी जीवनाला कवेत घेणारी ही संकल्पना जीवनाच्या सर्वच अंगांची सभ्यता प्रतिपादन करते. सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक, राजकीय, वाङ्मयीन अशा सर्वच क्षेत्रांमध्ये सद्भावाची, सौहार्दपूर्ण सहभावाची प्रस्थापना हा संपूर्ण आशय या संकल्पनेत आहे. या संकल्पनेला कोणत्याही पातळीवरची विषमता, दुय्यमता, दास्य, तरतमभाव वा भेद पूर्णतः अमान्य आहे.

संपूर्ण मानवी जीवनातील, जीवनाच्या सर्वच व्यवस्थामधील अन्यायाचे निर्मूलन हेच या संकल्पनेचे ध्येय आहे. ज्या श्रद्धांमुळे, संस्कारांमुळे वा ज्या मनोरचनांमुळे व्यक्तींना आपण कोणावर अन्याय करतो आहोत हेच कळत नाही त्या व्यक्तींच्या मनाची संपूर्ण पुनर्मांडणी (Reconstruction) करणे हे न्याय संकल्पनेचे ध्येय आहे.

जातिव्यवस्था, धर्मव्यवस्था वा वंशव्यवस्था या सर्वच व्यवस्था समाजमने दुभंगवून ठेवतात. समाजाची विभागणी अहंकारी बेटांमध्ये, परस्परद्वेषी आणि धुमसत्या झगड्यांमध्ये करून ठेवतात. हा न्यायालाच नकार असतो. ही न्यायबंदीच असते आणि हे अन्यायाला मोकाट सोडणेच असते. वरील सर्व व्यवस्थांची निर्मिती करणाऱ्या देव, धर्म, धर्मग्रंथ, तत्त्वज्ञाने आणि साहित्य अशा सर्वच गोष्टी मग मानवी जीवन दुभंगवून टाकणाऱ्या अन्यायाचीच भूमिका करीत असतात.

न्याय हा मानवी सौहार्दाचा, Wisdom चा, स्वातंत्र्याचा, समतेचा, भगिनीत्वाचा आणि बंधुत्वाचा सर्वहितैषी प्रबंध आहे. त्याला आपण मानवी जीवनाच्या सौंदर्याचा सामंजस्य करार म्हणू शकतो.

न्याय हा एकूणच मानवी जीवनाचा गाभा आहे. अन्याय म्हणजे अनैतिकता आणि जीवनाच्या कोणत्याही क्षेत्रातील अनैतिकता न्याय या संकल्पनेला अजिबात मान्य नाही. समता, स्वातंत्र्य, शोषणमुक्ती, धर्मस्वातंत्र्य, सांस्कृतिक आणि शैक्षणिक अधिकार, समान संधी, सन्मानाने जीवित राहणे असे हे अधिकार प्रत्येक व्यक्तीला जन्मानेच प्राप्त होतात. या सर्वच अधिकारांचा अंतर्भाव न्याय या संकल्पनेत होतो. जीवनातील सर्वसमावेशक इष्टांचा, सर्वांच्या समान सन्मानाचा अंतर्भाव न्याय या संकल्पनेत होतो. न्याय हा एकूणच नीतिव्यवहाराचा प्राण आहे. कोणावरही कुठल्याही प्रकारचे दुय्यमत्व लादले जाणार नाही आणि कोणाच्याही साकल्याचा सन्मान करणाऱ्या स्वातंत्र्यावर अन्याय होणार नाही, असे न्याय या संकल्पनेचे स्वरूप आहे.

'न्याय' हे मूल्य म्हणजे मूल्यांचे मूल्य आहे वा इतर मूल्यांचा आशय निश्चित करणारे मूल्य आहे असेच म्हणायला हवे. याचाही अर्थ ते पायाभूत वा इतर मूल्यांना अर्थ देणारे उगममूल्य आहे असा होतो. न्याय या संकल्पनेचा आशय निश्चित झाला की, इतर सर्वच



अनुक्रमणिका

संकल्पनांचे आशय निश्चित होतात. न्याय या संकल्पनेला समन्याय, सर्वांना समान सन्मान, सर्वांना एकमूल्य असा अर्थ दिला की, हाच अर्थ पुढे नेणाऱ्या संकल्पनांची एक युद्धछावणी तयार होते.

या संकल्पनेच्या विरोधात वैदिक- ब्राह्मणी परंपरेने न्यायाची वेगळी कल्पना मांडली आहे. तिला धर्माचा, अध्यात्माचा आधार आहे. चातुर्वर्ण्य आणि आपापल्या वर्णजातीत निष्ठेने जगणे ही श्रेणीबद्ध विषमतेवर आधारलेली न्यायाची कल्पना आहे. इथे विषमतेवर आधारलेली न्यायाची कल्पना आहे. इथे विषमतेला, शोषणाला न्याय म्हटले जाते. ही न्यायाची संकल्पना पुरुषार्थावर आधारलेली अन्यायाचीच संकल्पना आहे असे आपण मानतो, आणि या अन्याय कल्पनेच्या विरोधात आपण एक व्यक्ती- एक मूल्य, सर्वांचा समान सन्मान ही समन्यायाची संकल्पनाच न्यायाची खरी संकल्पना मानतो. या संकल्पनेलाच आपण भारतीय म्हणतो. पुढल्या भागात आपण या मानवी न्यायाचा इहवादी सौंदर्यसिद्धान्त मांडण्याचा प्रयत्न करू.

तत्त्वज्ञानामध्ये, साहित्यामध्ये आणि साहित्येतर कलांमध्येही वेगवेगळ्या आणि विरोधीही हितसंबंधांची अभिव्यक्ती होत असते. जीवनातले असे प्रत्येकच आविष्कारक्षेत्र एकेक संघर्षभूमीच असते. जे समाजाच्या जाणिवेत आणि नेणिवेत असते तेच त्याच्या वरील सर्व आविष्कारांमधून व्यक्त होते. जीवन म्हणजे समाजातील वेगवेगळ्याच नव्हे तर परस्परविरोधीही हितसंबंधांच्या युद्धांचीच भूमी असते. हे सघर्ष साहित्यात येत नसतील, या संघर्षाचे जीवनाला अधिक उज्ज्वलतेकडे नेणारे भाष्य येत नसेल, तर ते साहित्य खोटंही असते, निरर्थकही असते आणि म्हणून ते विघातकही असते. साहित्य म्हणजे काय? श्रेष्ठ साहित्य म्हणजे काय? साहित्याचे साहित्यत्व वा त्याचे श्रेष्ठत्व ठरवता येईल असे निकष कोणते? या प्रश्नांचा विचार आपल्याला करावाच लागतो.

अशा साहित्यविषयक प्रश्नांची चर्चा सतत होत आली आहे. मुळात व्यवस्था आणि व्यवस्थेत ज्यांचे मूलभूत मानवाधिकार नाकारले जातात त्यांच्या मानवाधिकारांच्या प्रस्थापनेसाठी व्यवस्थांतर असा हा झगडा असतो. या अनुषंगाने साहित्यविषयक सर्वच प्रश्नांची वेगवेगळी उत्तरं येतात आणि त्यांची वेगवेगळ्या पण प्रमुखतः दोन गटात विभागणी करता येते.

साहित्य आणि जीवन, साहित्य आणि समाज, साहित्य आणि समाजातील हितसंबंध, साहित्य आणि समाजातील निरनिराळ्या आणि परस्परविरोधी हितसंबंधाच्या विचारसरणी यांच्यातील संघर्ष या मार्गाने साहित्यविचार आजवर अधिक काटेकोर होत आला आहे. समाजात वेगवेगळेही आणि परस्परविरोधीही हितसंबंध असतात आणि त्यांच्या तशाच विचारसरणींचा संघर्ष समाजात असतो. या संघर्षाचे चित्र साहित्यात यावे लागते आणि साहित्यनिर्मात्याने जीवनाच्या सांस्कृतिक निरोगीपणाचा उजेड निर्माण करायचा असतो. जीवन आहे तसे मांडणे हे साहित्यिकाचे काम नव्हे. जीवन प्रत्यक्षात असते ते

**'भारतीयत्व' या संकल्पनेचा अर्थ 'मानवी न्याय' हाच आहे. भारतीयत्व हा मानवी जीवन सतत उन्नयनशील ठेवणाऱ्या वैश्विक मूल्यांचा एक कोश आहे. भारत हे आपल्या देशाचे नाव आहे आणि ते केवळ एका भूखंडाचे नाव नाही. पृथ्वीच्या पाठीवरील एखाद्या विवक्षित भूभागाचे वा जमिनीच्या काही क्षेत्रफळाचे केवळ ते नाव नाही. भारत हे मानवी जीवनाला सतत उज्ज्वल करीत राहणाऱ्या महान मूल्यप्रबंधाचे नाव आहे. भारताच्या याच मूल्यमयतेच्या महानतेचा निर्देश आपण भारतीयत्व या संकल्पनेने करतो.**

वर्चस्ववाद्यांनी निर्माण केलेले त्यांच्या सोयीचे, त्यांच्या हितसंबंधांची जपणूक करणारे असते. साहित्यिक सर्वांच्याच हितसंबंधांची न्याय्य जपणूक करणाऱ्या जीवनाच्या दिशा मांडतो. जीवन आहे तसे मांडणे हा शोषकाच्या सोयीचे वा हिताचे साहित्य निर्माण करण्याचा मुद्दा आहे. हा प्रतिबिंबवाद मूलतःच अन्यायाची तरफदारी करतो. म्हणून आहे त्या शोषकधार्जिण्या वास्तवाचा पर्याय वा जीवनाला अधिक सुंदर करणारा पर्याय साहित्यिक निर्माण करीत असतो.

मानवी न्यायाच्या सौंदर्यसिद्धान्ताला केवळ घटनेचे वा प्रसंगाचे वर्णन अभिप्रेत नसते, तर त्या घटनेमागील वा

प्रसंगामागील सत्यापर्यंत पोचणे त्याला महत्त्वाचं वाटते. याचा अर्थ साहित्यकृतीत परिस्थितीचे चित्रण तर यावेच; पण ती परिस्थिती निर्माण करणाऱ्या कारणाचा शोध साहित्यिकाने घ्यावा, असे आपल्या सौंदर्यसिद्धान्ताला वाटते. सत्याचा शोध घेण्याच्या प्रक्रियेत जीवनभाष्यही असते आणि विद्यमान सदोष जीवनाला अधिक उज्ज्वल पर्यायही असतो.

अन्यायाचा, खोटेपणाचा, फसवणुकीचा, एकाधिकारशाहीचा, ढोंगाचा, शोषणाचा, विषमतेचा वा हिंस्रतेचा पराकोटीचा संतापच वाचकांना येईल असा शब्द साहित्यिकाने लिहावा. साहित्यिकाने असत्य नागडे करावे आणि सत्याची प्रतिष्ठा अजिंक्य रूपात मांडावी. असत्याला सत्य म्हणून प्रतिष्ठित करणाऱ्या प्रवृत्तींचा दुष्टपणा साहित्यिकाने मांडायला हवा आणि असत्याचा वा

**बाबासाहेब आंबेडकरांची जयंती साजरी करायची की नाही या प्रश्नावरून कम्युनिस्टांमध्ये वादावादी झाली होती. 'जग बदल घालुनी घाव, सांगून गेले मला भीमराव' हे गीत अण्णाभाऊंनी लिहिले तेव्हा त्याचा जाब अण्णाभाऊ साठेंना विचारला गेला होता. बाबासाहेबांवर अण्णाभाऊंनी हे गीत लिहिले हाच वादाचा मुद्दा नव्हता, तर १९३८ च्या मनमाडच्या भाषणातील बाबासाहेबांची द्विविध शोषणाची भूमिका अण्णाभाऊ साठेंनी सन्मानिली होती हाही राग असावा. या गीतात सर्वच परिवर्तनवाद्यांच्या एकजुटीचा प्रस्ताव आहे. समन्याय हाच समाजरचनेचा निष्कर्ष असावा.**

अन्यायाचा आदर वाटेल, असे साहित्य लेखकाने निर्माण करू नये असे आपल्या सौंदर्यसिद्धान्ताला वाटते.सत्य हे सर्वांच्या समान हिताचे असते, सर्वांना सारख्याच आस्थेने उराशी कवटाळते, मळ्यास माझ्या कुंपण पडणे अगदी न मला साहे असे केशवसुतांप्रमाणे म्हणणाऱ्याला सत्य म्हणवून घेण्याचा अधिकार असतो. 'सत्य' हे कधीही कोणासाठीही अन्यायकारक ठरू शकत नाही. या सत्याकडेच विचारांनी, भावनांनी आणि ज्ञानाने जायचे असते. असं आपला मानवी न्यायाचा सौंदर्यसिद्धान्त मानतो.

कलावादी वा अलौकिकतावादी समीक्षेत अभिव्यक्तीला, आकृतीला, रूपाला, घाटाला वा रचनाबंधाला साहित्यकृतीच्या सौंदर्याचा निकष मानले गेले. म्हणजे त्यांना सौंदर्यमूल्ये मानले गेले आणि आशयाचे अस्तित्व या सर्व सौंदर्यचर्चेतून बाद ठरविले गेले. हे उगीच घडले नाही. वर्चस्ववाद्यांच्या हितसंबंधांची जपणूक करणाराच हा साहित्यविचार होता. वर्चस्ववाद्यांच्या शोषणाला धक्का लागणार नाही आणि त्यांच्या हिताची समाजरचना कायम पवित्र आणि न बदलणारी समजली जाईल याची तरतूद करणारा हा साहित्यविचार होता.

आपण साधा प्रश्न निर्माण असा करू की, अभिव्यक्ती कशाची. आकृती निर्माण करायची आहे त्या आशयाची उपस्थिती असल्याशिवाय रचनेसंबंधीच्या वरील सर्व गोष्टींचे अस्तित्वच संभवत नाही म्हणून आशयाच्या अस्तित्वाची अपरिहार्यता सांगणारा साहित्यविचार झुंजत पुढे आला आणि आजवर तो अधिकाधिक काटेकोर होत गेला. आशयनिष्ठ साहित्यविचार आला आणि मानवी जीवनातील हितसंबंधांची चर्चाचिकित्सा अपरिहार्य ठरली. जीवन जर हितसंबंधाचे युद्ध असेल, तर जीवन हे हितसंबंधांच्या विचारसरणींचेही युद्ध ठरते. आता चिकित्सा आली. वर्गविचार आला. आहे त्या व्यवस्थेला नकार आला. पर्यायाची संकल्पने आली. न्याय्य - अन्याय्य या पातळ्यांवरून हितसंबंधांची, विचारसरणींची चिकित्सा आणि समीक्षा आली. अशी समीक्षा आली, की परिवर्तनाला नैतिकता प्राप्त होते. जीवनाच्या उज्ज्वलतेकडे जाणारा प्रवास सुरू होतो. पुनर्रचना सुरू होते. जीवनाच्या अधिक चांगल्या, अधिक उपकारक रूपाच्या निर्मितीची प्रक्रिया सुरू होते.

मग साहित्य आणि तत्त्वज्ञान, साहित्य आणि विचारसरणी अशी सैल वा ढोबळ पातळीवरची चर्चा ती राहत नाही. तत्त्वज्ञानाचा हितसंबंधवर्ग, तत्त्वज्ञानाचा विचारसरणीवर्ग लक्षात घेतला जातो. तत्त्वज्ञानांमधील आणि विचारसरण्यांमधील विचारसंघर्ष वा त्यांच्यातील मूल्यसंघर्ष चर्चेला घेतला जातो. मग वर्चस्ववाद्यांच्या



अनुक्रमणिका

हिताला परम मानून त्यांच्यापाशी थांबलेली तत्त्वज्ञाने आणि त्यांच्या घरी पाणी भरणाऱ्या विचारसरणी गुन्हेगार ठरवल्या जातात. त्यांचे उद्देश लक्षात घेतले जातात आणि त्यांच्याविरुद्ध संघर्ष चेतवले जातात. थांबलेली तत्त्वज्ञाने आणि विचारसरणी शोषकांच्या रचना, आकृती, घाट, रूप या फसवणुकीपाशी थांबतात. या रचनांना वा घाटांनाच मग व्यवस्थेचे भाट साहित्य वा महान साहित्य मानतात.

आशयनिष्ठ साहित्यविचार सर्वसमावेशक असतो. तो सर्वांच्या समान सन्मानाचा ध्यास घेतो. Survival of the fittest म्हणजे बळी तो कान पिळी या स्थितीला हर्बर्ट स्पेन्सर सामाजिक डार्विनिझम म्हणतो. वर्चस्ववाद्यांची, म्हणजे शोषकांची म्हणजे बलवानांची तत्त्वज्ञाने बहुसंख्य लोकांचे कान पिळणारी म्हणजे त्यांचे शोषण करणारीच असतात. हा सामाजिक न्याय नसतो. तो सामाजिक अन्यायच असतो. म्हणून 'बळी तो कान पिळी' हे तत्त्वज्ञान वा विचारसरणी बळी तो कान पिळी साहित्यविचारच जन्माला घालत असते.

साहित्यात जीवनाचे चित्रण येते. याचा अर्थ साहित्यात माणसांच्या सामाजिक, आर्थिक अशा सर्वच पातळ्यांवरील संबंधांचे चित्रण येते. साहित्यात एका जातीगटाचे वा वर्गाचे चित्रण येत नाही, तर या जातीगटांच्या संबंधांचे वा वर्गांच्या संबंधांचे चित्रण आणि मूल्यन येते. हे मानवी संबंधांवरचे विवेकी भाष्य असते. कोणीतरी अन्याय करणारा असल्याशिवाय अन्यायग्रस्त वर्ग निर्माण होत नाही.

ही बायनरी म्हणजे दुय्यम आणि प्रधान अशी वर्गरचनाच असते. साहित्य म्हणजे संबंधभाष्य! मानवी संबंधाचे अत्यंत पायाभूत असे अवलोकन, आकलन, मूल्यन आणि अन्वर्थन ते असते. या अन्वर्थनात आहे त्या रुग्ण संबंधांपेक्षा नव्या निरोगी मानवी संबंधांचे सूचनही असते. भाष्य याचा अर्थ जे आहे त्याच्या इष्टानिष्टांची मांडणी असा आहे. भाष्यात अनिष्टाला नकार, इष्टाची पाठराखण असते. इष्ट म्हणजे पर्याय! इष्टाची पाठराखण म्हणजे पर्यायाची पाठराखण. साहित्य या अर्थाने जीवनभाष्य असते. साहित्यात द्विविधतेतील वा बहुविधतेतील समजुतींचा, श्रद्धांचा वा मूल्यांचा मूलभूत संघर्ष असतोच. या अर्थाने साहित्य ही युद्धमीमांसाच असते.

मूल्यचित्रणाला, त्यातील इष्टानिष्ट मूल्यांच्या संबंधचित्रणाला एक अनोखी शक्ती प्राप्त होते. ही शक्ती सत्याची असते. हे सत्य वैश्विक वा सर्वसमावेशकच असते म्हणून ते वैश्विकसत्यच असते. हे सत्य सर्वन्यायाच्या पायावर उभे असते. मानवी सौहार्दावर, असीम सद्भावावर वा असीम Wisdom वरच हे सत्य मोहोरलेले असते. हे सत्य म्हणजे जीवनाचे मर्मच असते. हे सत्य सभ्यता झालेले असते. ते जीवनाची उज्ज्वलता झालेले असते. या Wisdom ला, या असीम सभ्यतेला वा या सर्वन्यायाला आपण सौंदर्य म्हणायला हवे.

हे सत्य वा हे सौंदर्य प्रकट करण्याची ताकद साहित्यिकाच्या प्रतिभेत तेव्हाच येते ज्यावेळी साहित्यिकाची जाणीव आणि नेणीवही सर्वच चौकटींच्या सीमा ओलांडून मुक्त मनुष्यमय होते. या अवस्थेचे नाव सीमोल्लंघन असेच असते. या सत्याचे, या सौंदर्याचे आणि मानवी सन्मानाचे निशाण साहित्यिकाला आपल्या शब्दांच्या खांद्यावर देता मात्र यायला हवे.

Black is beauty असे एक वाक्य निग्रो साहित्यात प्रसिद्ध आहे. मला असे वाटते की, यातला काळा रंग म्हणजे सौंदर्य नव्हे. ब्लॅक माणसांना इतरांना मिळणारा सन्मान समान पद्धतीने मिळावा यासाठी उभा राहणारा लढा म्हणजे सौंदर्य! समन्यायाची प्रस्थापना करण्यासाठी दिली जाणारी झुंज म्हणजे सौंदर्य! एखादा रंग म्हणजे सौंदर्य नव्हे तर रंगभेदाच्या निर्मूलनासाठी होणारे आंदोलन म्हणजे सौंदर्य होय, असे म्हणता यायला हवे. काळेपण म्हणजे सौंदर्य नव्हे; पण या काळेपणाला सन्मान प्राप्त करून देणाऱ्या स्वातंत्र्याचा स्वीकार म्हणजे सौंदर्य होय. स्वातंत्र्याची हत्या करणाऱ्या शोषकांच्या तत्त्वज्ञानाचा स्वीकार म्हणजे सौंदर्य नव्हे, तर काळ्या माणसांच्या स्वाभिमानाची आणि सन्मानाची उत्कट अभिव्यक्ती म्हणजे सौंदर्य होय, असे मला नम्रपणे सांगावेसे वाटते.

भारतीयत्व या संकल्पनेचा मानवी न्याय हाच अर्थ आहे. शिवाय न्याय या संकल्पनेत बंधुता, भगिनीता, समता, स्वातंत्र्य या सर्व संकल्पनांचा अंतर्भाव आहेच. शिवाय इहवाद, विज्ञानशीलता या तत्त्वांच्या पायावर उमलणारी मानवी न्यायाची वास्तू आपल्या नजरेत आहे. मानवी जीवनाला सुंदर करणाऱ्या या मूल्यांवर अधिष्ठित साहित्याचे सौंदर्य आपल्याला निश्चित करता यायला हवे. असे झाले, तर आपल्याला अभिप्रेत साहित्याचे इहवादी सौंदर्य कलावादी मानतात तसे रचनेचे, रूपाचे वा आकृतीचे निश्चितच असणार नाही.

रससिद्धान्त असो वा कोणताही आकृतीवादी सौंदर्यसिद्धान्त कुठल्या ना कुठल्या विचारसरणींशी बांधलेले असतातच. महाराष्ट्रातले वा भारतातले हे सर्व सौंदर्यसिद्धान्त चैतन्यवादाच्या खुंटाला बांधलेले आहेत आणि ते पुरुषार्थाच्या नियंत्रणात दुष्ट खेळ मांडतात. चैतन्यवाद म्हणजे देवदैववाद वा अध्यात्म! हे सर्वच सिद्धान्त त्यांना पवित्र वाटणाऱ्या समाजरचनामूल्यांचा प्रकट-अप्रकट पद्धतीने पुरस्कार करीतच असतात. मराठीतले लयाकृतीवाले देवदैववादी आहेत आणि रससिद्धान्तवालेही तसेच आहेत.

पण हे सर्व आनंदवादी, आकृतीवादी वा रसवादी लोक विचारसरणीला विरोध करतात. ते त्यांची विचारसरणी मानतातच. ती विचारसरणी वर्चस्ववाद्यांच्या सोयीची असतेच. ते त्यांच्या धुरीणांच्या विचारसरणीला विरोध करीत नाहीत; पण विचारसरणीला विरोध करतात याचा अर्थ ते त्यांच्या सोयीची समाजरचना बदलणाऱ्या विचारसरणीला विरोध करतात, असा असतो.

बारकाईने बघितले, तर कलावादाच्या वा अलौकिकतावादाच्या या सर्वच सिद्धान्तकारांचा विरोध प्रकटपणे वा अप्रकटपणे भारतीयत्वाच्या मूल्यव्यूहाला असतो म्हणजे सर्वन्यायाच्या किंवा सर्वांना समान सन्मानाच्या विचारसरणीला असतो ही गोष्ट आपल्या लक्षात येते.

म्हणजे कलावादाच्या कुटुंबातले सर्व सौंदर्यविचार मूठभरांच्या हिताचे सौंदर्यविचार असतात. म्हणूनच आपण या मूठभरांच्या बाहेर असलेल्या विराट जगसागराच्या हिताचा सौंदर्यविचार मांडायचे साहस करीत आहोत. या विराट जनसागरात संपूर्ण स्त्रिया येतात आणि दुय्यम, अंकित वा वंचित ठेवले गेलेले भारतातलेही आणि जगातलेही सर्व जन येतात. पहिल्या पातळीवर यात जाती, धर्म, लिंगभाव, वंश यांच्या निर्मूलनाचा विचार आहे आणि दुसऱ्या पातळीवर वर्गांच्याही निर्मूलनाचा विचार आहे. म्हणजे जातिविहीन, निधर्मी, वर्गविहीन आणि लिंगभावविहीन असा इहवादी समाज ज्या सौंदर्यसिद्धान्ताला अभिप्रेत आहे त्याला भारतीय वा सर्वन्यायाचा विचार आपण मानू वा सर्वांच्या समान सन्मानाचा विचार मानू.

म्हणजे मानवी न्यायाचा सौंदर्यविचार हा सर्वांच्याच मानवी सन्मानाच्या प्रस्थापनेचा सौंदर्यविचार आहे. हीच या सौंदर्यविचाराची विचारसरणी आहे आणि ती वैश्विक वा आंतरराष्ट्रीय जीवनाच्या नवनिर्माणाची आणि साहित्यसौंदर्याच्या फेरमांडणीचीही विचारसरणी आहे.

आपण आपल्या या भारतीय सौंदर्यविचाराला 'मानवी न्यायाचा सौंदर्यसिद्धान्त' असे म्हणतो. कोणत्याही जाती, धर्माच्या वा एखाद्या विवक्षित तत्त्वज्ञानाच्या नावाने आपण हा सौंदर्यसिद्धान्त मांडत नाही, तर जगातील अनेक तत्त्वज्ञान्यांनी जी जीवनन्यायाची तत्त्वज्ञाने मांडली त्या सर्वांना अन्याय निर्मूलनाच्या वैश्विक धाग्यात गुंफतो आहोत. मानवी न्याय, इहवाद आणि विज्ञानशीलता या सर्वांना कवेत घेणारा हा सिद्धान्त आहे आणि न्यायावर हक्क सांगू इच्छिणाऱ्या सर्वांनीच या Wisdom चाच पिसारा व्हावे, असे आपल्याला वाटते.

मानवी न्यायाचा सौंदर्यसिद्धान्त हा या न्यायालाच जीवनाच्या आकलनाचे, अन्वर्थनाचे आणि मूल्यनाचे तत्त्व मानतो. या तत्त्वाच्या निकषानेच साहित्यिक जीवनाची रचना तपासतो. या रचनेवर इष्ट-अनिष्ट, विघातक-विधायक, सार-असार या अनुषंगाने भाष्य करतो. या तपासणी प्रक्रियेतच साहित्यिकाच्या प्रतिभेला जीवनाची मर्मे प्राप्त होतात. या मर्मांचाच आविष्कार साहित्यिक आपल्या साहित्यातून करतो.

मानवी न्यायाचा सौंदर्यसिद्धान्त आशय आणि आकृती अशी दोनता मान्यच करीत नाही. आशयाचे आणि बंधाचे वेगवेगळे सौंदर्य नसतेच कारण या दोन्ही गोष्टींमध्ये एकमय वा जैविक असेच नाते प्रस्थापित झालेले असते. आशय आकृतीमय झालेला असतो आणि आकृती आशयमय झालेली असते. ही दोनता साहित्यकृतीच्या संदर्भात संभवतच नाही. आपल्या संपूर्ण इहवादी परंपरेत जीव आणि देह यांची एकमयताच सांगितली गेली आहे. आकृतीशिवाय आशयाला साहित्यकृती म्हणता येत नाही आणि आशयाशिवाय केवळ आकृतीला साहित्यकृती म्हणता येत नाही. आशय आणि आकृतीच्या एकमयतेला, अवियोज्यतेला वा त्यांच्या परस्परात विलय पावल्याच्या तिसऱ्या मनोरम अस्तित्वाला आपण साहित्यकृती म्हणतो. या बिंदूवरच साहित्यसौंदर्याची पहाट होते.

सत्याची, न्यायाची आणि स्वातंत्र्याची फसवणूक करणारी भाषा आपल्या सिद्धान्ताला शत्रूभाषा वाटते. साहित्यिक मानवी न्यायाच्या तत्त्वाचेच सौंदर्यात रूपांतर



अनुक्रमणिका

करतो. कितीही सजविले तरी अन्यायाचे सौंदर्यात रूपांतर होत नसते. विषमतेचे, शोषणाचे, देवदैववादासारख्या घनघोर असत्याचे सौंदर्यात रूपांतर होत नसते. जीवनातील विषमतेला, शोषणाला हा सौंदर्यसिद्धान्त सौंदर्याची विरोधके वा अरिष्टे मानतो. मानवी न्यायाचा सौंदर्यसिद्धान्त डोक्यात घेणारा प्रतिभावंत संपूर्ण माणसाचे, माणसांच्या संपूर्ण जीवनाचेच आणि त्यांच्या एकूण संबंधांचेच सौंदर्यात रूपांतर करतो. म्हणून जीवनाची फेरमांडणी, पुनर्रचना वा नवरचना म्हणजे सौंदर्य होय, असे आपण मानतो. म्हणून कुरुपतेविरूद्धच्या वा जीवनातील असुंदराविरुद्धच्या बंडखोरीला आपण सौंदर्य मानतो. माणसाच्या सन्मानासाठी, स्वाभिमानासाठी आणि स्वातंत्र्यासाठी पेटणाऱ्या संघर्षाला आपण सौंदर्य मानतो. पुनर्रचनाप्रक्रियेला आपण क्रांती मानतो आणि या क्रांतीलाच आपण सौंदर्य मानतो. मानवी जीवनाची अधिकाधिक उज्ज्वल फेरमांडणी करतो त्यालाच आपण साहित्यिक मानतो आणि त्याच्या निर्मितीला आपण सौंदर्य मानतो.

मानवी न्यायाचे सौंदर्य आणि जीवनाला सुंदर करणारी नीती या दोन गोष्टी आपला सौंदर्यसिद्धान्त वेगवेगळ्या मानीत नाही. या सौंदर्यसिद्धान्ताला त्याच्या प्रॅग्मॅटिक प्रकृतीमुळे आपण पुनर्रचनेशी आणि या पुनर्रचनेच्या सौंदर्याशी जोडतो. जीवनाला थांबवणाऱ्या, जीवनाला विषमतेत ढकलणाऱ्या आणि अन्यायाचे समर्थन करणाऱ्या सर्वच मनोरुग्णांना निरोगी करणाऱ्या औषधाप्रमाणे आपला सौंदर्यसिद्धान्त आहे.

साहित्यकृतीच्या वाचनाने येणाऱ्या अनुभवाचे स्वरूप काय असते किंवा काय असावे यासंबंधीही मानवी न्यायाचा सौंदर्यसिद्धान्त म्हणतो की, हा सौंदर्यानुभव वाचकाला गंभीर आणि जबाबदार करतो कारण तो साहित्यकृतीतील जीवनाच्या सम्यक आकलनाचा अनुभव असतो. हा अनुभव मानवी जीवनासंबंधीचा विस्डम असीम करतो. मानवी सद्भाव, सौहार्द आणि सामंजस्य अधिकच गहन करणारा हा अनुभव असतो. मानवी जीवन असुंदर कशामुळे होते आणि सुंदर कशामुळे होते, ते सभ्य कशामुळे होते आणि असभ्य कशामुळे होते याचा उत्कट प्रत्यय देणारा तो अनुभव असतो. मानवी मनांना मर्यादांच्या तुरुंगांमधून मुक्त करणारा तो अनुभव असतो. विद्यमान मानवी संबंध माणसांना, त्यांच्यातील न्यायाला आणि एकूणच जीवनाला अपायकारक ठरत असतील, तर पर्यायी म्हणजे सर्वोपकारक मानवी संबंधांच्या रचनेचा तो अनुभव असतो. वाचकाच्या मनात जीवनाविषयी अगाध करुणाभाव किंवा असीम ममत्वभाव जागवणारा साहित्यकृतीचा अनुभव सौंदर्यानुभव होय हे सत्य आपला मानवी न्यायाचा सौंदर्यसिद्धान्त मांडतो.

जीवनाच्या आर्थिक, सामाजिक अशा सर्वच क्षेत्रांमधील अन्यायांपासून मुक्त जीवन म्हणजे जीवनसौंदर्य आणि या सौंदर्याचा वाचकांच्या मनात उगवणारा सम्यक उजेड म्हणजे साहित्यसौंदर्य! 'भारतीयत्व' हे या सद्सद्विवेकी सौंदर्याचे बीजाक्षरही आहे आणि या अम्लान सौंदर्याचा मूलाकारही हे भारतीयत्वच आहे. या मूलाकाराचेच नाव मानवी न्यायाचा इहवादी सौंदर्यसिद्धान्त असे आहे.

आज आपण कोणता विचार करायला हवा, कोणता विचार पुढील पिढ्यांच्या सन्मानपूर्ण जगण्यासाठी पुढे न्यायला हवा याचा गंभीर विचार करायला हवा. आपले संविधान, लोकशाही, समाजवाद आणि सेक्युलॅरिझम या गोष्टी फॅसिझमच्या अरिष्टात सापडलेल्या आहेत. हिंदूराष्ट्रवाद प्रस्थापित करण्याचे स्वप्न पाहिले जात आहे. भांडवलशाही आणि धर्मशाही या दोन गोष्टींची युती आज झाली आहे आणि आपले भारतीयत्व आणि भारतीयत्वाचा न्यायाचा जीवनादर्शच आज संकटात आहे. यावेळी आपण गंभीर होण्याची आणि भारतीयत्वाच्या निशाणाखाली सर्वांनी एकत्र येण्याची गरज आहे. या दृष्टीने राष्ट्रवादाच्या स्वरूपासंबंधी थोडक्यात विचार करू.

राष्ट्रवाद या संकल्पनेची बांधणी आधुनिक आर्थिक, सामाजिक आणि राजकीय विचारांनी केली. सुरक्षितता, बधुभाव, सहभाव आणि जगण्याचा निश्चित संदर्भ प्राप्त करून देणारी ही संकल्पना होती. ही अधिक व्यापक संकल्पना पारंपरिक सामाजिक, सांस्कृतिक, सामूहिक रचना कोसळत असताना साकार झाली. पूर्वीच्या धार्मिक-सास्कृतिक लोकसामूहिकतेची जागा राष्ट्रवादाने घेतली आणि धर्माला हादरे बसायला लागले. फ्रेंच राज्यक्रांतीनंतरच्या मूल्यसंघर्षाच्या काळात या संकल्पनेला आकार येत गेला. 'फ्रेंच राष्ट्र' या शब्दांमधून एक उत्कट सामूहिक निष्ठा आणि आशावाद प्रकट झाला.

प्रारंभकाळात म्हणजे क्रांतिकाळात स्वातंत्र्य, समता, बंधुता आणि लोकशाही ही आधुनिक मूल्ये राष्ट्रवाद या

संकल्पनेला आधारभूत होती; पण पुढे काही अल्पावधीतच फ्रेंच भाषा ही या राष्ट्रीयत्वाचा आधार झाली.

क्रांतीमध्ये विविध वर्ग सामील झाले होते. याचा अर्थ ती आघाडी वर्गातीतच होती. पुढे मात्र व्यापारी-भांडवलदार वर्गाने आणि मध्यमवर्गाने सत्तेवर ताबा मिळवला आणि त्यांच्या सोयीचा आशय त्यांनी क्रांतीला दिला. कष्टकरी आणि क्रांतिकारी जनता बाजूला ठेवली गेली. समता -बंधुता या मूल्यांपेक्षा भाषा हे सूत्र त्यांना महत्त्वाचे वाटले.

लोकशाहीचा संकोच होत गेला. राजेशाही वर यायला लागली आणि एकाधिकारशाहीशी हातमिळवणी करू लागली. व्यक्तीस्वातंत्र्य महत्त्वाचे ठरले. आर्थिक संबंध वाढविण्यासाठी महामार्गाचे जाळे निर्मिले गेले. याप्रकारे हा भांडवली विकासाचा आशय असलेला राष्ट्रीय एकजुटीचा कार्यक्रम होता.

मध्यम उद्योजक वर्ग, भांडवलदार, धार्मिक मूलतत्त्ववादी यांच्या सोयीची सामाजिक रचना तयार व्हायला लागली. राष्ट्रवाद भूमीशी जोडला गेला.

याप्रकारे भूमीशी जोडलेला, जमिनीच्या मालकीशी जोडलेला, त्याच्या अधिकाराशी, पुरुषसत्ताकाशी आणि उच्चकुलीनतेशी-उच्चवर्गाशी जोडलेला राष्ट्रवाद आला.

राष्ट्रीय व्यवहारात वंचितांकडे दुर्लक्ष करणे स्वाभाविक मानले जात होते. सर्वहारा वर्गाला देश नसतो असेही त्या वेळी म्हटले गेले. धनदांडग्यांचे, नव्या भांडवलदारांचे आणि जमीनदार वर्गाचे वर्चस्व वाढत गेले. मालदार वर्गाची सत्ता हाच प्रजासत्ताकाचा आशय झाला. परिवर्तन मूल्यांच्या जागी फ्रेंच भाषेची व फ्रेंच संस्कृतीची प्रस्थापना केली गेली. त्यामुळेच राष्ट्रवाद भाषा व संस्कृती या मार्गाने अल्पसंख्य गटाची सत्ता व वर्चस्व लादण्याचे साधन ठरला.

पश्चिम युरोपीय देशांनीच जगातल्या इतर प्रदेशांना अस्तित्व, अर्थ, इतिहास आणि संस्कृती प्रदान केली आणि त्यांना राष्ट्र म्हणून घडवले, असे मानले गेले.

युरोपीय प्रबोधनकालातून जे विचारप्रवाह आले त्यात राष्ट्र हा प्रभावी, वर्चस्वशाली विचारप्रवाह होता. या नाण्याची साम्राज्यवाद ही दुसरी बाजू होती. युरोपीय देशांच्या वसाहतींमध्ये या साम्राज्यवादाच्या विरोधात एक वेगळा राष्ट्रवाद उभा राहिला. आधी लॅटिन अमेरिकेत, मग आशिया आणि आफ्रिका खंडातील वसाहतीत तो उभा राहत गेला. आधुनिक मूल्याधिष्ठित राष्ट्रवादासोबतच वसाहतवाद व साम्राज्यवादाच्या विरोधात स्वतःच्या इतिहासातील सुवर्णयुगाचे चित्र उभे करून त्या आधारे राष्ट्रीय अस्मिता व राष्ट्रवाद उभारणे हे या वासाहतिक देशात सुरू झाले. धर्म व संस्कृतीवर आधारित पुनरूज्जीवनवादी राष्ट्रवाद त्यातून पुढे आला. राष्ट्रवाद अफूची गोळी ठरत आहे. भांडवलदार, लबाड राजकारणी, सनातन धर्मसंस्था, मतलबी प्रसारमाध्यमे यांनी भाबड्या लोकांसाठी निर्माण केलेला राष्ट्रवाद हा सापळा ठरत आहे. (पॅरिस : ११ नोव्हेंबर २०१८ / इमॅन्युअल मॅक्रान : म. टा. १८-११-२०१८)

संविधानातील भारतीय राष्ट्रवाद आधुनिक मूल्यांवर अधिष्ठित आहे, तर हिंदूराष्ट्रवाद धर्मांधतेवर अधिष्ठित आहे.

आपल्यापुढे हे दोन राष्ट्रवाद आहेत. त्यांच्या जीवनदृष्टी वेगवेगळ्या आहेत. संविधानाला अभिप्रेत राष्ट्रवादात क्षेत्रसीमा धूसर आहेत. देवघेव आहे. धर्मराष्ट्रात मात्र काटेकोर सीमा उभ्या होऊ लागल्या. फारकती आणि फाळण्या होऊ लागल्या. राष्ट्रांमधील स्पर्धा तीव्र झाल्या. जगातील देवघेव आणि आंतरसंबंध वाढत असतानाच राष्ट्रीयता हा एक प्रभावी घटक बनून त्यांच्यात अनेक शक्यता, प्रश्न व अडथळे उभे करू लागला.

संविधानातील एक सिद्धान्त भारतासाठी जसा आहे तसा संपूर्ण विश्वासाठीही आहे. सौंदर्यशास्त्रात आपण सुंदर वस्तूचे निकष ठरवतो. ते जगातल्या सर्वच सौंदर्यवस्तूंना लागू होतात. स्वातंत्र्य, समता, बंधुता अशी मूल्ये कुठे आणि कोणत्या संदर्भात निर्माण झाली हे महत्त्वाचे असतेच; पण त्यापेक्षाही ती एकूण जगासाठीच चिरंतन आणि वैश्विक मूल्ये ठरतात. वाईट गोष्ट कोणासाठीही चांगली नसते आणि चांगली गोष्ट कोणासाठीही वाईट नसते, असेच संविधानातील समन्याय सिद्धान्ताचे म्हणणे आहे. तो जसा भारतीय समाजस्थितीसाठी उपकारक ठरतो तसा तो जागतिक समाजस्थितीसाठीही उपकारच ठरू शकतो कारण त्याची प्रकृतीच अशी सर्वसमावेशक आहे.

आपल्यात विविधता आहे, हिंदू, मुस्लिम, ख्रिश्चन, जैन, शीख, बौद्ध असे धार्मिक भेद आहेत आणि सिंधी, मद्रासी, बंगाली असे प्रांत भेद आहेत; पण आपण उत्कट राष्ट्रीय भावना आपल्या हृदयात निर्माण करण्याचा प्रयत्न केला नाही. त्यामुळे देशापुढे असंख्य आव्हाने उभी राहिली

म्हणून आपण भारतीयत्वाचा आग्रह धरतो.

एस. जी. सरदेसाई यांनी 'भारतीय तत्त्वज्ञान वैचारिक आणि सामाजिक संघर्ष' या अत्यंत महत्त्वपूर्ण पुस्तकात जो मूल्यांचा अटीतटीचा सग्राम मांडला आहे तसाच संग्राम साहित्य समीक्षेत आहे आणि तो आपण मांडून दाखवायला हवा आहे. प्रत्यक्ष जीवनविषयक तत्वज्ञानातही आणि साहित्याच्या समीक्षेतही काय मेलेले आहे आणि काय जिवंत आहे (What is dead and what is living) ते हिंमतीने सांगणारे अभ्यासक पुढे यायला हवेत. या दोन्ही क्षेत्रांमध्ये काय जाळून किंवा पुरून टाकले पाहिजे आणि काय जगवले पाहिजे, कोणत्या गोष्टींना अधिकच जिवत केले पाहिजे आणि अशाच कोणत्या जिवंत गोष्टी आता नव्यानेही निर्माण केल्या पाहिजेत हे सांगणारी बौद्धिक साहसे पुढे येण्याची गरज आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी इहवाद आणि अलौकिकतावाद, विषमता आणि समता आणि अन्याय आणि न्याय असा जो पराकोटीचा संघर्ष ( Revolution and Counter Revolution या भाषेत मांडला आहे, तसा अटीतटीचा संघर्ष आपल्या बौद्धिक जीवनात आणि वैचारिक साहित्यात येताना दिसत नाही. आपले वैचारिक वाङ्‌मयही आणि साहित्यसमीक्षाही सतत कुंपणावरच्या कावळ्याच्या शैलीत बोलताना दिसते. नव्या प्रतिभावंतांनी हे वास्तव जरा जबाबदारीने समजावून घ्यायला हवे. 'चैतन्यवाद हा मूलतः मानवी प्रगतीला पोषक नाही. खीळ घालणारा आहे, ही शिकवण आज जनतेला देण्याची गरज आहे... सरंजामशाही, भांडवलशाही, चातुर्वर्ण्य इत्यादी नष्ट करून वर्गहीन समाजवाद प्रस्थापित केला पाहिजे.' हे (पृ. १०२, १०३) सरदेसाईंचे म्हणणे समजावून घ्यायला पाहिजे. म्हणजे आजच्या राजकारणातीलही आणि साहित्यातीलही अंधश्रद्धा सूक्ष्मपणे लक्षात येतील.

विचारसरणी म्हणजे शिस्त! विचारसरणी अनेक असतात. आपली विचारसरणी आपण विचारपूर्वक ठरविण्याची गरज आहे. विचारसरणी निश्चित करणे म्हणजे प्रथम आपले सामाजिक, राजकीय, आर्थिक आणि वाङ्‌मयीन साध्य निश्चित करणे असते. इथे साध्य म्हणजे सत्य. या सत्याचा सन्मान प्रस्थापित करणे हेच विचारसरणीचे ध्येय असते. साध्य आणि साधनांचा विवेक इथे येतो. आपण मुक्ततत्त्ववादी असावे. सर्वन्यायी साध्याकडे जाताना साधनांचा मूलतत्त्ववाद आपल्याला त्याज्य ठरवावा लागतो. आपली विचारसरणी विचार बदलत जाणारी विचारसरणी आहे. हे आपण लक्षात घ्यायला हवे. ही शिस्त एकदा पक्की झाली की, इतिहासातील जिवंत ठेवावी अशी परंपरा निश्चित करता येते आणि उज्ज्वलतेला, सर्वन्यायाला मारक परंपराही मग कटाक्षाने टाळता येते कारण ती न्यायाला शत्रू मानणारीच परंपरा असते.

ही निर्दय शिस्त माथ्यात घेणारी माणसे आणि प्रतिभा महानगरांमध्ये, प्रत्यक्ष जीवनात आणि वेगवेगळ्या वाङ्‌मयीन प्रवाहांमध्ये किती आहेत? निरामय भडकवली जाते; पण हा दुष्ट कार्यक्रम देश पारंत्र्यात ढकलण्याचाच कार्यक्रम असतो हे आज आपण फार गंभीरपणे लक्षात घ्यायला हवे.

आता आपण भारतीयत्व किंवा मानवी न्याय हाच आपला जीवनादर्श मानावा आणि या जीवनादर्शालाच आपला सौंदर्यसिद्धान्त मानून एकत्र यायला हवे. भूतकाळात आपण केलेल्या चुकांनी आपल्याला जखमी केले. त्या चुका आता आपण केल्या, तर आपला मानवी सन्मानाचा प्रबंधच आणि आपल्या स्वातंत्र्याच्या, समाजवादाच्या आणि न्यायाच्या सर्व शक्यताच मरून जातील. आता आपले सन्मानाचे जगणे की आपल्या छोट्या छोट्या अस्मितांच्या वेड्या अहंकाराने मरणे यातूनच आपल्याला आता निवड करायची आहे. यावेळी आपणा सर्वांना सर्वांचे सन्मानाने जगणे आणि असे जगणे शक्य करणारे आपले भारतीयत्व, जगवण्यासाठी आपण एकत्र यायला हवे. आज सामंजस्याचा हा एवढाच अर्थ मला दिसतो. भारतीयत्व या मूल्यकोशात आणि जीवन न्यायाच्या सौंदर्यसिद्धान्तात तुम्हा आम्हा सर्वांच्या जीवनाचे आणि जीवन उन्नत करणाऱ्या साहित्याचे आश्वासन आहे. त्याच्या उत्कट हाका आपण एकत्र येऊन खुल्या मनाने ऐकाव्यात अशी कळकळीची विनंती आपणाला करतो.

❖❖

**यशवंत मनोहर**
लुम्बिनी, ४५ लोकसेवानगर, नागपूर-४४००२२
मोबाईल: ८००७१५५५७७
ई-मेल : yashwantmanohar2012@gmail.com



अनुक्रमणिका

# रत्नाकर मतकरी : सव्यसाची अष्टमार्गी

ज्येष्ठ साहित्यिक
मा. रत्नाकर मतकरी यांचे नुकतेच निधन झाले.
मतकरींच्या साहित्यिक
कर्तृत्वाचा वेध घेणारा
प्रा. विजय तापस यांचा
आदरांजलीपर लेख.

विजय तापस

**श्री.** रत्नाकर विठ्ठल मतकरी हे भारतीय स्वातंत्र्याचा महासूर्य उदयाला येण्यापूर्वी एक दशक जन्माला आले होते. १७ नोव्हेंबर १९३८ साली सुरू झालेला एक जीवनप्रवास वयाच्या एक्याऐंशीव्या वर्षी, दिनांक १८ मे २०२० रोजी अत्यंत अकल्पितपणे संपला. संपूर्ण जगात, भारतात आणि महाराष्ट्रात 'करोना' या भयंकर साथीच्या रोगाने हाहाकार निर्माण झालेला असताना, देशात लॉकडाऊन चालू असताना आणि कोणालाही कसलीच खात्री वाटत नसतानाच्या अत्यंत निराशेच्या काळातच मतकरी यांना मरणाने गाठलं. करोनाने मराठी रंगभूमी, मराठी चित्रपट आणि मराठी साहित्यक्षेत्रात विख्यात असलेल्या रत्नाकर मतकरींचा बळी घेऊन या तीनही क्षेत्रांची मोठी हानी केली यात शंका नाही. आजच्या अतिशय निराशेच्या, आव्हानांच्या, अंधारलेल्या काळात मतकरींच्या अचानक जाण्याचा घाव अधिक खोलवरचा वाटतो; कारण अशा काळातच मूलतः लढाऊ वृत्तीच्या आणि संयमाने, चिकाटीने आणि दुर्दम्य आशावादी धारणेने सतत कार्यशीलं राहणाऱ्या अनुभवसमृद्ध मतकरींची मराठी समाजाला खरी गरज होती.

रत्नाकर मतकरी यांना ओळखणाऱ्या सर्वांना जो धक्का बसला आहे तो कुटुंबातली एक वडीलधारी व्यक्ती गेल्याचा जितका आहे, तितकाच एक अत्यंत सबळ असा सकारात्मक ऊर्जास्रोत-एक जिवलग अचानक काळाच्या पडद्याआड गेला याचा आहे. जागतिकीकरण, आर्थिक उदारीकरणानतर आलेल्या आर्थिक सुबत्तेमुळे सुस्थापित मध्यमवर्गीय समाजाला जी स्थिरता लाभली आणि या स्थिरतेच्या बरोबरीने या वर्गात जी आत्मकेंद्रितता, संवेदनांची जी बधीरता आली; ती त्याच वर्गात वावरत आणि जगत असूनही मतकरींना स्पर्श करू शकली नाही हे लक्षात घ्यायला पाहिजे. मतकरी यांनी अनेक शोषित गटांचा आणि सामाजिक चळवळींचा सक्रिय कैवार गेल्या तीस वर्षात अनेकदा घेतला. हा वर्गही मतकरींच्या जाण्याने,त्यातही करोनाने जाण्यामुळे व्यथित आहे, आणि ते अतिशय स्वाभाविक आहे. मराठी साहित्याची हानी तर झाली आहेच; पण शोषितांच्या बाजूने बोलणाऱ्या, त्यांच्या हक्कांसाठी रस्त्यावर उतरणाऱ्या, एकूण समाजाशी असलेली बांधिलकी टिकवून ठेवणाऱ्या एका लेखकाला समाज मुकला ही वस्तुस्थिती नाकारता येत नाही. ज्या समाजात राजकीय-सामाजिक वा सांस्कृतिक अटीतटीच्या प्रसंगातही चार-दोन अपवाद वगळता साहित्यक्षेत्रातली अव्वल रत्नं, महाराष्ट्रभूषण आणि राज्यशासन पारितोषिके विजेते लेखक आणि अन्य मानाचे पुरस्कार प्राप्त झालेले लेखक मिळमिळीत, बोटचेपी भूमिका घेतात आणि नामानिराळे राहू पाहतात अशा समाजात मतकरी यांच्यासारखी व्यक्ती लाभालाभांची पर्वा न करता एक भूमिका घेऊन उभी राहते ही केवढी उमेद देणारी आणि उमेद वाढवणारी बाब आहे हे वेगळे सांगायला नको. असे असल्यानेच मतकरी यांचे निधन ही



अनुक्रमणिका








फार मोठी हानी आहे असे म्हणावेसे वाटते.

रत्नाकर मतकरी यांचं वर्णन मी जाणीवपूर्वकच 'सव्यसाची अष्टमार्गी' असं केलं आहे. त्यांच्या साहित्य आणि कलाक्षेत्रातील एकूण कामगिरीचा आणि कलावंतपणाचा आपण निकटतेने वेध घेतला, तर त्यांचं इथे केलेलं वर्णन केवळ शीर्षकापुरतं नसून ती वस्तुस्थिती आहे, असं लक्षात यावं. मतकरी हे लेखनाच्या संदर्भात आत्यंतिक गंभीर, सचोटीचे आणि व्रतस्थवृत्तीचे होते. वेगवेगळ्या साहित्यप्रकारात लेखन करणारा लेखक हा केवळ प्रतिभावंत असून चालत नाही, तर तो उत्तम दर्जाचा क्राफ्टमास्टर असावा लागतो. वेगवेगळ्या साहित्यप्रकारांची आणि त्या त्या प्रकाराची सूक्ष्म जाण त्या प्रकाराच्या आंतरिक भाववृत्तीसह लेखकाला असावी लागते. मतकरी यांचं सगळ्यात मोठं वैशिष्ट्य हेच की, त्यांनी जे साहित्यप्रकार हाताळले, त्या साहित्यप्रकारांची त्यांना सर्वस्पर्शी, समग्र जाण होती. मतकरी यांनी नाटक या साहित्य- प्रयोगकलेत जे विपुल काम केले, जी सकस निर्मिती केली ती तर काही बाबतीत अक्षरशः वेगळेपणाचा ठसा निर्माण करणारी आहे. अर्थात त्याचा उल्लेख पुढे येईलच. मतकरी हे कथाकार, कादंबरीकार, एकांकिकाकार, नाटककार, चित्रकार, नाट्यदिग्दर्शक, ललितलेखनकर्ते, चित्रपट कथाकार-संवादलेखक, सामाजिक कार्यकर्ते, अनुवादक, संपादक आणि स्तंभलेखक होते. याच्या बरोबरीनेच ते एक प्रायोगिक नाट्यसंस्थाही चालवत होते. एका अर्थाने पाहायला गेलं, तर मतकरी हा एक बहुमुखी कलावंत होता. त्यातही तो एक विवेकवादी, लोकशाहीवादी आणि स्वातंत्र्यवादी लेखक होता हे त्यांच्याबद्दल लिहिताना मला मुद्दाम अधोरेखित करायला हवं. गिरणी कामगारांचा प्रश्न असो की नर्मदा बचाव आंदोलन वा मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयातील ग्रंथसेवकांचे उपोषण-आंदोलन असो, की लोकशाही-बचाव आंदोलन असो; मतकरी अशा आंदोलनात नाहीत असं कधी झालं नाही. मराठी साहित्यातले कालचे-आजचे तथाकथित बंडखोर लेखकराव सर्वसाधारणपणे ज्या अत्यावश्यक सामाजिक-राजकीय वा सांस्कृतिक भूमिका घ्यायला बिचकतात, अशा प्रसंगात मतकरी नेहमीच शांतपणे सामील व्हायचे. या संदर्भात मला विजय तेंडुलकरांची आठवण येते. तेही ठाम भूमिका घ्यायचे. मात्र त्यांचा सहभाग वादळी असायचा, तर मतकरींचा संयमाचा आणि निग्रही.

रत्नाकर मतकरी यांच्या लेखन कारकीर्दीतला फार मोठा भाग हा नाटककार मतकरींचा आहे. सुधाताई करमरकर आणि रत्नाकर मतकरी ही दोन माणसं नसती, तर मराठीतली बालरंगभूमी बरीचशी दुबळीच राहिली असती यात शंका नाही. मतकरींनी ज्या उत्साहाने, जोमाने, जिद्दीने बालरंगभूमी टिकवली, जगवली आणि बहरवली त्याची किंमत या बालरंगभूमीच्या आजच्या ओसाड काळात विशेष जाणवते. त्या रंगभूमीवरही त्यांनी प्रयोगशीलता दाखवली आणि ती रंगभूमी त्यांनी अगदी शहरातल्या झोपडपट्टीपर्यंत नेली. मला मतकरींचा मोठेपणा हा वाटतो की, त्यांनी प्रौढ रंगभूमीला स्वतःच्या आयुष्यात जितकं महत्त्व दिलं, तितकंच त्यांनी बालरंगभूमीला महत्त्व दिलं.

व्यावसायिक रंगभूमीवर यशस्वी होण्यासाठी नाटककाराकडे वेगळ्या प्रकारची नाट्यजाणीव तर असावीच लागते; पण त्याच बरोबरीने त्या नाटककाराला प्रेक्षक-मानसिकतेचा, प्रेक्षक-अभिरुचीचा आणि प्रेक्षकाच्या विवेकशीलतेचा बराचसा अंदाज असावा लागतो. या संदर्भात आपण मतकरींचा विचार केला, तर मतकरी हे कानेटकराइतकेच 'शंभर टक्के यशस्वी व्यावसायिक नाटककार होते' असं म्हणायला हवं. कानेटकरांची जशी आणि जितकी नाटकाच्या रचनातंत्रावर हुकमत होती, त्याच्या जवळपास जाईल इतकी हुकमत मतकरींच्या नाटकातही दिसून येते. मतकरी या नाटककाराचं 'सर्वोत्तम व्यावसायिक नाटककार' म्हणून जे काही यश आहे त्यात अर्थातच त्यांच्या दिग्दर्शकांचा सहभागही खूप मोठा आहे. अरविंद देशपांडे, चंद्रकांत कुलकर्णी, मंगेश कदम यांच्यासह विजय केंकरे -ज्यांनी मतकरींची सर्वाधिक नाटकं दिग्दर्शित केली-यांचा उल्लेख करावाच लागेल. मतकरी यांचा नाटककार म्हणून जो काही ठसा गेल्या तीस-चाळीस वर्षांत निर्माण झाला त्यात त्यांच्या व्यावसायिक आणि प्रायोगिक अशा दोन्ही धारेतल्या नाटकांचा समावेश आहे. आपण जसं त्यांचं 'आरण्यक', 'लोककथा ७८', 'विठो रखुमाय' विसरू शकत नाही, तसं त्यांची 'बिऱ्हाडबाजलं'. 'अजून यौवनात मी', दुभंग', 'खोल खोल पाणी', माझं काय चुकलं', 'घर तिघांचं हवं', 'जावई माझा भला', 'चि. सौ. कां. चंपा गोवेकर', 'चार दिवस प्रेमाचे', 'एकदा पाहावं करून', 'नरू आणि जान्हवी' वगैरे नाटकंत्यातला

**एका अर्थाने पाहायला गेलं, तर मतकरी हा एक बहुमुखी कलावंत होता. त्यातही तो एक विवेकवादी, लोकशाहीवादी आणि स्वातंत्र्यवादी लेखक होता हे त्यांच्याबद्दल लिहिताना मला मुद्दाम अधोरेखित करायला हवं. गिरणी कामगारांचा प्रश्न असो की नर्मदा बचाव आंदोलन वा मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयातील ग्रंथसेवकांचे उपोषण-आंदोलन असो, की लोकशाही-बचाव आंदोलन असो; मतकरी अशा आंदोलनात नाहीत असं कधी झालं नाही.**

आशय आणि प्रयोगरूप यासाठी लक्षात राहाणारी आहेत. मला नाटककार म्हणून मतकरींचा एक विशेष लक्षात येतो तो त्यांनी कानेटकरांप्रमाणे चरित्र-नाटकाला स्पर्श केला हा. (तसं पाहायला गेलं तर प्रत्येकच नाटकात ज्ञात-अज्ञात चरित्रांश असतोच; पण तो भाग अलाहिदा ) इथे त्यांच्या 'इंदिरा' आणि 'गांधी-पर्व'चा मला मुद्दाम उल्लेख करावसा वाटतो. त्यांच 'तुळसा' हे पेशवाईतील सरदार होळकर यांचा संदर्भ असणारं एक नाटक अजून प्रयोगरूपात आलेलं नाही. व्यावसायिक नाटककार हा प्रेक्षकशरण असतो असं म्हटलं जातं आणि त्यात खूपसं तथ्यही आहे हे नाकारता येणार नाही. विजय तेंडुलकर यांनी जसा प्रेक्षकांचा, त्यांच्या तथाकथित मूल्यांचा अनुनय करण्याचं नाकारलं, अगदी तसाच नकार मतकरींच्या नाटकांनी दिला आहे हे लक्षात घेण्यासारखं आहे. मतकरी यांनी केवळ नाटकांमधूनच नव्हे तर कथा, कादंबरी आणि इतर साहित्यातूनही गतानुगतिक बुरसटपणा, कालबाह्य मूल्ये, अंधश्रद्धा, स्त्री-विरोधी विचारधारा, जातीयता यांचा चुकूनही कधी पुरस्कार केलेला नाही. लेखनस्वातंत्र्य, कलात्मकता यांची ढाल वापरून त्यांनी कधीही चुकीच्या गोष्टींचं समर्थन केलेलं नाही किंवा त्याबद्दल सहानुभूतीची भूमिकाही घेतलेली नाही. त्यांनी त्यांच्या सर्व लेखनातून एक तारतम्याची, सामाजिक समंजसतेची, विवेकाची भूमिका घेतलेलीच आपल्याला दिसते. याचं उत्तम उदाहरण म्हणून मी त्यांच्या 'माझं काय चुकलं' या नाटकाचा उल्लेख करेन.



अनुक्रमणिका

विवाहितेचा सासरी होणारा छळ हा या नाटकाचा विषय. याच विषयावर जयवंत दळवी यांनी लिहिलेलं 'पर्याय' आणि मतकरींचं नाटक यांची तुलना केली, तर दळवींचं नाटक मेलोड्रामाच्या, भडक आणि एकतर्फी नाटकाच्या अंगाने जाताना दिसतं, तर 'माझं काय चुकलं'मध्ये सासरच्या बरोबरीने माहेरच्या माणसाच्या बेजबाबदार, स्त्रीविरोधी भूमिकेचाही विचार केलेला दिसतो. याच संदर्भात त्यांच्या 'दहा जणी' या कथासंग्रहाचाही नव्याने विचार करता येईल, असं म्हणता येईल. मला या संदर्भात मतकरी यांच्या कथा आणि गूढकथांचाही हा विशेष जाणवतो की, त्यातही त्यांनी स्त्रीचा 'सेक्सडॉल' म्हणून वा रंजकतेसाठी वापर केलेला नाही. मतकरी यांच्या अगदी वादग्रस्त ठरलेल्या 'अॅडम'मध्येही शारीर असोशीपेक्षा पात्राच्या मानसिकतेचा तळ शोधण्याची खटपट जास्त दिसते. रत्नाकर मतकरी यांनी लेखक म्हणून, चित्रकार म्हणून, सिनेमावाला किंवा नाटककार म्हणून एक गोष्ट अगदी प्राणपणाने केली, ती म्हणजे लेखनाचं वा कोणत्याही कामातलं गांभीर्य त्यांनी कधीही सोडलं नाही. जे जे केलं ते एक प्रकारच्या बांधिलकीच्या जाणिवेतून केलं. व्यावसायिक रंगभूमीवर मतकरी जेव्हा नाटककार म्हणून रुजू झाले आणि पुढे रुळायला लागले तेव्हा तो काळ एकापेक्षा एक सरस नाटककारांचा होता. कानेटकर-तेंडुलकर-जयवंत दळवी-वाळ कोल्हटकर-विद्याधर गोखले हे त्यातले प्रमुख. मतकरी या चौघांपैकी पहिल्या तिघांच्या नाट्यजाणिवांच्या जवळचे. या सगळ्यांशी झुंज घेत, त्यांच्या तोडीस तोड नाटक उभं करून त्यांनी स्वत:चा म्हणून एक प्रेक्षक उभा केला, घडवला हे त्यांच्या कार्याचा वेध घेताना मुद्दाम लक्षात घ्यायला पाहिजे .

साधारणपणे चाळीस-पंचेचाळीस नाटकं, असख्य एकांकिका, अनेक कथासग्रह, इतकंच काय पण त्यांच्या ललित लेखनातून, वैचारिक लेखनातूनही आपल्याला विवेकाची आणि समंजसतेचीच पाठराखण केलेली दिसते. असं असूनही त्यांचं लेखन वाचनीय आणि लोकप्रियही झालं आहे. लक्षात घेण्यासारखं आहे. शब्द, साहित्य, चित्रकला, नाटक हा त्यांच्या अस्तित्वाचा अविभाज्य भाग होता. खरं तर त्या सामर्थ्यावरच ते बेताज बादशहासारखे जगले. मतकरी ज्या काळात लेखक म्हणून उदयाला आले, विकसले आणि एका मुक्कामाला पोहोचून स्थिरावले तो सगळा काळ अतिशय आव्हानात्मक होता. तो बदलांचा आणि पूर्वापारच्या सगळ्या जीवनकल्पनांच्या मोडणीचा, कालबाह्य होण्याचा काळ होता. अशा काळात ठामपणे उभं राहणं, लिहितं राहून एक नवी दिशा शोधून काढणं, एका नव्या दृष्टीचा माग घेणं ही अजिबातच सोपी गोष्ट नाही. मतकरी या कसोटीला शंभर टक्के कसे उतरले याची साक्ष त्यांचं साहित्य सर्वांगानं देत आहे यात संशय नाही.

रत्नाकर मतकरी यांनी काही संपादने केली. त्यातही त्यांची वेगळी जाणीव दिसते. विशेषत: अशा संपादनात त्यांनी महाराष्ट्र शासनाच्या एड्स नियंत्रण संस्थेसाठी केलेलं 'पॉझिटीव्ह' हे संपादन आणि त्यांनी आंतरराष्ट्रीय ख्यातीचे चित्रकार आणि अभ्यासक प्रभाकर कोलते यांनी लिहिलेल्या लेखांचे जे संपादन केले त्याचा विशेष विचार करायला हवा. मतकरी यांच्या एकूण साहित्याचा मराठी समीक्षेने अजून पुरेसा चिकित्सात्मक अभ्यास केलेला नाही. त्यांनी चित्रकला, बाल रंगभूमी, दूरदर्शनवरील विविध कार्यक्रम, दूरदर्शन माध्यमासाठी केलेलं लेखन, चित्रपटलेखन यांचा सखोल अभ्यास होणं अजून शेष आहे. रत्नाकर मतकरी यांनी इतक्या प्रकारचं आणि इतकं लेखन केलं आहे की, त्याचा पुरेसा शोध आपण अद्यापि घेतलेला नाही. मतकरी हे एक व्रतस्थ लेखक तर होतेच; पण ते समाजाभिमुख लेखकही होते. मतकरी यांच्या निधनाने मराठी साहित्यातला एक बहुपैलू लेखक, एक सक्रिय समाजचिंतक आणि अनेकानेक साहित्य आणि कलाप्रकारांत लीलया संचार करणारा एक अष्टावधानी कलावंत आपण गमावला आहे. त्यांच्या जाण्याचे दु:ख तर आहेच; पण त्यांच्या अत्यंत संवेदनशील साहित्याचा ठेवा आपल्यापाशी कायम राहाणार आहे याचे सुखही आहे. मतकरी साहित्यरूपाने आपल्या सोबत वाटचाल करणार आहेत हे नक्की!

❖❖

**विजय तापस**
ए-४०२ लक्ष्मी कृपा, शहाजी राजे मार्ग, विलेपार्ले (ईस्ट)
मुंबई-४०००५७, मो.९८१९२६६९२६
vijaytapasl@gmail.com



अनुक्रमणिका



# वाङ्मयेतिहासाचे अध्ययन व अध्यापन

वाङ्मयेतिहासाची संकल्पना स्पष्ट करणारा आणि वाङ्मयेतिहासाच्या अध्ययन व अध्यापनाची सूत्रे विशद करणारा लेख.

प्रा. डॉ. राजाभाऊ भैलुमे

साहित्य या संकल्पनेमध्ये कथा, कादंबरी, कविता, नाटक, चरित्र, आत्मचरित्र अशा साहित्य प्रकारांचा प्रामुख्याने समावेश केला जातो कारण साहित्यात लालित्याला महत्त्व असते. अशा साहित्याची समीक्षा किंवा वाङ्मयेतिहास वेगवेगळ्या दृष्टिकोनातून लिहिला जातो. हे लालित्यपूर्ण स्वरूपात लिहिलेले नसते, तर एकूण साहित्याच्या अंतर्गत भागाचा बाह्य साधनांच्या साहाय्याने यात विचार केलेला असतो. समीक्षा ही त्या साहित्यकृतीशी, साहित्य प्रकाराशी निगडित असते. वाङ्मयेतिहास मात्र संपूर्ण वाङ्मयाशी वाङ्मय व्यवहाराशी, समाज, परिस्थिती, संस्कृती अशा असंख्य घटकांशी निगडित असतो. याची साहित्यासारखी निर्मिती नसते. म्हणून साहित्याचे अध्ययन व अध्यापन वेगळ्या पातळीवरचे असते, तर वाङ्मयेतिहासाचे अध्ययन व अध्यापन वेगळ्या पातळीवरचे असते आणि वेगळ्या कसोट्या, पद्धती वापराव्या लागतील.

साहित्याचे अध्ययन व्यक्तिगत पातळीवर करता येते. वाङ्मयेतिहासाचे अध्ययन व्यक्तिगत पातळीवर करता येत नाही, तर ते साहित्याच्या व वाचकांच्या समकाळाच्या अनुषंगाने समाजाच्या घटना- प्रसंगांच्या व साहित्य प्रवाहाच्या पातळीवर करावे लागते. उदा. १९४० ते १९५० या दशकातील मराठी कवितांचा विचार करताना स्वातंत्र्य संग्रामाचा काळ, घटना-प्रसंग, स्वातंत्र्य या बरोबर आताचा काळ अशा अनेक गोष्टींचा विचार करावा लागतो. या बरोबर ती साहित्यकृती, कविता, तिच्यातील घटक, लेखक या सर्वांच्या अनुषंगानेही विचार करावा लागतो. हे आस्वादाच्या पातळीवरील नसते, तर ते समकालीन घडामोडी व लेखक यांच्या आकलनाच्या पातळीवरील असते.

साहित्य निर्मितीचा हेतू व समकालीनता यांना केंद्रवर्ती ठेवून वाङ्मयेतिहासाचे वाचन केले जाते. मध्ययुगीन मराठी वाङ्मयाचा इतिहास पाहता ही गोष्ट लक्षात येते. मध्ययुगीन मराठी वाङ्मयाचा इतिहास हा पंथांचा इतिहास, धर्माचा इतिहास वाटतो. भक्ती परंपरेचा इतिहास वाटतो कारण त्याच हेतूने मध्ययुगीन काळातील मराठी साहित्याची निर्मिती झालेली आहे. तेव्हा याचा निखळ साहित्य रचनेच्या, लालित्याच्या साहित्य रूपाच्या अनुषंगाने पूर्ण वाङ्मयेतिहास लिहिणे शक्य नाही व तसा प्रयत्न मध्ययुगीन मराठी साहित्यासंबंधी कोणीही केलेला नाही. म्हणून साहित्य निर्मितीचा हेतू व समकालीनता याच अंगाने याचे अध्ययन होणे गरजेचे आहे.

वाङ्मयेतिहासाचे अध्ययन करत असताना 'इतिहास' ही संकल्पना समोर असावी; परंतु हा साहित्य इतिहास आहे याचे भानही असावे. इतिहासात वस्तुनिष्ठता महत्त्वाची असते. पुरावे गरजेचे असतात. त्यात स्वमनाला, भावनिकतेला महत्त्व नसते. काही

साहित्यकृतींचा हेतू जरी एक मानला तरी लेखकानुसार प्रत्येक साहित्यकृतीत फरक पडतो. त्यामुळे वाङ्मयेतिहासातसुद्धा वस्तुनिष्ठता येत नाही. साहित्यात अनुभवांचे अभिव्यक्तिकरण असते. तसेच लेखकावरील प्रभाव. प्रेरणा, शैली यांना महत्त्व असते. त्यामुळे इतिहासासारखे वाङ्मयेतिहासात संदर्भ, पुरावे देता येणार नाहीत. त्यामुळे वाङ्मयेतिहासाचे अध्ययन करताना दुसरे मतही ग्राह्य मानावे लागते.

वाङ्मयेतिहासाचे अध्ययन करताना 'समकालीनता' या घटकाचा विचार दोन किंवा तीन अंगाने करावा लागतो. १. साहित्यनिर्मिती झाली त्या वेळची समकालीनता, २. वाङ्मयेतिहास जेव्हा लिहिला गेला तेव्हाची समकालीनता व ३. अध्ययन केव्हा करत आहेत त्या वेळेची समकालीनता. वाङ्मयेतिहासकाराने वाङ्मयेतिहास लिहिताना त्या साहित्याची समकालीनता गृहीत धरलेली असतेच; परंतु त्या काळातील समकालीनतेच्या संदर्भात नवनवीन पुरावे, दृष्टिकोन, समज पुढे येत असतात. तसेच ज्या काळात वाङ्मयेतिहास लिहिला गेला तेव्हा उपलब्ध साधन सामुग्री, वाङ्मयेतिहास लेखनाची गरज, हेतू अशा अनेक गोष्टींचा विचार त्या समकाळांच्या पार्श्वभूमीवर करणे गरजेचे आहे. अध्ययन करत असताना सध्याची साधने, साहित्याकडे पाहण्याचा दृष्टिकोन, नवीन माहिती, सिद्धांत दृष्टिकोन अशा अनेक गोष्टींचा विचार करणे गरजेचे आहे.

वाङ्मयेतिहासाचे अध्ययन करत असताना तो वाङ्मयेतिहासच आहे का? वाङ्मयेतिहासात समग्र साहित्याचा विचार केलेला असतो. एक-दोन साहित्य कृतीतून काय व्यक्त झालेले आहे. हे इथे महत्त्वाचे नसते तर संपूर्ण दशकात, काळात वाङ्मय प्रकारात साहित्य कसे होते हे पाहणे महत्त्वाचे असते. त्यामुळे एखाद्या साहित्यकृतीचे अध्ययन करत असताना समग्र वाङ्मयाचा विचार करून त्यापैकी ही एक साहित्यकृती कशी आहे या दृष्टीने पाहणे गरजेचे आहे किंवा एखाद्या साहित्य कृतीचा प्रभाव इतर साहित्य कृतीवर कसा आहे हे पाहणे गरजेचे आहे. त्या साहित्य कृतीचे वेगळेपण, वैशिष्ट्यं ठरतात म्हणून वाङ्मयेतिहासाचे अध्ययन करताना कोणतीच साहित्यकृती स्वतंत्र, सुटी पाहता येत नाही. ती त्या काळाच्या परिप्रेक्ष्यात पाहावी लागते. यानुषंगानेच वाङ्मयेतिहासाचे लेखन झालेले असावे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर इतिहासाची व्याख्या एका शब्दात करताना म्हणतात की, 'इतिहास म्हणजे बदल'. वाङ्मयेतिहासाला सुद्धा ही व्याख्या तंतोतंत लागू होते. काहीतरी बदल झाल्याशिवाय इतिहास लिहिता येत नाही. इतिहासात बदलांच्याच नोंदी असतात. त्या बदलाच्या अनुषंगानेच त्या इतिहासाचे स्वरूपही असते. सामाजिक बदलांचा इतिहास सामाजिक अंगानेच लिहिला जाईल. वाङ्मयेतिहासातसुद्धा अशा साहित्यांर्गत बदलांचा वेध घेतलेला असतो. म्हणून वाङ्मयेतिहासाचे अध्ययन करताना अशा बदलांचे आकलन करून घेणे गरजेचे असते.

वाङ्मयेतिहासाचे अध्ययन करताना पूर्वतयारी म्हणून ज्या कालखंडातील वाङ्मयेतिहासाचे अध्ययन करावयाचे आहे त्या कालखंडाच्या अगोदरच्या कालखंडातील घडामोडी, साहित्य या गोष्टी जाणून घेतल्या पाहिजेत. तसेच ज्या कालखंडातील वाङ्मयेतिहास वाचावयाचा आहे. त्या कालखंडातील घडामोडी, राजकीय, आर्थिक व सामाजिक वातावरण पाहणे गरजेचे आहे. तरच त्या वाङ्मयेतिहासाचे अध्ययन व्यवस्थित करता येईल.

वाङ्मयेतिहासाचे अध्ययन करत असताना वाङ्मयेतिहासकार कोण आहे व त्याने कोणत्या हेतूने तो लिहिलेला आहे हे पाहणे गरजेचे असते कारण ऐतिहासिक, साहित्यिक घडामोडींकडे वेगवेगळे लोक आपापल्या दृष्टिकोनातून पाहात असतात व आपल्या सोयीचा अर्थ काढत असतात. आपल्या सोयीच्या अर्थास पूरक घडामोडींचा, पुराव्यांचा दाखला देत असतात. आपल्या मनाला, अनुमानाला, निष्कर्षाला छेद देणाऱ्या गोष्टी, पुरावे लपवण्याकडे त्यांचा कल असतो किंवा काही वेळेला आपला गुप्तलेखन हेतूच त्या त्या घडामोडींच्या माथी मारला जातो. या सर्वांची जाणीव सतत ठेवणे गरजेचे असते.

कलांचा इतिहास पाहणे म्हणजे त्या-त्या समाजाचा सांस्कृतिक इतिहास पाहणे होय. त्या-त्या काळात, वातावरणात त्या-त्या कला जोपासल्या जातात. वास्तुकला, शिल्पकला, नृत्यकला यांना त्या-त्या विशिष्ट काळात, परिस्थितीमध्ये महत्त्व प्राप्त झालेले दिसते. साहित्य कलेलासुद्धा वेगवेगळ्या काळात वेगवेगळ्या दृष्टीने कमी-जास्त महत्त्व प्राप्त झालेले दिसते. पूर्वी लिखित, धार्मिक साहित्याकडे शास्त्र म्हणून पाहिले जात होते. तर मौखिक वाङ्मयाला प्रसंगानुरूप महत्त्व होते.

भक्ती वाङ्मयाला तर वचनांचे स्वरूप प्राप्त झालेले दिसते. 'संत वचन बोलति' असे म्हणून संतांच्या शिकवणीनुसार लोक वागत होते. कला अभिव्यक्तीचे साधन आहे. त्यात त्या-त्या समाजाचे प्रतिबिंब पडलेले असल्यामुळे त्यातून त्या-त्या समाजाचा, काळाचा सांस्कृतिक इतिहास दिसतो. सामाजिक, राजकीय, धार्मिक परिस्थितीमुळे साहित्याची केंद्रे सतत बदलत असतात. उदा. मध्ययुगीन काळात पैठण, पंढरपूर हा भाग साहित्याच्या दृष्टीने महत्त्वाचा होता. आता पुणे-मुंबई हा भाग महत्त्वाचा आहे. असे असतानासुद्धा दलित साहित्याचा उगम औरंगाबाद परिसरातून झालेला दिसतो. या सर्वांची कारणमीमांसा अध्ययनाच्या वेळी करणे गरजेचे आहे. त्यासाठी त्या-त्या काळातील, परिस्थितीतील त्या-त्या प्रदेशाचा सांस्कृतिक इतिहास पाहणे गरजेचे असते.

अशा प्रकारे वाङ्मयेतिहासाचे अध्ययन करत असताना साहित्यांर्गत व बाह्य गोष्टींचा आधार घेत कोण कोणत्या गोष्टींचे व कसे अध्ययन करायचे हे आपण पाहिले; परंतु अध्यापन करताना मात्र अनेक गोष्टींचा पुन्हा विचार करणे गरजेचे असते.

वाङ्मयेतिहास हा इतर गोष्टींचा कळत- नकळत इतिहास असला तरी अध्यापन करताना साहित्य केंद्रवर्ती ठेवून इतर गोष्टींचा साहित्य स्पष्टीकरणासाठी आधार घेतला पाहिजे. उदा. मध्ययुगीन मराठी साहित्याचा इतिहास शिकवताना तो पंथीय धर्मीय इतिहास असला तरी फक्त पंथ, धर्म यांच्या अध्ययनावर भर देता कामा नये. त्याऐवजी लेखकावरील प्रभाव, त्याची शैली, आशय, विषय, प्रेरणा स्पष्ट करण्यासाठी त्याचा वापर करावा.

वाङ्मयेतिहासाचे अध्यापन हे समकालीन साहित्याचे आकलन, आस्वाद व मूल्यमापनासाठी असते. म्हणून प्राचीन वाङ्मयेतिहासाचे अध्यापन करत असताना त्या काळातील सर्व परिस्थिती व साहित्य यांचा अनुबंध तर स्पष्ट केलाच पाहिजे; परंतु आताच्या समकालीन साहित्यावर त्याचा कोणता व कसा प्रभाव पडलेला आहे हे ही स्पष्ट केले पाहिजे. समकालीन साहित्याचे स्वरूप स्पष्ट करण्यासाठीसुद्धा वाङ्मयेतिहासाचा आधार घेतला पाहिजे. प्राचीन साहित्याच्या खुणाही आजच्या साहित्यातून कशा दिसतात. त्याचे स्वरूप कालानुरूप कसे बदलले आहे हे निश्चित करण्यासाठी उपयोग केला पाहिजे. प्राचीन वाङ्मय व समकालीन वाङ्मय हा प्रवास सप्रमाण उलगडला पाहिजे.

वाङ्मयेतिहासाचे अध्यापन करताना साहित्याचा प्रवास हा आशय व रचना या दोन्ही अंगांनी स्पष्ट तर केला पाहिजेच; परंतु हा स्पष्ट करताना कोण-कोणते घटक व का? यासाठी कारणीभूत आहेत हे ही थोडक्यात स्पष्ट केले पाहिजे. यासाठी साहित्य आणि सामाजिक शास्त्रे यांचा अनुबंधही स्पष्ट केला पाहिजे कारण साहित्यावर परिणाम करणारे घटक हे जसे साहित्यांर्गत आहेत तसेच ते साहित्यबाह्यही आहेत. त्यांचा उलगडा सामाजिक शास्त्रांच्या आधारेच होऊ शकतो. याचेही भान हवे; परंतु हे करत असताना साहित्य हेच केंद्रवर्ती असणे गरजेचे आहे.

वाङ्मयेतिहास लिहिताना एक गरज, सोय म्हणून सालानुसार, क्रमानुसार साहित्याची सूची, निर्देश केलेला असतो. तेव्हा वाङ्मयेतिहासाचे अध्यापन करताना एक-एक साहित्य कृतीवर लक्ष केंद्रित करून अध्यापन करू नये, तर ती साहित्यकृती त्या काळाचे प्रतिनिधित्व करणारी आहे याचे सतत भान ठेवावे. त्या-त्या लेखकाची वैशिष्ट्ये सांगतानासुद्धा तो काळ लक्षात ठेवून त्यावर भाष्य करावे. म्हणजे त्या दशकातील, त्या काळातील साहित्य कसे होते. लेखक कसे होते हे सांगण्यासाठी, स्पष्ट करण्यासाठी उदाहरणादाखल त्यांचा आधार घ्यावा. उदा. १३व्या शतकात तुकारामासारखा संत का झाला नाही? किंवा ज्योतिबा फुले पेशवाईत का झाले नाहीत? याची कारणमीमांसा करता आली पाहिजे. म्हणून वाङ्मयेतिहासाचे अध्यापन करत असताना एखादा लेखक. साहित्यकृती, कितीही महत्त्वाची असली तरी

**वाङ्मयेतिहासाचे अध्ययन करत असताना वाङ्मयेतिहासकार कोण आहे व त्याने कोणत्या हेतूने तो लिहिलेला आहे हे पाहणे गरजेचे असते कारण ऐतिहासिक, साहित्यिक घडामोडींकडे वेगवेगळे लोक आपापल्या दृष्टिकोनातून पाहात असतात व आपल्या सोयीचा अर्थ काढत असतात. आपल्या सोयीच्या अर्थास पूरक घडामोडींचा, पुराव्यांचा दाखला देत असतात.**

त्याचे आकलन, स्पष्टीकरण, काळ, परिस्थिती व समग्र साहित्य यांच्या चौकटीतच करावे.

प्रत्येक पिढीचा वाङ्मयेतिहास वेगळा असतो किंवा प्रत्येक पिढीने आपापल्या दृष्टीने वाङ्मयेतिहासाचे पुनर्लेखन केले पाहिजे. अशी रास्त अपेक्षा सर्व अभ्यासकांची आहे कारण काळानुरूप काही माहिती पुढे येते. काही साहित्य उशिराने उजेडात येते. नवनवीन संशोधनातून काही नवीन दृष्टिकोन, माहिती हाती येते. त्यामुळे अगोदरच्या माहितीला, निष्कर्षाला छेद बसतो. काही नजरचुकीने राहिले जाते. वाङ्मयेतिहासाचे अध्यापन करताना या नवीन गोष्टींचा आधार घेतला पाहिजे.

अशा प्रकारे वाङ्मयेतिहासाचे अध्ययन व अध्यापन करत असताना समग्र साहित्याचा काळ, परिस्थिती, इतर घटना यांच्या अनुषंगाने साहित्याचे साहित्यार्गत व साहित्य बाह्य अनुबंध स्पष्ट केले पाहिजेत. त्या-त्या कालखंडात तस-तसेच वाङ्मय का निर्माण झाले? आजचे साहित्य व त्या प्राचीन साहित्याचा कोणता अनुबंध आहे. साहित्य आणि समाज यांचा कोणता अनुबंध आहे. साहित्याचा आशय व रचनेच्या अनुषंगाने झालेला प्रवास या सर्व गोष्टींचा विचार इथे महत्त्वाचा ठरतो. एकूणच साहित्य व्यवहाराकडे व्यापक दृष्टीने कसे पहावयाचे हे वाङ्मयेतिहासाच्या अध्ययन व अध्यापनातून स्पष्ट होते.

संदर्भ ग्रंथ :

१. पुंडे द. दि. - 'वाङ्मयेतिहासाची संकल्पना' प्रतिमा प्रकाशन, पुणे सुधारित चौथी आवृत्ती - २००९

२. आवलगावकर अविनाश, डॉ. मनोहर जाधव (संपा.) 'मराठी वाङ्मयाचा इतिहास पुनर्लेखनाच्या दिशा', सुविद्या प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती : २००९

३. 'भारतीय साहित्याच्या इतिहासातील समस्या', डॉ. रामविलास शर्मा, अनुवादक - दत्तात्रेय पुंडे, पद्मजा घोरपडे, प्रतिभा प्रकाशन, पुणे १९९८

४. विद्यागौरी टिळक, डॉ. द. दि. पुंडे (संपा.) 'मराठी वाङ्मयाची सद्यःस्थिती - स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे - १९९८

५. विद्यागौरी टिळक (संपा.) 'वाङ्मयेतिहास लेखन स्वरूप आणि समस्या' - प्रतिमा प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती - १९९९

६. मैनेजय पाण्डेय - 'साहित्य और इतिहास दृष्टी, वाणी प्रकाशन - नई दिल्ली, तृतीय संस्करण - २००८

❖❖

प्रा. डॉ. राजाभाऊ भैलुमे
मराठी विभाग, चांदमल ताराचंद बोरा महाविद्यालय शिरूर,
जिल्हा-पुणे-४१२२१०, मोबा : ९८२२२१५३८८
rajbhailume@gmail.com





अनुक्रमणिका

# अरुणा ढेरे यांच्या समग्र साहित्याचा अभ्यास : अरुणोदय

अरुणा ढेरे यांच्या साहित्याचा, वाङ्‍मयीन व्यक्तिमत्त्वाचा शोध घेणाऱ्या डॉ. स्वाती शिंदे पवार यांच्या अरुणोदय या ग्रंथाचे डॉ. चंद्रकांत पोतदार यांनी केलेले परीक्षण.

डॉ. चंद्रकांत भगवंत पोतदार

प्रसिद्ध कवयित्री, लेखिका अरुणा ढेरे आपणा सर्वांनाच ज्ञात आहेत. कविता, कादंबरी, कथा, ललित, समीक्षा, लोकसाहित्यविषयक लेखन, बालसाहित्य अशा सर्व वाङ्मयप्रकारातून त्यांचे लेखन मराठी साहित्यात मोलाचे योगदान देणारे ठरले आहे. साहित्याच्या व्यापक जाणिवा, संवेदनशील मनाची वर्तमानात होणारी घालमेल, लेखन म्हणजे ज़गण्याचा धर्मच बनून जावा अशी भूमिका असलेले त्यांचे एकूण लेखन उल्लेखनीयच आहे. संशोधनाच्या निमित्ताने त्यांच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाचा आपल्या अभ्यासातून घेतलेला शोध म्हणजे डॉ. स्वाती शिंदे-पवार यांचा 'अरुणोदय' ग्रंथ होय.

अभ्यासाच्या दृष्टीने वाङ्‍मयीन व्यक्तिमत्त्व, कथावाङ्‍मय, कविता, ललित व इतर लेखन, लेखनविशेष, मुलाखत, परिचय अशी विभागणी महत्त्वाची आहे. प्रत्येक प्रकरणातून अरुणा ढेरे यांच्या व्यक्तिमत्त्वासह त्यांच्या लेखनाची व्यापकता समजून येते. केवळ साहित्य आणि केवळ माणूस म्हणून या ग्रंथाकडे न पाहता वाङ्मयीन जडणघडण आणि साहित्यातला एकेक टप्पा पार करत लेखनाची ऊर्जा सांभाळणाऱ्या अरुणाताईंविषयी एकूण आकलन या ग्रंथातून होते. प्रसिद्ध संशोधक रा. चिं. ढेरे यांच्या कन्या हा एक पिढीजात मिळालेला वारसा आणि संस्कारांच्या शिदोरीवर त्यांचे व्यक्तिमत्त्व फुलत गेले. वाचनाची सवय, संशोधक वृत्ती, संवेदनशीलता, मनाची हळुवारता, जात्यावरच्या ओव्या, घरातल्या सुसंस्कृत वातावरणातल्या श्लोक-पोथ्यापुराणं-आरत्या यांच्या कानावर पडणाऱ्या ओळी, बालपणी लिहिलेल्या निबंधाचे झालेले कौतुक, अनुभवलेल्या निसर्गाची विविध रूपे, केलेला प्रचड प्रवास, दुर्गा भागवत-शांता शेळके अशा प्रतिभावंतांच्या सान्निध्यातून झालेली साहित्यिक वाटचाल लेखनाला बळ देणारी ठरली. अशा अनेकविध गोष्टींनी एक समृद्ध लेखिका नावारूपाला येणे हा वाङ्मयीन प्रवास खूप महत्त्वाचा आहे. अत्यंत हळुवारपणे बालपण गोंजारत साहित्याच्या प्रवासात वास्तवाकडे येणाऱ्या कवयित्रीची वाटचाल मांडली आहे.

अरुणाताईंच्या कथावाङ्मयाकडे पाहताना त्या त्या काळाचे संदर्भ त्यांच्या कथेत व्यक्त होतात, हे दिसते. स्त्रियांच्या वाट्याला येणारे दुःख, दाटून येणारे मळभ, स्थळ-काळाचा संदर्भ, स्वीकार-नकाराच्या नोंदी, मानवी नात्यांचे संदर्भ त्यांच्या कथेत येतात. आजीचं आणि नातवाचं प्रेम असो की, कौटुंबिक दुःखाचं आवरण असणारी 'वळवाचा पाऊस' असो, या कथा विलक्षण लक्षवेधी आहेत. प्रेमकथा, मिथककथा, पौराणिक कथा, कौटुंबिक कथा, अध्यात्म जाणिवेच्या कथा, सामाजिक आशयांच्या कथा, स्त्रियांची घुसमट आणि कोंडी



अनुक्रमणिका



मांडणाऱ्या अनेक कथा, अंतर्मनाची घालमेल अशा कितीतरी विषयांना आपल्या कथांच्या केंद्रस्थानी ठेवले आहे. 'सती' सारख्या कथेतली चंद्रगुजरी ही नायिका आणि तिचे चितेत उडी मारून सती जाणे हा नेमका आशय. मात्र मनातली होकार-नकाराची द्विधावस्था आणि त्यातून सोसावे लागणारे मनाचे द्वंद्व ही कथा मांडते. स्त्रीला एकटीला जीवन जगावे लागते, तेव्हा समाजात राहून समाजाशी दोन हात करताना निराधार स्त्रीची होणारी जगण्याची लढाई दिसते, तर कधी स्त्रीचे शरीर हेच स्त्री जातीचे सत्य होय, असे सांगणारी सुचित्राची कथा 'विस्कटलेली' मध्ये भेटते. केवळ स्त्रियांचेच सुखदुःख सांगणाऱ्या या कथा नाहीत, तर पुरुषांच्या वर्तनाची अनेकविध रूपे कथांतून भेटतात. दारिद्र्य, वैराग्य, आयुष्याचा चुकलेला अंदाज अशा कित्येक पातळ्यांवर सुहासचे जीवन 'प्राक्तन' कथेत भेटते. सती कथेतला चंद्रहास, लढाईमधला संजय, अशी कित्येक पात्रे कथानायक म्हणून यशस्वी होतात, तर कधी समस्यांच्या गर्तेत पिचलेली पात्रेही कथेतून येतात. कथाच्या पात्रांची संयमी भाषा, प्रत्येकाचे जगण्याचे तत्त्वज्ञान, अशा दृष्टीने कथेची व्यापकता व्यक्त झाली आहे. कथावाङ्मयाचा अभ्यास करताना अजूनही कथांचा आशय विस्तृतपणे यायला हवा होता. कथेच्या आकलनाच्या दृष्टीने हे महत्त्वाचे होते.

प्रामुख्याने अरुणा ढेरे कवयित्री म्हणून ओळखल्या जातात. 'प्रारंभ' पासूनचा काव्यप्रवास मोठा विलक्षणच आहे. स्वाती शिंदे याही कवयित्री असल्यामुळे त्यांचा काव्याचा अभ्यास आणि अरुणाताईंच्या कवितेविषयीची मतप्रणाली महत्त्वाची आहे. प्रगल्भ चिंतन, सूक्ष्म दृष्टी, सभोवतालच्या जाणिवांना शब्दबद्ध करताना मूळची संवेदना हरवू न देता अत्यंत सामर्थ्यशील शब्दांत व्यक्त होणारी कविता जुन्या-नव्या परंपरांचे आत्मीय नाते जपते. लोकसाहित्य, लोकसंस्कृतीचा बाज सांभाळत प्रभावी आविष्कार त्यांच्या काव्यात व्यक्त होतो. दुःख स्वतःकडे घेऊन सुख वाटत जगण्याचा प्रयत्न करणाऱ्या स्त्रीमनाचे व्यापकत्व त्यांच्या कवितेत ठळकपणे येते. स्त्रीवादी विचारपरंपरा असो किंवा वर्तमान व्यवस्थेत अडकल्या मनाचे सैरभैर रूप असो, त्याची अत्यंत खोलवरची घुसमट अरुणाताईंच्या कवितेत आहे. अरुणाताईंच्या कवितेत येणारे पौराणिक संदर्भ, मिथकांचा वापर आणि त्यातून साधलेली चिंतनशीलता याचे एक व्यापक रूप प्रयोगशील वृत्तीने महत्त्वाचे ठरते. स्त्रीजातीचा अभिमान आणि स्त्रीजन्माचे स्वागत, स्त्रीजीवनाची सुख-दुःखे, दुसऱ्यांसाठी आयुष्य झिजवणाऱ्या स्त्रीचे चित्र, भावनिक आणि मानसिक आंदोलन हे सगळेच विविधांगी प्रतिमेतून व्यक्त होते. प्रीतीची भावना, निसर्गरूप, भावनिक आंदोलने, नात्यांच्या पलीकडची निखळ मैत्री, सात्त्विक प्रेमभावना, वैफल्य आणि उद्ध्वस्त भावजीवन, प्रेमातले बदलत गेलेले संदर्भ अशा असंख्य गोष्टींचे प्रारूप त्यांच्या प्रेमकवितेत येते. मात्र खरी जीवनविषयक चिंतनाची कविता महत्त्वाची ठरते ती त्यातील शब्द सामर्थ्य आणि चिंतनाच्या खोलीतूनच. मनातल्या रानटी फुलांचे रंगलोलक कसे बदलत जातात, जुन्या दिवसांच्या आठवणींवर नव्या दिवसांना सामोरे जाताना आयुष्याशी जुळवून घेताना होणारी कसरत, सोसलेल्या दुःखांचे कढ, एकाकीपणाच्या वाटेवरून दूरवर गेलेला जीवनप्रवास आणि या सगळ्यातून वास्तव जगण्याला सोपे करण्यासाठीचा जीवाचा आटापिटा हे सगळंच खूप आतून येणारं आहे. शिवाय अज्ञात प्रवासाची ती वाटचाल आहे. प्रेमभावना, जीवनाविषयीचे चिंतन, मृत्यू नावाच्या अनोळखी गावाचे रूप, अध्यात्म आणि त्याची समृद्धता, सोशिकतेतून वाट्याला येणारा अंधार आणि पुढे उजेडाची चाहूल, शिवाय 'अपरिचित उदासी खोल प्राणात जागो, प्रभू तव करुणेचा दीप शब्दात लागो!'



अनुक्रमणिका



अशा साध्या शब्दांतून परमेश्वराशी साधलेला संवाद या सगळ्यातून एक भक्तिपरंपराही कवयित्री जपते. मानवी नात्यांची नाजूक वीण, भविष्याविषयीची चिंता, आशय आणि अभिव्यक्ती, प्रतिमांची दुनिया, स्त्रीप्रतिमा, मूल्यांची जाणीव, सामाजिकतेचे भान, अशा असंख्य वैशिष्ट्यपूर्ण गोष्टी त्यांच्या कवितेत येतात. डॉ. स्वाती शिंदे यांनी अरुणाताईंच्या कवितेविषयीचा केलेला सूक्ष्म अभ्यास कवितेला न्याय देणारा आहे, हे इथे महत्त्वाचे आहे.

अरुणा ढेरे यांनी कवितेबरोबरच ललितलेखनही केले आहे. शब्दांचे लाघवी रूप, नाजूक आणि हळव्या शब्दांचे संयमी चित्र, लौकिक-अलौकिक तत्त्वाचे रूप, साहित्यविश्वाची प्रामाणिकता, पात्रांचा जिव्हाळा श्रावणातल्या संध्येचे रूप, भोगापेक्षा त्यागाची कसोटी, प्रेमातला ओलावा आणि विरहाची आर्तता, अध्यात्म आणि पुराण, लोकसाहित्याचा आधार, प्रवासातल्या अनुभवांचे वेगळेपण, काव्यमय भाष्य आणि काव्यमय शैली, ग्रंथांविषयीचे प्रेम, सर्जनाच्या आणि सृजनाच्या प्रतिमांची व्यापकता, कविकुळाशी असलेले नाते सांगताना असंख्य कवींच्या संदर्भातून मानवतेकडे जाणारी लेखणी या विचारधारेने अधोरेखित होते. अनुभवसंपन्नता, शब्दांचा संयमीपणा, मिथकांचा वापर, बुद्धी आणि भावना यांचे संमिश्र रूप, बहुआयामी-अनुभवांचे सच्चेपण, भाषाशैली, भाषेतून व्यक्त होणारी आत्मशोधाची जाणीव या सगळ्याच गोष्टी त्यांच्या ललितलेखनात येतात. कवितेइतकेच ललितलेखनाचे सामर्थ्य सांगणारी अरुणाताईंची लेखणी शोधण्याचा प्रयत्न डॉ. शिंदे यांनी केला आहे. समीक्षा, लोकसाहित्याचा आवाका अशा व्यापक लेखनाचाही आपल्या परीने सूक्ष्म अभ्यास करताना काही निष्कर्ष नोदविलेले आहेत. ते महत्त्वाचे आहेत. गूढतेचे दर्शन, संस्कृतप्रचुर भाषा, काव्यमयता, काव्य आणि ललितलेखनातून दिसणारे नाट्य, चित्रवर्णन, निसर्गवर्णन, दृश्यमय चित्र अशा कितीतरी गोष्टींचे विस्तृत विवेचन या ग्रंथात आहे. ग्रंथाच्या शेवटी या अभ्यासातून एका कवयित्रीला समजून घेतल्यानंतरची भावना मांडली आहे. याशिवाय अरुणा ढेरे यांची दीर्घ मुलाखत ही वाचकांना एक पर्वणी आहे.

अंतिमतः 'अरुणोदय' हा ग्रंथ म्हणजे अरुणा ढेरे यांच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाचा,त्यांच्या लेखनसमृद्धीचा एक अभ्यास आहे. अरुणाताईंची साहित्याकडे बघण्याची दृष्टी, त्यांचे कथात्म साहित्य, कवितेची मर्मस्थळे, ललित लेखातून व्यक्त होणारी भाषाशैली, साहित्यिक भान, लेखनाची व्यापकता, साहित्यलेखनाचे विशेष अशा अनेक घटकांचा अभ्यास या ग्रंथात नमूद आहे. मध्यमवर्गीय संवदेनेचे सखोल आणि भावस्पर्शी असे असणारे लेखन अरुणाताईंच्या लेखनातून व्यक्त होते. अरुणा ढेरे यांच्या वाङ्मयीन कलाकृतींची नेमकेपणाने समीक्षा करताना अभ्यासाच्या मर्यादा जाणवतातच, यासाठी अरुणा ढेरे यांच्या मूळ साहित्यकृती वाचायला हव्यात, ही प्रामाणिक ऊर्जा निर्माण करणारा हा ग्रंथ संस्कृती प्रकाशनाने तितकाच समृद्धपणे प्रकाशित केला आहे.

- अरुणोदय- डॉ. स्वाती शिंदे-पवार
- संस्कृती प्रकाशन, पुणे
- प्रथमावृत्ती : जानेवारी, २०१९
- मूल्य : रू. २७५/-
- पृष्ठे : २२४



**डॉ. चंद्रकांत भगवंत पोतदार**
मराठी विभाग, यशवंतराव चव्हाण महाविद्यालय, हलकर्णी चंदगड, कोल्हापूर. ४१६५५२ । संपर्क : ९४२३२८६४७९२७



अनुक्रमणिका



महाभारत या महाकाव्यातील
कृष्णाबाबत प्रा. भिवा कांबळे यांनी लिहिलेला
संशोधनपर लेख.

# ।। महाभारतातील दोन कृष्ण ।।

प्रा. भिवा कांबळे

महाभारताचे अध्ययन करताना दोन प्रकारचे कृष्ण दृष्टिपथात येतात. पांडवांना सतत साहाय्य करणारा आणि कौरवांना वेळोवेळी विरोध करणारा एक कृष्ण महाभारतात आहे. त्यालाच वासुदेव कृष्ण या नावाने ओळखले जाते. अर्जुनाला गीतोपदेश करणारा कृष्ण पांडवांचा मित्र नव्हता आणि कौरवांचा शत्रूही नव्हता. सर्व मानव जातीचे कल्याण इच्छिणारा तो भगवान कृष्ण होता. असे दोन प्रकारचे कृष्ण महाभारतात आढळून येतात. वासुदेव कृष्ण मानवी रूपात आहे, तर गीताप्रभू दैवी रूपात आहे. वासुदेव कृष्ण हा पांडवांचा सखा आणि कौरवांचा शत्रू होता. हे महाभारतातील अनेक घटनावरून स्पष्ट होते.

**अक्रूर आणि पांडव यांची भेट :–**

कुंतीसह बालपांडव गंधमादन पर्वतावरून हस्तिनापुरात आले. कालांतराने कौरव आणि पांडव यांच्यात वादविवाद आणि कलह सुरू झाला. द्वारकेत हे वृत्त वसुदेवाच्या कानावर पडले. वसुदेवाच्या सूचनेनुसार कृष्णाने बंधू अक्रुरास कुंती आणि पांडवांचे क्षेमकुशल विचारण्यासाठी हस्तिनापूरला पाठविले. अक्रुराने हस्तिनापुरात जाऊन कुंती, पांडव यांची भेट घेतली. अक्रुराने राजा धृतराष्ट्र, विदुर आणि भीष्म यांची भेट घेतली आणि त्यांना कृष्णाचा संदेश कथन केला.

वसुदेवाकडूनच कृष्णाला कुंती आणि पांडव यांच्याशी त्यांचे असलेले नाते कळले होते. कृष्ण वृंदावनातून कंसवधासाठी मथुरेत आला. तो मथुरेत आला. तो मथुरेतून पुढे द्वारकेत गेला. निरंतरच्या युद्धामुळे कृष्ण मथुरेतून पुन्हा वृंदावनातही जाऊ शकला नाही. राधेला दिलेले वचन कृष्णाला पाळता आले नाही. कृष्ण म्हणूनच हस्तिनापूरला गेला नाही. कृष्णाचा दूत या भूमिकेत अक्रूर हस्तिनापूरला गेला.

''कुंतीमातेसह आम्ही गंधमादन पर्वतातून लहान वयातच हस्तिनापुरात प्रथम प्रकट झालो. ही वार्ता त्याला काही दिवसांतच द्वारकेत समजली. मग वासुदेव बात्रांच्या आग्रहावरून तो आमची खडान्‌खडा माहिती उचलत होता. सूर्यग्रहणाचा नेमका मुहूर्त साधून तो आम्हांला कुरूक्षेत्रावर उद्धव देवासह प्रथम भेटला होता. त्या दिवसापासून तो आणि उद्धव देव यांच्या स्मरणाशिवाय आम्हा पांडवांचा आणि कुंतीमातेचा एक दिवस गेला नाही.''[१]

**१) कृष्ण आणि पांडव भेट:–**

कृष्ण आणि पांडव यांची दुसरी भेट द्रौपदी स्वयंवरात कांपिल्य नगरीत झाली. स्वयंवर मंडपात ब्राह्मणवेषात उपस्थित असलेल्या पांडवांना कृष्णाने अचूक ओळखले पांडवांची देहयष्टी आणि सौंदर्य गुप्त राहत नव्हते. सूर्य, चंद्र, आणि सत्य कधीही लपून राहत नसते, असे म्हणतात. बुद्धिमान आणि बहुश्रुत कृष्णाने स्वयंवरात पांडवांना अचूक ओळखले, यात आश्चर्य काहीही नव्हते. सरतेशेवटी



सुवर्णमुद्रांच्या राशी इत्यादी अनेक वस्तू होत्या. स्वतः कृष्ण आणि बलराम या अतिथींच्या उपस्थितीमुळे विवाहसमारंभाला अतिशय शोभा आली''

### ३. इंद्रप्रस्थाची स्थापना

कौरव पांडवामधील अंतर्गत संघर्ष टाळण्यासाठी कृष्णाने धृतराष्ट्राकडे राज्य विभागणी करण्याची सूचना केली. कृष्णाच्या प्रभावाने धृतराष्ट्राने पांडवांना स्वतंत्र राज्य दिले. खांडवप्रस्थ अरण्यात कृष्णाने विश्वकर्माच्या साहाय्याने पांडवांसाठी महाल निर्माण केला. त्या महालाला कृष्णाने इंद्रप्रस्थ हे नाव दिले. यावरून कृष्ण पांडवांच्या संकटसमयी मदतीसाठी धावून जात होता, हे स्पष्ट होते. ''कृष्ण आणि पांडव यांच्या परिश्रमाने खांडवप्रस्थाचे रूपच पालटले. यमुना नदीच्या तीरावरचा टापू सुजलाम सुफलाम झाला. जणू प्रत्यक्ष स्वर्ग अवनीतलावर अवतरला असेच कुणालाही वाटले असते. क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांच्यासाठी खास स्वतंत्र वसाहती झाल्या. केंद्रस्थानी अद्‌भुत उत्तुंग आणि विस्तृत महाल बांधले.''

अर्जुनाने स्वयंवरातील पण जिंकला. द्रौपदी अर्जुनाची पत्नी झाली. सर्व पांडव द्रौपदीसह कांपिल्य नगरातील कुंभाराच्या घरी विश्रांतीसाठी गेले. कृष्ण आणि बलराम ही पांडवांचा पाठलाग करीत कुंभाराच्या घरी पोहचले. कृष्ण आणि बलरामला पाहून कुंतीला खूप आनंद वाटला. कृष्णाच्या पुढाकारानेच द्रौपदी आणि पांडव यांचे विवाह संपन्न झाले. कृष्णाने पांडवांच्या विवाहात त्यांना अनेक हत्ती, रथ, सुवर्णमुद्रा आणि उंची वस्त्रे प्रदान केली. यावरून कृष्ण आणि पांडव यांच्यातील स्नेहभाव प्रकट होतो.

द्रौपदी स्वयंवरात कृष्णाने कौरवांना विरोध दर्शविला द्रौपदीने स्वयंवरात कर्णाचा अपमान केला, तेव्हा कृष्ण प्रसन्नपणे हसत होता. दुर्योधनाने द्रुपदाला जाब विचारला, तेव्हा कृष्णाने दुर्योधनाला शांत करण्याचा प्रयत्न केला. कर्ण आणि अर्जुन यांचे युद्ध सुरू झाले, तेव्हा कृष्णाने मध्यस्थी करून ते युद्ध थांबवले. तोपर्यंत पांडवांना भेटून कृष्ण आत कुंतीकडे वळला होता. त्याने कुंतीच्या पायावर मस्तक ठेवले आणि म्हणाला,

''मी वसुदेवाचा पुत्र कृष्ण।''

त्याला पाहताच कुंतीला भडभडून आले. आपल्या त्या भाच्याला पोटाशी धरून कुंतीने बराच वेळ असावे गाळली. नंतर संयम करून ती म्हणाली,

''कृष्णा किती वर्षांनी रे भेटलास?''

''कृष्ण आणि बलराम या दोघांनी पांडवांना मूल्यवान आहेर केला. त्या आहेरांत वैडूर्य रत्ने जडलेली सुवर्णभूषणे, अमूल्य वस्त्रे, नाना प्रकारची रत्ने, काश्मिरी शाल जोड्या, अनेक मऊ शय्या, अनेक प्रकारची रथादी वाहने, उत्तम शृंगारलेले हत्ती, सुलक्षणी घोडे,

### ४) पांडवांचा राजसूय यज्ञ

नारदाच्या सूचनेनुसार युधिष्ठिराला राजसूय यज्ञ करण्याची इच्छा झाली. राजसूय यज्ञाचा विचार करताना युधिष्ठिराला कृष्णाचे स्मरण झाले. कृष्णाच्या मार्गदर्शनाने राजसूय यज्ञ पूर्ण साकार होईल अशी युधिष्ठिराची खात्री झाली. त्याने द्वारकेला दूत पाठवून कृष्णाला हस्तिनापुरात बोलावून घेतले. कृष्णाने हस्तिनापुरात येऊन सर्व पांडवांबरोबर राजसूय यज्ञाच्या संदर्भात चर्चा केली. जरासंध राजसूय यज्ञातील मुख्य अडथळा आहे, असे कृष्णाने युधिष्ठिराला समजावून सांगितले. युधिष्ठिराच्या संमतीने कृष्णाने भीम आणि अर्जुन यांच्यासह मगध देशात जाऊन जरासंधाला मल्ल युद्धाचे आव्हान दिले. भीमाने मल्लविद्येत जरासंधाचा वध केला. कृष्णाने युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञाचा मार्ग निष्कटक केला. राजसूय यज्ञात कृष्णाने शिशुपालाचा वध केला. पांडवांनी कृष्णाची अग्रपूजा केली. या प्रसंगावरून पांडव कृष्णाला आपला

आधारस्तंभ आणि मार्गदर्शक मानत होते, हे स्पष्ट होते. पांडवांना भीष्मापेक्षाही कृष्ण अधिक जवळचा वाटत होता.

'युधिष्ठिराने म्हटले, ''श्रीकृष्णा, मी माझ्या दोघा भ्रात्यांस, तू बरोबर असतां मृत्युमुखात धाडीन। तुझ्यासारखा पाठीराखा असल्यावर मला कशाची चिंता?''

५. वनात कृष्ण आणि पांडव यांची भेट

कौरव-पांडवांच्या द्यूत क्रीडेंत पांडव हरले आणि ते वनात निघून गेले. कृष्ण कौरव-पांडवांच्या द्यूतक्रीडा प्रसंगी उपस्थित राहिला नाही. तसेच तो हस्तिनापुरात जाऊन धृतराष्ट्रालाही भेटला नाही. कृष्ण सर्वप्रथम पांडवाचे सांत्वन करण्यासाठी द्वैत वनात गेला. वनभेटीत कृष्ण कौरवांविरुद्ध युद्ध करण्यासही सिद्ध झाला. यावरून कृष्ण पांडव हितैषी होता, हे स्पष्ट होते.

श्रीकृष्णाने म्हटले, ''युधिष्ठिरा, धर्मा, कौरवांचे दिवस आता भरत आले आहेत. जो अधर्माने वागेल त्यास ठार करणे हा कायमचा धर्मच आहे.

''धर्मा, जो तुम्हा पांडवाचा अपमान, तो प्रत्यक्ष माझा अपमान! -''

६. कर्ण आणि कृष्ण भेट

कौरव पाडवांचे युद्ध निश्चित झाले. कृष्णाने पांडव विजयाची प्रतिज्ञा केली होती; पण पांडव कर्णाचा वध करण्यास समर्थ नव्हते, हे जाणून कृष्णाने कर्णाला पाडव पक्षात ओढण्याचा प्रयत्न केला. कर्णाने कृष्णाच्या वचनावर विश्वास ठेवला नाही. तेव्हा कृष्णाने कर्णाला इंद्रप्रस्थ राज्य आणि द्रौपदी पत्नी यांसारखी आमिषे दाखवली, तरीही कर्ण कृष्णाच्या मोहिनीला बळी पडला नाही. कृष्णाने तरीही कर्णाच्या मनात भावनिक विचारांची खळबळ माजवली. कुंतीने कर्णाकडे पाच पांडवांचे जीवित दान मागितले. कर्णानेही ते वचन मान्य केले. कर्णाच्या या वचनामुळे कौरवांचे फार मोठे नुकसान झाले. हे सारे कृष्णामुळे घडले. ''हे ऋषिकेशा, तू मला अपार धन द्रव्य दिलेस, माझ्यापुढे सोन्यानाण्यांच्या अखंड राशी ओतल्यास अथवा या संपूर्ण पृथ्वीचे राज्य मला बहाल केलेस, तरीही मी माझ्या तत्त्वापासून तसूभरही ढळणार नाही. युद्धात मला मरण आले तरी बेहत्तर; पण मी माझा दृढनिश्चय बदलणार नाही.''

७. कृष्णाची शिष्टाई

कौरव पांडवांचे युद्ध कृष्णाच्या साक्षीने झाले; पण कृष्णाने ते युद्ध रोखले नाही; असा आरोप कृष्णावर येऊ नये म्हणून कृष्णाने कौरव पांडवांचे युद्ध रोखण्यासाठी कौरव दरबारात जाऊन शिष्टाई करण्याचा प्रयत्न केला. कौरव दरबारातील भाषणात कृष्णाने कौरवांचे मन परिवर्तन करण्यापेक्षा कौरवाचे अपराध, दोष आणि दुर्बलतेचे प्रदर्शन केले. कौरव पांडवांचे युद्ध घडले, तर बलवान पांडव दुर्बल कौरवांचा विनाश करतील. तो विनाश टाळावयाचा असेल, तर लोभी दुर्योधनाने पांडवाच्या उदरनिर्वाहासाठी निदान पाच गावे तरी पांडवांना द्यावीत, असे कृष्ण भाषणात बोलला. स्वाभिमानी दुर्योधनाने कृष्णाच्या या आरोपाला कडाडून युद्धाची घोषणा केली. 'पांडवांना युद्धाशिवाय सुईच्या टोकावर बसेल एवढी



भूमीही मिळणार नाही.' असे दुर्योधनाला म्हणावे लागले.

'श्रीकृष्णाच्या गंभीर भाषणाने सर्वांचे लक्ष आकृष्ट करून घेतले. तो पुढे म्हणाला,

''पांडवाचा अपमान करण्याकरता तुझ्या पुत्राने जी दुष्कृत्ये केली, त्यांचे प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे परवाच घडलेला अत्यंत खेदजनक असा द्यूत प्रसंग। तो मुद्दाम घडवून आणला गेला होता. त्या प्रसंगी तुझ्या पुत्रांनी अतिशय निंद्य आचरण केले. इतकेच नव्हे तर पांडवांची धर्मपत्नी पांचाली हिची भर सभेत विटंबना करण्याचा दुःसह अपराध केला आहे.''

श्रीकृष्णाने दुर्योधनाकडे वळून आपल्या परीने त्याला अत्यंत हितकारी उपदेश केला; पण त्याकडे सर्वथा दुर्लक्ष करीत शेवटी चिडून दुर्योधन बोलला, ''पुरे झाले कृष्णा याहून अधिक मी एक शब्दही ऐकू इच्छित नाही. आम्ही प्रकट सभेत द्यूत खेळलो. त्यात पांडव हरले हा आमचा अपराध तर निश्चितच नाही! आणि युद्धाच्या वल्गना ते करीत आहेत! तर मग त्यांची ही इच्छा पुरी होऊन जाऊ दे''

**८. कृष्णाची रणनीती**

कृष्णाने पांडवाच्या जयासाठी अधर्माचा पुरस्कार केला. पितामह भीष्म पांडव सैन्याचा संहार करू लागले, तेव्हा कृष्णाने भीष्मासमोर शिखंडीला उभे केले. ही संधी साधून अर्जुनाने शिखंडीच्या मागे लपून भीष्मावर बाण प्रहार केले. शेवटी भीष्म रथातून खाली कोसळले.

दुर्योधनाच्या आरोपांनी संतप्त झालेल्या द्रोणाचार्यांनी पांडव सैन्यावर ब्रह्मास्त्र सोडून सर्वत्र हाहाकार निर्माण केला. पांडव सैन्य रणातून पळून गेले. तेव्हा कृष्णाने द्रोणाचार्यांना भ्रमित करण्यासाठी 'अश्वत्थामा मारला गेला' अशी सैन्यात अफवा पसरवली. अश्वत्थामा मारला गेला. या कल्पनेने द्रोणाचार्य व्याकूळ झाले. दुःखातिशयाने त्यांनी हातातील धनुष्य खाली टाकले. ते रथातच ध्यानस्थ बसले. कृष्णाच्या सूचनेनुसार धृष्टद्युम्नाने निर्दयपणे द्रोणाचार्यांचा वध केला.

कर्णाने अर्जुनाबरोबर तोडीस तोड युद्ध केले. सरतेशेवटी कर्णाच्या रथाचे चक्र भूमीत रुतून बसले. कर्ण भूमीतून रथचक्र बाहेर काढत असताना कृष्णाच्या आदेशाने अर्जुनाने बेसावध कर्णाचा वध केला.

भीम आणि दुर्योधन यांच्या भयंकर गदायुद्ध प्रसंगी कृष्णाच्या सूचनेनुसार भीमाने दुर्योधनाच्या मांडीवर क्रूरपणे गदा प्रहार केला. त्यात दुर्योधनाचा वध झाला. या आणि अशा अनेक घटनांवरून कृष्ण पांडवाचा सखा आणि कौरवांचा शत्रू होता हे स्पष्ट होते. पांडवाचा कैवारी आणि कौरवांचा कर्दनकाळ असलेला कृष्ण देव नसून मानवी होता. असे अनुमान काढता येते. देव कधीच पक्षपाती नसतो. ''माझ्या शंभर पुत्रांचा निर्दय, निर्मम वध करणारं महायुद्ध तूच पेटविलंस! माझ्या कुरूवंशाचा तूच निर्वंश केलास! माझ्या सर्व सुनांना तूच विधवा केलंस ! तुझी एकट्याची रक्षागोळी करून माझ्या मातृहृदयाला, जीवनभर अंधपणा स्वीकारलेल्या तपःतप्त आत्म्याला कधीच शांतता मिळणार नाही. यासाठी मी गांधाराची कन्या, कुरूंची राजमाता-निष्ठापूर्वक शिवभक्त गांधारी तुला, द्वारकेच्या यादवांच्या नायका, वासुदेव देवकीच्या पुत्रा-श्रीकृष्णा तळतळून शाप देते आहे. आजपासून तीन तपांतच तुझाही तुझ्या सर्व यादवकुळासह असाच वंश विनाश होईल.!!!'

**भगवद् गीतेतील कृष्ण**

भगवद्गीतेतील कृष्ण हा भगवान आहे. देवाधिदेव, परमात्मा आहे. भगवद्गीतेतील ज्ञान सर्व मानवजातीला सर्वकाळी मार्गदर्शन करणारे आहे. हे सर्वसामान्य आहे, सर्वश्रुत आहे. गीतेतील ज्ञान शाश्वत आहे, असे विश्वव्यापी अक्षय्यज्ञान सांगणारा कृष्ण निश्चित देव असेल, असे ठामपणे म्हणता येते. भगवद्गीतेत कृष्णाने कौरवांना कोठेही दोष दिलेला नाही अथवा पांडवांचा कोठेही गौरव केलेला नाही. गीतेतील कृष्ण सर्वथा तटस्थ आहे. तो सर्व मानव प्राण्यांकडे समतेने पाहतो. तो सर्वांच्या हृदयात समानतेने वास करतो. तो सर्व मानवजातीच्या कल्याणाचा विचार करणारा आहे. भगवद्गीतेतील कृष्ण शत्रूलाही सन्मार्ग दर्शवणारा आणि पापी मनुष्यालाही पावन करणारा आहे. जो कोणी कृष्णाची भक्ती करतो, त्याला कृष्णाची प्राप्ती होते. गीतेतील कृष्ण या चराचर सृष्टीचा जनक, पालक आणि संहारक आहे. कृष्णाने भगवद्गीतेत स्वतःचा परिचय सांगितलेला आहे.

१. यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।
अभ्युत्थानं अधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ।।७।।

२. परित्राणाय साधुना विनाशायच दुष्कृतां/
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ।।८।।'



'' जेव्हा जेव्हा धर्माचा ऱ्हास होतो आणि अधर्माचा प्रादुर्भाव होतो. तेव्हा तेव्हा नव्या धर्माची स्थापना करण्यासाठी, साधुसंतांचे रक्षण करण्यासाठी आणि दुष्टाचा संहार करण्यासाठी मी या पृथ्वीवर पुन्हा पुन्हा अवतार धारण करतो. (अ.७ आणि ८)''

३. मत्त : परतरं नान्य किन्चिदस्ति धनंजय ।
मयि सर्वमिदम प्रोतं सूत्रे माणगणाइव ।।७।।
अ. ७ . श्लोक ७.''

''हे धनंजया, माझ्यापेक्षा श्रेष्ठ या जगात कोणीही नाही. माळेमध्ये जसे मणी गुंफलेले असतात, तसे हे सारे जग माझ्यामध्ये गुंफलेलं आहे. (अध्याय ७ श्लोक ७)

४. पितामहस्य जगतो माता धाता पितामहः । वेद्यं पवित्रमोन्कार ऋवसाम यजुरेवच ।। श्लो. १७ अ ९)

''मी या जगाचा पिता, माता, धारण करणारा आणि आजोबा आहे. ऋग्वेद, सामवेद यांचा निर्माता मीच आहे. असे समज'' (अ. ९ श्लोक १७)''

५. नमे विदु सुरगणा प्रभवं न महर्षय ।
अहं आदि देवानां महर्षिणांच सर्वशः ।।
अ १०, श्लो. २ ।।''

''मला देवगण जाणत नाहीत. महर्षींना माझा जन्म विदित नाही. कारण मी देवगण आणि महर्षी यांच्याही आधीचा आहे.'' अध्याय १० श्लो २, ''

६. ''अहं सर्वस्य प्रभवः मत्तः सर्व प्रवर्तते ।
इति मत्वा भजन्ते मा वुधा भावसमन्विता ।।
अ. १० श्लोक. ८।।,

''मी या सर्व चराचराचा जनक असून माझ्यामुळेच हे चराचर चाललेले आहे, असे समजून बुद्धिमान लोक भक्तिभावाने माझे पूजन करतात. (अ. १० श्लोक ८). ''

७. '' अहं आत्मा गुडाकेश सर्व भूताशय स्थितः । अहं आदिच मध्यंच भूतानाम् अन्त एवच ।। ''हे अर्जुन, मी सर्व भूतांच्या ठायी वास करणारा आत्मा आहे. सर्व प्राणिमात्रांचा आदी, अंत आणि मध्य मीच आहे.'' अ. १० श्लोक २०, ''

८. अथवा बहुना एतेन कि ज्ञातेन तवार्जुन । विष्ठभ्याहमिकृत्स्नं एकांशेन स्थितःजगत ।। १०।। १, श्लोक ४२

'' हे अर्जुना, इतके सर्व जाणण्याचे तुझे प्रयोजन काय आहे? तू असे समज की, हे सर्व जग माझ्या योगशक्तीच्या एका अंशाने तारलेले आहे.'' अ. १० श्लोक ४२

९. कालोस्मि लोकक्षयकृत प्रवृद्धः लोकान्समाहर्तुम्इह प्रवृत्त : ।
ऋते त्वां न भविष्यन्ति सर्वे ये अवस्थिता प्रत्यनीकेषु योधा. ।। अ २२ ।। ३२ ।।

''मी साक्षात काळ आहे. लोकांचा विनाश करण्यासाठी मी वाढलेलो आहे. लोकांचा संहार करण्यासाठी मी प्रवृत्त झालो आहे. तुम्हा पांडवांच्या शिवाय प्रतिपक्षातील योद्धे जिवंत राहणार नाहीत.'' अ.

११ श्लोक ३२

१०. अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः। प्राणापान समायुक्ता पचाम्यन्नचतुर्विधम्।। अध्याय १५, श्लोक १४।।

''मी सर्व प्राणिमात्रांच्या देहांत राहणारा वैश्वानर अग्नी आहे. प्राण आणि अपान यांच्या साहाय्याने मी चार प्रकारच्या अन्नांचे पचन करतो.'' अ. १५ श्लोक ''

११. यस्मात् क्षरमतीतो अहमक्षरादपि चोत्तमः। अतोस्मिलोके वेदेच प्रथितः पुरूषोत्तम : ।। अ १५ ।। श्लोक १८, ''

''ज्याअर्थी मी नाशवंत प्राण्यांच्या पलीकडचा आणि देवांपेक्षा श्रेष्ठ आहे. त्या अर्थी मला वेद आणि तिन्ही लोक यांच्यामध्ये पुरूषोत्तम या नावाने संबोधले जाते.'' अ. १५ श्लो. १८

१२. मन्मना भव मदभक्त : मद्याजि मां नमस्कुरु । मामेव एष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रिय : असि मे ।। ६५।। अध्याय १८ श्लोक ६५ ।। १७

''हे अर्जुना, तू माझा भक्त हो, माझे यजन कर, मला नमस्कार कर, असे केल्याने तू सरतेशेवटी मलाच येऊन मिळशील. हे मी तुला प्रतिज्ञापूर्वक सत्य सांगतो.'' अ. १८ श्लो. ६५

१३. सर्व धर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज। अहं त्वा सर्व पापेभ्योः मोक्षयिष्यामि मा शुचः अ. १८ श्लो. ६६ ।।

''हे अर्जुना, तू सर्व धर्मांचा त्याग करून मला एकट्याला शरण ये. मी तुला सर्व पापांतून मुक्त करतो. चिंता करू नकोस.'' अ. १८ श्लो. ६६, ''

येथे भगवद्गीतेतील कृष्णाच्या मुखातून प्रकट झालेले काही श्लोक वानगीदाखल दिलेले आहेत. भगवद्गीतेतील कृष्ण प्राण्यांचा आत्मा आहे. वैश्वानर अग्नी आहे. सर्वहारा काळ आहे, मंत्र आहे, मोक्षदायी आहे. पुरुषोत्तम आहे आणि एका अंशाने विश्व पेलणारा परमेश्वर आहे. भगवद्गीतेतील कृष्णाची अशी विविध रूपे आहेत.

महाभारतातील कृष्णाला गांधारीने शाप दिला. सर्व यादववीर परस्परांत लढून मृत्यू पावले. शेवटी कृष्णाचा वनात एकाकी अंत झाला. कृष्णाला रणांगणात मृत्यू आलेला नाही. कृष्णाची द्वारकानगरी सागरात बुडाली. हे सर्व अनर्थ गांधारीच्या शापामुळे घडले. महाभारतातील कृष्ण मनुष्य होता म्हणून त्याला गांधारीचा शाप बाधला. हे कृष्णानेही मान्य केले होते.

संदर्भ


१. सावंत शिवाजी, युगंधर, कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुणे-९ पहिली आवृत्ती, २००० पृष्ठ क्र. ५९६
२. खेर भा द. सारथी सर्वांचा, विहंग प्रकाशन, आनंदनगर, पुणे सातवी आवृत्ती, २०१६ पृष्ठ क्र. १९२
३. तत्रैव
४. कांबळे भि. अ पुरुषोत्तम कृष्ण, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे ११, २००१, पृष्ठ क्र १००
५. दांडेकर गो. नी. श्रीकृष्णायन, मृण्मयी प्रकाशन, ३०२, तुळशीबागवाले वसाहत, पुणे ४११००९, २०१६ प्रथम आवृत्ती, पृष्ठ क्र. २१३
६. क्षेत्रमाडे सुमती, योगेश्वर श्रीकृष्ण, रिया पब्लिकेशन्स, २०१६, पृष्ठ क्र. २८९
७. कांबळे भि. अ. पुरुषोत्तम कृष्ण, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे ११, २००१, पृष्ठ क्र. १६६
८. दांडेकर गो. नी. श्रीकृष्णायन, मृण्मयी प्रकाशन, ३०२, 'मानसी' ६८
९. दांडेकर गो. नी श्रीकृष्णायन, मृण्मयी प्रकाशन, ३०२, 'मानसी' ६८ तुळशीबागवाले वसाहत, पुणे ४११००१, प्रथम आवृत्ती, २०१६, पृष्ठ क्र. २५५
१०. सावंत शिवाजी, युगंधर, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे-३०, प्रथम आवृत्ती पृष्ठ क्र. ८४१
११. श्रीमद्भगवद्गीता, गीता प्रेस गोरखपूर, २००३, आवृत्ती ४१, पृष्ठ क्र. ९६
१२. तत्रैव
१३ श्रीमद्भगवद्गीता, गीता प्रेस गोरखपूर, २००३, आवृत्ती ४१, पृष्ठ क्र. १६७
१४. तत्रैव पृष्ठ क्र २०५, पृष्ठ क्र. २०७, पृष्ठ क्र. २१९
१७. तत्रैव पृष्ठ क्र. २२६, १८. तत्रैव पृष्ठ क्र. २३७


❖❖


**प्रा.भिवा कांबळे**
२२, गुरुप्रसाद हौसिंग सोसायटी, त्रिमूर्ती हॉस्पिटल जवळ,
धायरी फाटा, सिंहगड रोड,
पुणे-४११०४१, मो. ९५१८३८९७०३




अनुक्रमणिका

‘अण्णाभाऊ साठे यांच्या साहित्यातील स्त्री पात्रांचा आणि त्यामधून व्यक्त होणाऱ्या स्त्री-जाणिवांची विविध रूपे दर्शविणारा लेख.

# ‘अण्णाभाऊ साठे यांच्या साहित्यातील स्त्री जाणिवा’

डॉ. वृंदा सुभाष कौजलगीकर

अण्णाभाऊ साठे प्रामुख्याने प्रादेशिक कादंबऱ्या, कथा लिहिणारे २० शतकातील दलित लेखक, त्यांचा जन्म १ ऑगस्ट १९२० वाटेगांवला सांगली येथे झाला आणि १८ जुलै १९६९ ला त्यांनी जगाचा निरोप घेतला. हे त्यांचे जन्म शताब्दी वर्ष. त्यांच्या साहित्यातील स्त्री जाणिवा या बद्दल मी विचार मांडणार आहे.

कथा असो वा कादंबरी यात व्यक्तिचित्रण महत्त्वाचे असते. त्यामुळे कथानक उभे राहते. कथा, कादंबरी लेखनातला तो महत्त्वाचा घटक आहे. व्यक्तिचित्रणामुळे वातावरण तयार होते. व्यक्तीच्या नेसण्या, बोलण्यातून, दिसण्यातून, संवादातून कादंबरी गुंफली जाते. व्यक्तिचित्रणे, स्त्री, पुरुष, मुले क्वचित प्राणी (उदा. सत्तांतर-कादंबरी-व्यंकटेश माडगूळकर, गोतावळा कादंबरी- आनंद यादव) यांची असतात. अण्णाभाऊंच्या कादंबऱ्या, कथांमधील स्त्री चित्रणे आपण पाहू या कारण तोच आजचा माझा विषय आहे.

कोणत्याही साहित्यिक, लेखक यांच्या जीवनाचे प्रतिबिंब त्याच्या साहित्यात उमटते. त्याचे साहित्य म्हणजे त्याच्या जीवनाचा आरसाच असतो. अण्णाभाऊ साठे मांग समाजातले. त्यामुळे गावकुसाबाहेरचे, भटके विमुक्त यांचे जीवन त्यांच्या कथा-कादंबरीत प्रतिबिंबित होते. ३५ कादंबऱ्या, ८ पटकथा, ३ नाटके, १ प्रवास वर्णन, १३ कथासंग्रह, १० प्रसिद्ध पोवाडे, १२ उपहासात्मक लेख अशी विपुल ग्रंथसंपदा त्यांची आहे. ‘फकिरा’ या त्यांच्या कादंबरीला राज्य पुरस्कार प्राप्त झाला. त्यावर चित्रपट निघाला. शिवाजी विद्यापीठात ती कादंबरी अभ्यासक्रमात लावली. जगातील २७ भाषांमध्ये अण्णाभाऊंची अनुवादित पुस्तके वाचली जातात. ‘‘पृथ्वी ही शेषनागाच्या मस्तकावरी उभी नसून बहुजन, दलित, कष्टकरी, श्रमिकांच्या तळहातावर पेलवली आहे.’’ असे ते म्हणत आणि अशा लोकांचीच जीवने त्यांनी त्यांच्या साहित्यात चितारली आहेत.

आचार्य अत्रे त्यांच्या साहित्याबद्दल म्हणतात, ‘ही जगण्यासाठी लढणाऱ्या माणसांची कथा आहे. अंगात असेल नसेल तेवढे बळ एकवटून त्यांना आक्रमक वृत्तींशी सामना द्यायचा आहे. त्यात त्यांना जिंकायचे आहे. ही कच खाणारी, हार मानणारी, माणसे नाहीत, वार झेलायला त्यांची छाती नेहमीच ताठ्याने उभारलेली आहे.’ यात त्यांच्या नायिकापण मागे नाहीत असेच मी म्हणेन. नायिका प्रामुख्याने लेखकाने पाहिलेल्या आजूबाजूच्या समाजातून उचलल्या आहेत. यात गावासाठी, गावाच्या प्रतिष्ठेसाठी जीवाचे मोल देणाऱ्या फकिरा कादंबरीमधल्या राणूची पत्नी आणि फकिराची आई राधा आहे. खलनायकाला ठामपणे रोखणारी वैजयंता कादंबरीमधील तमासगीर वैजयंता आहे. चित्रा कादंबरी मधील चित्रा व मुंबईत मामाकडून विकली गेलेली सोना दोघी मिळून लालीया,



जनरल कांतीलाल यांच्या तावडीतून चित्राची अब्रू वाचवतात. संघर्ष या कादंबरीमध्ये सुलभाने आपला बाहेरख्याली लंपट नवरा बाळासाहेब बावडेकर याच्याशी संघर्ष करून पुन्हा आपला प्रियकर आनंद याच्याशी संसार थाटला आहे. ही सगळी त्या बंडखोर स्त्रियांची. हार न मानणाऱ्या स्त्रियांची व्यक्तिचित्रणे आहेत. त्यांना जिंकायचे आहे अशा स्त्रियांची चित्रणे आहेत. त्यांना आपल्या अब्रूचे रक्षण करायचे आहे त्यात त्या यशस्वी होताना दिसतात. वारणेच्या खोऱ्यात या कादंबरीतील मंगल नको असलेल्या स्थळाचा आग्रह भाऊ धरतो त्याला ठाम नकार देते. हव्या त्या व्यक्तीशी लग्न करते आणि शेतावरच्या घरात नवऱ्यासह रहायला येते. भाऊ हिंमतराव या नव दांम्पत्याला मारण्यासाठी घराला वेढा घालतो तेव्हा ते दोघेही हिंमतीने लढा देतात; पण नाईलाज होतो तेव्हा दोघेही बंदूकीच्या गोळीने जीवन संपवतात; पण हिंदूराव व मंगल शत्रूच्या हाती लागत नाही.

या स्त्रियाही घोड्यावर बसणाऱ्या, बंदूक, भाला चालवता येणाऱ्या, खेडेगावातल्या, रानावनात राहणाऱ्या निसर्गकन्या आहेत. बहुतेक जणी बिजवराशी लग्न करणाऱ्या, प्रियकर वेगळा, लग्न दुसऱ्याशी त्यातून भोगवटा भोगणाऱ्या, बहुतेकींची पहिली लग्नं झालेली; पण ती फसलेली. फसवलेली, जबरदस्तीनं ती लग्नं लावलेली अशी आहेत. त्यांचे पहिले संसार मोडलेले आहेत. उदा. चित्रा या कादंबरीतील चित्रा, सोना या बहिणी, संघर्षमधली सुलभा, अहंकारमधली अवंतिका, आग या कादंबरीमधील शीला इ.

तमासगीर स्त्रियांचे चित्रणही त्यांच्या कादंबरीत वाचायला मिळते. उदा. 'वैजयंता' आणि 'रानबोका' या कादंबऱ्या; वैजयंतामध्ये आईला-गजराला तमाशात हरवणाऱ्या चंद्रा या तमासगीरबाईंचा सूड उगवण्यासाठी आईच्या आग्रहाखातर ती एकदाच तमाशाच्या फडावर नाचते; पण त्यामुळे उमा हा प्रियकर दुरावतो, शिवाय चंदूलाल हा थिएटर मालकाचा मुलगा, आबा पाटील हे मागे लागतात. इकडे आई आणि तिकडे प्रियकर दुरावतो, शिवाय चंदूलाल अशा कोंडीत ती सापडते. तमासगीरबाईच्या मागे सगळे वेडेपिसे होऊ लागतात त्याचा अनुभव ती घेते. ''तमाशा म्हणजे माझ्या देहाचे नग्न प्रदर्शन नाही. जनतेची मालकी माझ्या कलेवर, शरीरावर नाही'' असे ती ठामपणे सांगते. यात तिचा कणखरपणा दिसतो. नीतिमूल्यांची तिलाही चाड आहे हे जाणवते. रानबोका या कादंबरीतील मोहना ही दुर्दैवी आहे. आई तिचा जन्म होताच जगाचा निरोप घेते. एक म्हातारी तिला सांभाळते आणि तमाशात घालते, आणि संभाजी या कादंबरीतल्या नायकाचे लक्ष्मीशी लग्न होते तेव्हा मोहना तिची चुलत बहीण आहे हा इतिहास सगळ्यांना समजतो. संभाजी मग लक्ष्मीच्या आग्रहाखातर मोहनाशी लग्न करतो इथे तमासगीरांच्या जीवनापेक्षा प्रेमकथेवर भर आहे. सूड भावना ही प्रबळ दाखवली आहे. या दोन्ही कादंबऱ्यांत योगायोग फार दाखवले आहेत. मोहनापेक्षा वैजयंता जास्ती कणखर वाटते. ह्या दोन्ही कादंबऱ्या चाकोरीबाहेरचे जीवन जगणाऱ्या तमासगीर महिलांवर बेतलेल्या आहेत.

'चित्रा' ही एक नायिका प्रधान कादंबरी. दुःख, दारिद्र्य तिच्या पाचवीला पूजलेले आहेत. मामाकडे राहणाऱ्या विधवा आईला मामा फसवतो. मोठ्या बहिणीला सोनाला मामा मुंबईला नेऊन विकतो. हिचे लग्न होते; पण नवरा मरतो. हिलाही मुंबईला नेऊन विकण्याचा घाट मामा घालतो; पण सोनामुळे बहिणीमुळे तो शक्य होत नाही; पण बहिणीकडे येणाऱ्या गिऱ्हाईकांचा त्रास सुरू होतो. अशा एकातून उठली दुसऱ्या संकटात सापडली असेच तिच्या जीवनात घडत जाते. कादंबरीभर स्वतःच्या अब्रूचे रक्षण

करणे हे एकच काम तिला आहे. तोंड उघडून स्पष्ट न बोलणारी, प्रवाहपतीत, दुःख, दुर्दैव, गरिबी यात भरडून निघालेली, मुकाट्याने सारे सहन करणारी ही व्यक्तिरेखा आहे. स्त्रीत्व हा तिला मिळालेला शाप आहे असे वाटावे, असे हे चित्रण आहे.

संघर्ष या कादंबरीतली नायिका सुलभा हिच्या जीवनात अशा अनेक कोलांट्या उड्या आहेत. वडिलांचा अहंकार, सूड उगवण्याच्या भावनेमुळे आनंदवर प्रेम असूनही घरच्यांना हे दिसत असूनही ते हट्टाने त्याला नकार देतात आणि त्यात सुलभाचा बळी जातो. प्रेमभंगाचे दुःख, बाहेरख्याली पतीने दिलेले दुःख हे सर्व भोगून, योगायोगाचा भरपूर वापर करून कथानकाचा शेवट गोड केला आहे. शेवटी विस्कटलेला डाव सावरायचा हे तंत्र अनेक कादंबऱ्यांत दिसते. उदा. चित्रा, संघर्ष, वैजयंता, रुपा, अग्निदिव्य, अहंकार या कादंबऱ्या. गुंतागुंतीची कथानकं, नायिकेच्या जीवनाचा विस्कटलेला डाव आणि योगायोगाचा अतिरेक करून शेवट सुखान्त हे अनेक कादंबऱ्यांतून वाचायला मिळते.

'अग्निदिव्य' कादंबरीला प्रतापराव गुजर या शिवाजी महाराजांच्या सेनापतीच्या कथानकाची जोड आहे. या ऐतिहासिक कादंबरीमध्ये चंद्रा व खाशाबा यांचे प्रेम प्रकरण रंगवले आहे. तिच्या नकाराने हैबती दुखावतो. तो आदिलशहाला शिवाजी महाराजांच्या सैन्यातल्या बातम्या पुरवतो. पैसा कमावतो. विजापूरच्या गुप्तहेरांची मदत घेऊन चंद्राला विजापूरला पळवून नेतो. ती शिताफीने निसटते. रुक्सानाकडे असारा घेते. बहिर्जी नायकाच्या मदतीने रायगडावर पोहचते. संसाराला लागते. ही घोड्यावर बसणारी, खलनायकाच्या थोबडीत मारणारी, चपळाईने पळ काढून रुक्साना या मुस्लीम स्त्रीकडे आश्रय घेणारी स्त्री रंगवली आहे.

'वारणेच्या खोऱ्यात' ब्रिटिशांविरुद्धात बंड करणारे हिंदुराव आणि मंगल यांचे प्रेम जीवन आहे. तिचे हिंदुरावाशी लग्न ठरते; पण सासू वारल्याने तीन वर्षे लग्न पुढे ढकलले जाते. दरम्यान हिंदुराव क्रांतिकारकांत सामील होतो. वर्षभरापासून तो घरातून परागंदा होतो. त्याचे मंगलचे लग्न होते; पण दुसऱ्या दिवशीच गुंडांनी शेतातलं घर वेढल्यावर ते दोघे बंदुकीच्या गोळीने जीवन यात्रा संपवतात. ही सत्यकथेवर आधारलेली कादंबरी आहे, असे लेखक नमूद करतो. मंगल बंडखोर, भावाच्या जबरदस्तीपुढे मान न तुकवणारी आहे.

'आग' मध्येही प्रेमकथाच आहे. शीला व अनंताचे प्रेम आहे; पण धाकटी बहीण लता हिच्या सासरचे जबरदस्तीने तिचे मोहनशी लग्न लावतात. नाही तर लताचे नांदणे तुटेल अशी धमकी देतात. अनंता घरकाम करणाऱ्या मुक्ता या घटस्फोटितेशी लग्न करतो. शीला पुन्हा त्याच्याकडे आकर्षित होते. राजरोस त्याच्याकडे बेदरकारपणे यायला लागते. अनंता गावाला मित्राकडे जात असताना पाकिटमार पाकिट मारतो. गाडीला अपघात होतो त्यात चोर मारला जातो. खिशातल्या पाकीटवरून अनंताच गेला असे जाहीर करतात. त्याचे भूत झाले असे उठवतात. शेवटी लता त्याला गोळी घालते. मग मरताना तो सगळा उलगडा करतो. यातील नायिका शीला स्वैराचारिणी वाटते लग्नानंतरही ती अनंताशी शरीरसंबंध ठेवते. मोलकरीण मुक्ताही अनंताशी लग्न करण्याआधी शारीरिक जवळीक ठेवते. जबरदस्तीच्या लग्नाच्यावेळी मान तुकवणारी, बंड न करणारी शीला पुढे बंडखोर होऊन स्वैराचार करते. अनंताला गोळी लागते. तो दवाखान्यात प्राण सोडतो त्याचवेळी शीला त्याला भेटायला निघताना कार तिला उडवते, ती ही मरते. असा योगायोग इथेही आहे. दोघांच्या



चिता शेजारी शेजारी पेटवल्या जातात.

माकडीचा माळ या कादंबरीत भटक्या विमुक्त लोकांचे, भिकाऱ्यांचे चित्रण आहे. त्यांच्यातील भांडणे, सूड घेणे, मारेकरी घालणे, गावचा पाटील, बडी धेंडं यांचा देखण्या पोरींवर डोळा. त्यातून या पोरींना वाचवण्यासाठी शर्थ करणे हा मालमसाला आहे. दुर्गी या मुलीला त्यामुळे अनेक प्रसंगांना सामोरे जावे लागते. तिला पळवून नेतात, बांधून घालतात; पण ती योगायोगाने सुटते. मग पाटलापासून रक्षण करण्यासाठी तिला तिचा नियोजित पती येमू तिचे वडील व्यंकूच्या सांगण्यावरून निबिड जंगलात आठ दिवस घेऊन राहतो. शेवटी व्यंकू मरतो. त्याच्या मारेकऱ्यांचा शोध घेत त्याचे माकड धावते. ते आणि त्याची जोडीदारीण व्यंकूचे अंत्यसंस्कार बघून प्राण सोडतात म्हणून तो माकडीचा माळ. सासरी जाणाऱ्या दुर्गीचा निरोप घ्यायला व्यंकू उरत नाही.

रुपा या कादंबरीतही रुपावर दिनकर व गजा दोघांचे प्रेम आहे. गजा तिला आपल्याकडे वळवण्यासाठी मथी नावाच्या नायकिणीला हाताशी धरतो; पण शेवटी त्याने योजलेला सूड हाणून पाडून रुपा व दिनकरचे लग्न होते.

वैजयंता, मोहना, चित्रा, सुलभा, चंद्रा, मंगला, शीला, दुर्गा, रुपा या नायिकाप्रधान कादंबऱ्यामध्ये दुसरे त्यांच्यावर जबरदस्ती करून मनात नसलेल्या माणसाशी लग्न करायला भाग पाडतात. मात्र अहंकारमधील अवंतिका स्वतःच जबाबदार आहे. रामराव लग्नाआधी जवळीक करतो. ती त्याला झिडकारते म्हणून तो लग्नाला नकार देतो. अवंतिकाही अहंकारी. ती एका बिजवर श्रीमंत इनामदाराशी लग्न करते. तो इनामदार बाहेरख्याली, टगा आहे त्याचा अवंतिकाच्या इस्टेटीवर डोळा आहे. अवंतिका अशा नवऱ्याला जवळीक करू देत नाही. २/३ वर्षे त्याचा त्रास सहन करून ती पूर्वीचा प्रियकर व नियोजित पती रामरावला पत्र लिहिते. त्याचेही लग्न होऊन वर्षात बायको वारलेली असते. तो तिला साथ देतो. इनामदार त्याला खूप त्रास देतो; पण तो पुरून उरतो आणि शेवटी अवंतिकाशी लग्न करतो. एका अहंकारापायी दोघांच्या जीवनाची परवड होते; पण शेवट गोड होतो.

या सगळ्या प्रेमिका प्रामुख्याने अण्णाभाऊंच्या कादंबरीत आढळतात; पण आईच्या रूपात चितारलेली फकिरामधील राधा सर्वात उठावदार झाली आहे. गावच्या प्रतिष्ठेसाठी राणोजी जीवाचे मोल देऊन जोगीण

**या स्त्रियाही घोड्यावर बसणाऱ्या, बंदूक, भाला चालवता येणाऱ्या, खेडेगावातल्या, रानावनात राहणाऱ्या निसर्गकन्या आहेत. बहुतेक जणी बिजवराशी लग्न करणाऱ्या, प्रियकर वेगळा, लग्न दुसऱ्याशी त्यातून भोगवटा भोगणाऱ्या, बहुतेकींची पहिली लग्नं झालेली; पण ती फसलेली. फसवलेली, जबरदस्तीने ती लग्नं लावलेली अशी आहेत. त्यांचे पहिले संसार मोडलेले आहेत.**

शिरगावातून वाटेगावला आपल्या गावी आणतो. वीरपत्नी म्हणून गावाला तिचा फार आदर आहे. पाटील तिला नवऱ्याच्या माघारी मोलमजुरी करायला जाऊ देत नाही. कुलकर्णी जोगिणीची मिरवणूक तिला दर्शन घेता यावे म्हणून तिच्यापाशी थांबवतात. फकिरा आणि साधू या दोन मुलांना ती मोठे करते. लहानपणापासून बापाच्या शौर्याच्या कथातून मुलांना चेतवते. बापासारखे मोठे व्हा तुम्ही मोठे होईपर्यंत मी मरणार नाही म्हणते. जोगीण आणताना नवरा गेला;पण गावात आनंद निर्माण करून गेला याचा तिला अभिमान आहे. दोन मुलांच्या रूपाने आपल्यापुढे दोन राणोजीच वावरत आहेत, असे तिला वाटते. आपलं कुंकू गाजलं तशी आपली कूसपण गाजणार हे तिला सुखवून जाते; पण हात तुटलेला खोत गप्प नाही बसणार यामुळे मुलाची काळजीही वाटते. ती मुलांना चांगलं घडवण्याचा प्रयत्न करते. फकिराने जास्त उधळू नये म्हणून ती त्याचं लग्नही लावून देते. फकिरा शरण आल्यावर तर ती भ्रमिष्टच होते. परंपरागत आलेली तलवार फकिरा घरी नेण्यासाठी तिला देतो तेव्हा ती हंबरडा फोडते. मुलांची भांडणं सोडवणारी प्रेमळ माता, त्यांच्या उद्योगाने धास्तावलेली, अगतिक झालेली माता, त्यावर उपाय म्हणून लग्नाचा खोडा त्यांच्या पायात अडकवणारी माता, बलिदानाची माती कपाळाला चिकटली आहे तिला विसरू नका म्हणून चेतवणारी, प्रेरित करणारी माता, वीर पत्नी, वीर माता या सगळ्यांच्या पाठीशी तिचा त्याग, तिची झीज आहे. ही स्त्री जाणीव इथे ठळकपणे प्रगट झाली आहे.

अण्णाभाऊंच्या साहित्यातील स्त्री विषयक जाणिवा

विविध प्रकारच्या आहेत. तमासगीर स्त्री, पाल टाकून राहणारे, ते जीवन जगणारी स्त्री रूपे इथे आहेत, विकली गेलेली स्त्री आहे. दु:ख दारिद्र्य भोगणारी स्त्री आहे. कुणाच्या तरी हट्टापायी, सूड भावनेपायी जीवन उद्ध्वस्त झालेली स्त्री आहे. विधवा होऊन पुनर्विवाह करणारी स्त्री आहे. मानी, स्वत:चा अहंकार जपणारी स्त्री आहे. पळवली गेलेली स्त्री आहे. अनेक दु:खं भोगणारी स्त्री आहे; पण ही स्त्री तळागाळातल्या समाजातली आहे. वेळप्रसंगी ती तडफही दाखवते. शस्त्र चालवते. घोड्यावर बसते, अब्रू वाचवण्याचे खटाटोप करून त्यात यशस्वी होते. प्रेम एकावर लग्न दुसऱ्याशी असेही त्यांच्या साहित्यातील स्त्रियांबाबत खूप वेळा दाखवले आहे. राधा सोडली, तर प्रत्येक स्त्री सुंदर, तिचे डोळे, केस, उरोज, बांधा, गोरा रंग हे सर्व सुंदर, तिच्या सौंदर्यावर खलनायक वेडे झालेले आहेत. सर्व स्त्रिया तरुण, तारुण्याने मुसमुसलेल्या आहेत. स्त्री मधल्या प्रेयसीची प्रतिमा ठायी ठायी दिसते. अनेक वाटा तुडवून, वळणं वळून शेवटी सुखान्त होणाऱ्या त्यांच्या कथा कादंबऱ्या आहेत. फकिरातील राधा मात्र आई अधिक आहे. माता म्हणून दाखवलेली ही स्त्री जाणीव अधिक ठसठशीत उतरली आहे.

❖❖

**डॉ. वृंदा सुभाष कोंजलगीकर**
५०३, शुभम टॉवर, पाडुरंग वाडी, मनपाडा रोड,
सर्वोदय गार्डन जवळ, डोंबिवली (पूर्व) ४२१२०१.
भ्रमणध्वनी- ९२२४२६१६७८







अनुक्रमणिका

अण्णाभाऊ साठे यांच्या कथाविश्वाविषयी भाष्य करणारा लेख.

# उपेक्षितांचे चित्रण करणारे कथालेखक अण्णाभाऊ साठे

प्रा. डॉ. सोमनाथ महादेव दडस

म्हाइंभटांच्या लीळाचरित्रापासून सुरू झालेली गोष्ट आज अनेक बदल होऊन कथा झाली. सरफोजी राजे, कृष्णाशास्त्री चिपळूणकर, ह.ना. आपटे, वि. सी. गुर्जर, वा.म. जोशी, दिवाकर कृष्ण, ना. सी. फडके, वि.स. खांडेकर, य. गो. जोशी, वामन चोरघडे, गंगाधर गाडगीळ, अरविंद गोखले, व्यंकटेश माडगूळकर, पु. भा. भावे यांच्या कथांनी वाचकांना अंतर्मुख केले. परंपरेत कथेची वेगळी वाट चोखाळणारे दलित मार्क्सवादी व ग्रामीण कथेचा वेगळा बाज निर्माण करणारे कथाकार म्हणजे अण्णाभाऊ साठे होत. अण्णाभाऊ यांनी कथेतून मानवी जीवनात दुःख निर्माण करणारे कोणते घटक आहेत. हे नव्याने शोधले आणि संपूर्ण जगताचे लक्ष आपल्या कथा वाङ्मयाकडे वेधून घेतले. कथेचा कृत्रिम साचा जाऊन कथा अधिक प्रखर वास्तवाभिमुख केली. प्रस्थापित व्यवस्थेला त्यांच्या कथांनी जाग आणली. उपेक्षित व्यक्तींना आधार द्या, हे सांगितले; आधार नाही दिला, तर संघर्ष करून स्वतःचे हक्क हिसकावून घेण्यास कथेतून स्पष्टपणे सांगितले. हे त्यांच्या कथांचे वेगळेपण होय.

अण्णाभाऊ साठे यांनी दुर्लक्षित माणसे, जाती जमातींविषयी तळमळीने निष्ठेने लेखन केले हे त्यांच्या कथेचे सामर्थ्य आहे. कथेतून ते अन्यायाबद्दल संताप व्यक्त करतात. त्यांच्या कथेतून घटना प्रधानता अनुभवास येते. संघर्ष हा त्यांच्या कथेचा आत्मा आहे. मानवी जीवनाची हतबलता, असहाय्यता याला जबाबदार कोण? असा प्रश्न अण्णाभाऊंची कथा वाचून मनात उभा राहतो. या विधानाचा अनुभव आपणाला त्यांच्या कथा - कादंबऱ्यांतून येतो. अण्णाभाऊंनी गरिबीचे दाहक चटके प्रत्यक्ष अनुभवले, भोगले होते. उदरनिर्वाहासाठी त्यांना प्रसंगानुरोधाने पडतील ती आणि मिळतील ती कामे करावी लागली; त्यामुळे जीवन किती भयानक आहे हे त्यांना माहीत होते. त्यांनी 'खुळंवाडी' 'बरबाद्या कंजारी' 'आबी', 'भानामती', 'फरारी' 'निखारा', कृष्णाकाठच्या कथा', 'गजाआड', 'गुऱ्हाळ', 'लाखी', 'जिवंत काडतूस', 'चिरागनगरची भुतं', 'रानवेली' हे कथासंग्रह लिहिले. जे जीवन पाहिले, अनुभवले तेच अण्णाभाऊंनी कथेतून चित्रित केले.

'विष्णुपंत कुलकर्णी', 'उपकाराची फेड' या कथेतून त्यांनी अस्पृश्यांच्या जीवनाचे प्रभावी चित्रण केले, त्यांचे दुःख हृदयाला चटका लावून जाते. 'थडग्यातील हाडं' ही कथा सामाजिक बांधिलकी मानावी हा संदेश देते. 'वळण' या कथेतून जनावराचे मांस खाण्यावरून निर्माण झालेला प्रश्न चित्रित केलेला आहे. 'बरबाद्या कंजारी' या कथेतून ते झोपडपट्टीतील जीवन परिणामकारक शब्दांत मांडतात. 'प्रायश्चित' ही कथा नैतिकता जोपासणे हे शाश्वत मानवी मूल्य आहे याची जाणीव करून देते. 'स्मशानातील सोनं'

या कथेमध्ये भुकेसाठी भीमा हाताची दोन बोटे कायमची गमावतो. जीवनाचे नियंत्रण गमावून बसलेली, भूतांना न घाबरणारी, परिस्थितीमुळे विविध व्यसनांच्या आहारी गेलेली, समाजाकडून दुर्लक्षिलेली, त्यामुळे तुरुंग हेच जीवन अशी त्यांची मानसिकता बनविलेली गेलेली. दोन घासांसाठी अहोरात्र तळमळणारी माणसे अण्णाभाऊंनी कथेतून शब्दशब्द करून पुस्तकातून न्यायासाठी समाजासमोर ठेवली. 'सुलतान', 'थडग्यातील हाड' या कथेतील माणसेही दोन घासांसाठी दुसऱ्याच्या दारासमोर कुत्र्यामांजरासारखी ताटकळत उभी असलेली दिसतात, हे जीवन वाचून आपलेही मन कासावीस झाल्याशिवाय संतापाने, पेटून उठल्याशिवाय राहत नाही. अण्णाभाऊंच्या कथेतील माणसे फार काळ अन्याय सहन करू शकत नाहीत ती अन्यायाविरुद्ध स्पष्टपणे बोलतात. दोन हात करण्याची भाषा बोलतात. अण्णाभाऊ साठे, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या तत्त्वाने, मार्क्सवादी विचाराने प्रभावित झालेले आहेत. म्हणून ते अन्यायाविरुद्ध लढण्याचा प्रयत्न करतात. अण्णाभाऊंनी ग्रामीण जीवनातील प्रत्यक्ष अनुभव घेऊन कथा लेखन केलेले आहे. उपेक्षित जीवनाचे विविध स्तर अण्णाभाऊंनी कथेतून स्पष्टपणे मांडले. म. द. हातकणंगलेकर त्यांच्या कथेविषयी लिहितात, 'दलितांच्या वाट्याला आलेल्या दाहक जीवनाचे चित्रण त्यांनी आपल्या कथांतून केले आहे.' या विधानाचा प्रत्यय अण्णाभाऊंच्या कथातून येतो. अण्णाभाऊंची कथा वास्तवाचे चित्रण करते. दलित जीवनातील विविध प्रश्न त्यांनी कथेतून प्रभावीपणे व्यक्त केले. अण्णाभाऊ येईल त्या संकटाला सामोरे गेले. प्रयत्नांची पराकाष्ठा करून यश मिळवित गेले. साहित्याने मानवी मने बदलतात; याविषयी त्यांना आत्मविश्वास होता. तीनशे कथा त्यांनी लिहिल्या. त्यांच्या कथा मनात घर करून राहतात. नैतिकतेवर त्यांचा विश्वास आहे. मानवनिष्ठा, साहित्यनिष्ठा त्यांनी जीवनात महत्त्वाची मानली.

अण्णाभाऊनी प्रत्यक्ष अनुभवातून कथालेखन केले. त्यांची कथा, अन्यायाचे, शोषणाचे, दुःखाचे चित्रण करते. त्यांच्या कथेतील नायक अन्यायाविरोधात लढतो प्रामाणिक राहूनही, कष्ट करूनही जेव्हा पोट भरत नाही. तेव्हा त्यांच्या कथेतील नायकाला चोरी करावी लागते. समाजानेच ही वेळ आमच्यावर आणली आहे असे त्यांचा नायक म्हणतो. पोटासाठी कोंबडी चोरल्याचे त्यांचे समर्थन करतो. त्याला वाईट वाटत नाही. 'गरीब लोकांनी खरे बोलावे आणि श्रीमंत लोकांनी खोटे बोलावे हा कोणता न्याय?' असा त्यांच्या कथेतील नायकाला प्रश्न पडतो. 'शिकार', 'मुकूल मुलाणी' या कथेतून ते भुकेने घायाळ, व्याकुळ झालेल्या माणसांचे जीवन चित्रित करतात पोटासाठी स्वेच्छेने तुरुंगात जातात, भीक मागतात. अन्यायाविरोधात उभे राहणारी, सत्यासाठी मरण निर्भयतेने, सहजतेने जवळ करणारी माणसे त्यांनी कथेतून जिवंत केली. अन्यायाविरोधात पाटलाबरोबर लढणारा 'सावळा मांग', चारित्र्य जपणारी 'आबी' अशी जीवनातील खरी माणसे त्यांनी त्यांच्या रंगरूपासह, परिस्थितीसह, प्रामाणिकपणे शब्दबद्ध केली. गरिबीने अण्णाभाऊंना घडविले. विविध वर्तनाच्या, स्वभावाच्या माणसांचा त्यांनी सूक्ष्मपणे अभ्यास केला. त्याविषयी निष्कर्ष काढले आणि त्याप्रमाणे अण्णाभाऊ लेखन करत राहिले. संघर्ष करत राहिले. आत्मविश्वास हरवलेल्या समाजाने मानसिकदृष्ट्या खच्चीकरण केलेल्या माणसांना, मानवी मनाला त्यांनी लढण्यास बळ दिले. कसे निर्णय घ्यावे, वागावे हे लेखनातून सांगितले, तळागाळातील दलित माणसांच्या व्यथा, वेदना त्यांनी कथेतून मांडल्या. हे त्यांच्या कथांचे वेगळेपण आहे. कथा आकर्षक करण्यासाठी अद्‌भुतरम्यता, कल्पनाविलास त्यांच्या कथांतून अनुभवास येतो. दुबळी मानवी मने बलवान करण्याचे व्रतच त्यांनी लेखनातून चालविले. छाया निकम त्यांच्या कथेविषयी लिहितात, 'त्यांच्याकडे वास्तव जीवनानुभवांचा, कथा-व्यथाचा, वेदना, जिद्द आणि जीवनाच्या आघाडीवर अथक लढणाऱ्या दलित कष्टकऱ्यांच्या हरघडीच्या संघर्षाचा भरपूर साठा होता.' साधेपणा आणि सरळपणा अण्णाभाऊंच्या ठिकाणी होता. १९४९ ते १९७९ या काळात त्यांनी कथालेखन केले. त्यांनी कथेतून दलित जीवन, गुन्हेगारी जीवन आणि प्रणयाचे चित्रण केले.

स्वतःचा स्वतंत्र अनुभव आणि विषयांचे वैविध्य यामुळे त्यांची कथा कसदार झाली आहे. त्यांनी कथेत चितारलेली माणसे लक्षवेधक वाटतात. आलेले अनुभव त्यांनी जतन केले आणि त्यातून त्यांनी कथा लेखन केले.



अनुक्रमणिका

त्यांच्या कथेतील माणसे संघर्ष करणारी आहेत. मागून देत नाहीत मग समाजाकडून भांडून जबरदस्तीने घ्यावे आणि जीवन जगावे हा नवा विचार ते कथेतून मांडतात. भाकरीसाठी खोटा गुन्हा करून तुरुंगात जाणारी सुलतानासारखी माणसे त्यांनी कथेतून मांडली. मरण तर येणारच आहे मग हक्काचे घेऊनच मरावे, असा विचार तात्या मांग करतो. यदू रामोशीच्या जीवनाची शोकात्मिका स्पष्ट लिहून 'स्वराज्य आले, पण गरीब सुखी झाला का?' हा प्रश्न नायकाला पडलेला आहे. 'सूड', 'मरीआईचा गाडा' या कथेत अंधश्रद्धेचे चित्रण केलेले आहे. 'मारुती पोतराज' या कथेतून नानाचंद हा मारवाड्याबरोबर संघर्ष करून जमीन स्वतःच्या ताब्यात घेतो. 'भेकड' या कथेतील 'पांडू', 'जग हे असेच आहे' या कथा जीवन कसे जगावे हा विचार स्पष्ट करतात. भीती न घेता माणसांनी निर्भयपणे जीवन जगले पाहिजे हे अण्णाभाऊ साठे या कथेतून स्पष्ट करतात. कंजारी समाजातील रूढी, परंपरा मानवी जीवनाची अधोगती करणाऱ्या आहेत म्हणून बरबाद्या कंजारी हा जाचक अघोरी परंपरेविरुद्ध बंड करतो. सर्वसामान्य उपेक्षित लोकांना प्रस्थापित वर्ग जगू देत नाही याचे प्रभावी चित्रण 'भोमक्या' या कथेतून अण्णाभाऊ साठे यांनी केलेले आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची समाजोद्धाराची प्रेरणा घेऊन अण्णाभाऊ लेखन करताना दिसतात. 'सापळा', 'वळण' या कथेतील नायक, नायिका नवा बदल आत्मसात करताना दिसून येतात. 'निखारा' ही कथा मनाला अस्वस्थ करते. कुटुंबावर वाईट नजर ठेवणारा; फुलाचे जीवन दुःखी करणाऱ्या गुंड्या पाटीलला ती जाळून मारते. अन्यायाविरुद्ध अण्णाभाऊंच्या कथेतील पात्रे कशी निश्चयपूर्वक लढतात. हे कथेतून स्पष्ट होते. अन्याय, संघर्ष, भूक, प्रामाणिकपणा हा अण्णाभाऊंच्या कथांचा विशेष आहे.

अण्णाभाऊंना जीवनात हरतऱ्हेची, स्वभावाची माणसे भेटली. अशा लोकांच्या सहवासात अण्णाभाऊ साठे राहिले. अण्णाभाऊ जीवनावर, कोणत्याही माणसावर मनापासून प्रेम करतात. सामान्य माणूस या जगाचा पोशिंदा आहे. सामान्य माणसावरच जग चालते, असा त्यांना आत्मविश्वास आहे. कोणत्याही माणसांना जगायला आणि जीवनावर प्रेम करायला शिकवले पाहिजे. जसा माणूस अण्णाभाऊंना दिसला, भेटला तसा त्यांनी कथेतून शब्दबद्ध केला. अण्णाभाऊ उत्तम संशोधक

**अण्णाभाऊंची कथा वास्तवाचे चित्रण करते. दलित जीवनातील विविध प्रश्न त्यांनी कथेतून प्रभावीपणे व्यक्त केले. अण्णाभाऊ येईल त्या संकटाला सामोरे गेले. प्रयत्नांची पराकाष्ठा करून यश मिळवित गेले. साहित्याने मानवी मने बदलतात; याविषयी त्यांना आत्मविश्वास होता. तीनशे कथा त्यांनी लिहिल्या. त्यांच्या कथा मनात घर करून राहतात. नैतिकतेवर त्यांचा विश्वास आहे. मानवनिष्ठा, साहित्यनिष्ठा त्यांनी जीवनात महत्त्वाची मानली.**

आहेत. ते जीवनातील नेमके सत्य शोधतात, मुळातून प्रश्न समजून घेतात. त्यामुळे त्यांना जीवन मौल्यवान वाटते. त्यांनी जे पाहिले ते मनापासून तळमळीने मांडले. 'थडग्यातील हाड' या कथेतील नायक गावासाठी मरणाला सामोरा जातो; पण नंतर गावातील लोकांना त्याचे विस्मरण होते. त्याच्या कुटुंबाकडे दुर्लक्ष केले जाते. 'चिरागनगरची भुतं' या कथासंग्रहातून अण्णाभाऊंनी गुन्हेगारी प्रवृत्तीची, झोपडीत राहणारी, दुःख, दारिद्र्य, भूक, व्यसनीपणा लहरीपणा यांमुळे हतबल झालेली माणसे कथेतून प्रभावीपणे रेखाटलेली आहेत. व्यवस्थेने, परिस्थितीने सामाजिक विषमतेची बळी ठरलेली ही अण्णाभाऊंची माणसे कायमस्वरूपी लक्षात राहतात. या माणसाविषयी मनात सहानुभूती निर्माण होते. ही माणसे अन्यायाविरुद्ध लढतात. तुरुंगात शिक्षा भोगतात, परत लढतात. यातून त्यांचा स्वाभिमान दिसून येतो. छाया निकम अण्णाभाऊंच्या कथेविषयी लिहितात, 'अण्णाभाऊंच्या कथेतील माणसे आपल्यावर झालेल्या अन्याय, अत्याचाराविरुद्ध सतत संघर्ष करताना दिसतात.' त्यांच्या कथेतील माणसांना जीवन जगायचे आहे; पण जीवन जगू दिले जात नाही, त्यांचा विविध पातळ्यांवर छळ केला जातो. त्यामुळे ही माणसे संघर्षासाठी तयार होतात. निसर्ग आणि मानव यांनी केलेल्या छळाला अण्णाभाऊंची माणसे बळी न पडता संकटाशी दोन हात करतात. बंडखोरी करतात. स्वातंत्र्य मिळूनही माणसाची छळातून,

भूकमारीतून सुटका होत नाही म्हणून त्यांची माणसे संघर्ष करून, स्वतःची अस्मिता, स्वातंत्र्य जपण्याचा प्रयत्न करतात. साधी सरळ माणसे; पण परिस्थितीच्या हातचे बाहुलं बनलेली, समाजाकडून, श्रीमंतांकडून शोषण झालेली अशी ध्येयवादी, अन्यायाविरुद्ध आवाज उठवणारी माणसे त्यांनी कथेतून स्पष्ट केली. त्यांच्या कथेविषयी खालीलप्रमाणे निरीक्षणे नोंदविता येतील.

निरीक्षणे

१. डॉ. बाबासाहेब आंबेडकर, मार्क्सवादाची प्रेरणा त्यांच्या कथा लेखनामागे दिसून येते. अण्णाभाऊ साठे यांनी गरीब, उपेक्षित माणसांचे कथेतून चित्रण केले. अण्णाभाऊंच्या कथेतील माणसे अन्यायाविरुद्ध संघर्ष करतात.

२. जे जीवन अण्णाभाऊंनी पाहिले, अनुभवले ते त्यांनी कथेत मांडले. मानवनिष्ठा, जीवननिष्ठा, लेखननिष्ठा कथेतून त्यांनी स्पष्ट केली. 'भूक' हा त्यांच्या कथेचा केंद्रबिंदू आहे.

३. स्वातंत्र्य मिळाले; पण उपेक्षा संपली नाही. हे स्वातंत्र्यानंतरचे वास्तव त्यांच्या कथेतून येते. विविध स्वभावाची, तऱ्हेवाईक माणसे कथेतून स्पष्ट केली.

संदर्भ टिपा–

१. सपा. रा. ग. जाधव, वि. भा. देशपांडे, 'मराठी वाङ्मयाचा इतिहास', खंड सातवा १९५० ते २००० भाग तिसरा प्रकाशक महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, पृ. १९१

२. डॉ. छाया निकम, 'दलित कथा निर्मिती आणि समीक्षा', सुविधा प्रकाशन, पुणे ३०, प्र. आ. २००६, पृ. १६

३. तत्रैव, पृ. ३७

❖❖

प्रा. डॉ. सोमनाथ महादेव दडस
सी. के. गोयल महाविद्यालय, दापोडी, पुणे- १२
मो. नं. ९७६७०२५०८४,
somnathdadas@gmail.com

श्रीकांत देशमुख यांच्या 'पिढीजात' या कादंबरीवरील समीक्षालेख.

# पिढीजात : शासकीय व्यवस्थेचं समंजस उत्खनन !




■ डॉ. पी. विठ्ठल

ओरहान पामुक या जगप्रसिद्ध लेखकाची 'खेळ' च्या ३५ व्या अंकात एक मुलाखत प्रसिद्ध झाली आहे. अँजेल जी. क्टिनाच्या एका प्रश्नाला उत्तर देताना पामुक यांनी म्हटलंय, 'कादंबरीकार हा कुठल्या एका समाजाचा नसतो, एका विशिष्ट समाजाचे व्यवच्छेदक लक्षण कादंबरीकारामध्ये आढळून येत नसतं. त्याच्या मूलभूत प्रेरणासुद्धा समाजाभिमुख नसतात आणि तो ज्या संस्कृतीचा एक घटक असतो त्याहून भिन्न विचारधारा व दृष्टिकोन घेऊन तो वावरत असतो. त्याचा दृष्टिकोन त्याच्या समाजाहून भिन्न ज्या वेळी होतो त्या वेळी तो आगंतुक व्यक्ती ठरतो. एक एकलकोंडा व्यक्ती होऊन जातो. तो हा एकटेपणा घेऊन वागत असताना भोवतालच्या समाजाकडे निरखून पाहत असतो, समाजमनाला नागडे उघडे करून पाहता-पाहता त्याला त्यातले गुणदोष दिसू लागतात, आणि त्याच्या लेखणीला एक धार येथे व त्यातून त्याच्या साहित्यकृती संपन्न होत जातात.'(पृ.१४)

श्रीकांत देशमुख यांच्या 'पिढीजात' या कादंबरीचा विचार करताना मला पामुकचे हे अवतरण अनेक अर्थाने





अनुक्रमणिका

महत्त्वाचे वाटते कारण श्रीकांत देशमुख यांचा मूळ पिंड हा कवीचा आहे. मराठीतील एक महत्त्वाचे कवी अशी त्यांची ठळक नोंद आहे. कृषी संस्कृतीतल्या सार्वत्रिक ताणतणावाला, दुःख-दैन्याला, पराभूत नातेसंबंधांना आणि एकूणच सामाजिक, राजकीय प्रारूपाला अत्यंत प्रभावीपणे प्रतिसाद देणारी कविता त्यांनी लिहिली आहे. स्त्री जाणिवेचे अनेक अनुभवही त्यांनी कवितेतून साक्षात केले आहेत. या कवितेचा मूळ स्वभाव शोषित पीडितांच्या स्वभावाला आणि त्यांच्या संवेदनाविश्वाला समजून घेणारा आहे. केवळ वर्तमान जगण्यावर प्रतिक्रिया देणारी त्यांची कविता नाही, तर त्या-त्या काळात अस्तित्वात असलेल्या विशिष्ट स्वरूपाच्या मूल्य व्यवस्थेच्या पडझडीविषयीचे एक चिंतनही त्यांनी मांडले आहे. त्यामुळे समकाळाकडे आत्यंतिक संवेदनशीलतेने पाहणाऱ्या या कवीच्या कादंबरीविषयी उत्सुकता असणे स्वाभाविक आहे. ही उत्सुकता आणखी एका कारणाने आहे, ते प्रशासकीय अधिकारी जसे आहेत तसेच ते शेती संस्कृतीचा वारसा नेटाने चालवणारे प्रयोगशील शेतकरीदेखील आहेत. सहकार हे त्यांचे विशेष कार्यक्षेत्र आहे. सुमारे तीन दशकांपासून ते शासकीय सेवेत आहेत आणि शासकीय सेवेत असलेली अनिश्चितता अनुभवत त्यांनी महाराष्ट्राच्या विविध भागांत सेवा बजावली आहे. सातत्याने होणाऱ्या बदलींचे प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष परिणाम हे विविध प्रदेशांतील माणसे समजून घेण्याच्या दृष्टीनेही त्यांना उपयुक्त ठरले असण्याची शक्यता आहे. भोवतालाविषयीचे तटस्थ चिंतन प्रकट करणारे आणि एकूणच ग्रामीण जाणिवेचा परीघ विस्तारणारे कवी अशी ओळख असलेल्या श्रीकांत देशमुख यांच्या कादंबरीविषयी म्हणून उत्सुकता निर्माण होणे स्वाभाविक आहे.

आणखी एका गोष्टीचा उल्लेख करायला हवा. एखादी कलाकृती वाचताना वाचकाला नेमकं काय अभिप्रेत असतं? किंवा वाचक म्हणून त्याने काही गृहीत धरलेलं असतं का? मला वाटतं याविषयी अगदीच वस्तुनिष्ठ उत्तर देता येणार नाही. मात्र कादंबरीसारख्या दीर्घ कथानकाला सामोरं जाताना वाचक कादंबरीविषयी निश्चितच मनात काही तर्क बांधत असतो. कादंबरीच्या संपूर्ण वाचनानंतर त्या तर्कांचे खरे-खोटेपण ठरणार असते. हे माहीत असूनही असे तर्क वाचक नेणिवेच्या पातळीवर का होईना; पण रचत असतो. वाचकाने गृहीत धरलेल्या तर्कांना जी कलाकृती खोटे ठरवते तीच कलाकृती श्रेष्ठ असते, असे म्हणता येते.

लेखकाची अन्य पुस्तके किंवा त्याच्या चरित्रात्मक माहितीवरून त्या कलाकृतीविषयी अंदाज करणे हे स्वाभाविक असते. वाचकाने गृहीत धरलेल्या गोष्टीपेक्षा एका नव्या अनुभव विश्वाला त्याला सामोरे जायला जी कलाकृती भाग पाडते ती वाचकाला एक निरपेक्ष आनंदही देते. मला वाटतं या निकषावर 'पिढीजात' ही कादंबरी फार मोलाची ठरते, कारण ती वाचकांच्या संकल्पित धारणांना बदलून टाकते.

श्रीकांत देशमुख यांचे कवी असणे, अत्यंत उत्तम अशा ललित गद्याचे लेखक असणे किंवा अभ्यासक, संशोधक असणे या सगळ्या गोष्टी त्यांच्या या लेखनाला पूरक ठरलेल्या असल्या तरी एका मोठ्या अवकाशात घडणाऱ्या आणि वाचक म्हणून आपण अजिबातच गृहीत न धरलेल्या कथानकाला आपल्याला सामोरे जावे लागते. एक दोन किंवा पाच पन्नास नव्हे तर त्याहून अधिक पात्रांचा वावर या कादंबरीत घडतो आणि लेखक आपल्याला एका विशिष्ट कालपटातल्या अनेक बाह्य आणि आंतर्वास्तवाचे दर्शन घडवतो. समकाळाविषयी बोलता-बोलता तो शतक दोन शतकांचे वैचारिक उत्खनन करतो. जगण्याचे आणि जीवन जाणिवांचे नवे अन्वयार्थ लावतो. लोकशाही हा खरे तर किती व्यापक शब्द आहे; पण या शब्दात सामावलेली संरचना पाहिली की, आपण गोंधळून जातो. ही कादंबरी वाचकांच्या निकोप राजकीय धारणांना छेद देते. सामाजिक आणि प्रशासकीय क्षेत्रात जातिधर्माचे पूर्वग्रह किती दूषित आणि टोकदार असतात याचीही प्रचिती देते. लोकशाही व्यवहारातले संस्थात्मक राजकारण आणि सार्वजनिक व्यवहारातले छुपे राजकारण यांचा परिचय करून देते. एखाद्या व्यक्तीच्या प्रामाणिकतेला, व्यक्तिगत महत्त्वाकांक्षेने छळणाऱ्या असंख्य वृत्ती प्रवृत्तींचा आलेख मांडते. अनेक सामाजिक-राजकीय अनुभवांचा विस्तृत पट मांडणाऱ्या या कादंबरीच्या कक्षेत शेतकरी, अधिकारी, राजकीय पुढारी, आणि कितीतरी व्यक्तींचे प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष चरित्र सामावले आहे. ही तीच माणसं आहेत, ज्यांना लोकहिताच्या कामासाठी वेगवेगळ्या ठिकाणी समाजाने आणि शासनाने नियुक्त केलेले आहे; पण दुर्दैवाने

यातल्या प्रत्येकाला आपल्या घटनात्मक कर्तव्याशी कोणतेच देणंघेणे नाही. सामान्य माणसांच्या वाट्याला येणारी उपेक्षा ही कशी नकारात्मक व्यवहारी राजकारणामुळे प्रेरित असते हेही इथे दिसते.

''बळीराजा उभा राहील तरच, स्वराज्याची आशा'' असे सांगणाऱ्या महर्षी विठ्ठल रामजी शिंदे या सत्यशोधकीय महात्म्यास ही कादंबरी लेखकाने अर्पण केली आहे. यावरून लेखकाच्या वैचारिक भूमिकेचा अदमास सहज येता येतो. लेखकाच्या मनोगतातील एका अवतरणाचा मुद्दाम उल्लेख करतो. ते अवतरण असे, 'महात्मा जोतीराव फुले यांचा असा कयास होता की, शूद्र सत्तेवर आले, तर शूद्रांची दुःखं दूर होतील. लोकशाहीकरणाचा एक भाग म्हणून राजकीय सत्तेवर शूद्र येऊनही यात कितपत फरक पडला आहे, याचा शोध घेणं अपरिहार्य ठरावं. वाढत्या शेतकरी आत्महत्या, स्त्री-दलित अत्याचार साऱ्या बाबी आपल्या भोवताली आपल्या जगण्याचा अपरिहार्य भाग म्हणून फिरताना दिसतात. शेती आणि शेतीव्यवस्था, त्याला जोडून असणारी प्रशासकीय व्यवस्था, सहकार चळवळ यातली घुसमट ही नवनाथला त्रासदायक ठरणारी आहे.'

नवनाथ हा या कादंबरीचा नायक आहे, आणि या नायकाची ही घुसमट ओरहान पामुकच्या भाषेत लेखक 'एकटेपणा घेऊन निरखत आहे.' या निरखण्यातून त्याला समाजातले गुणदोष दिसू लागतात आणि त्याच्या लेखणीला धार येते. लेखक कोणत्या समाज घटकाचा आहे, प्रदेशाचा आहे, हे मुद्दे इथे गौण ठरतात, आणि लेखकाने उपस्थित केलेले प्रश्न इथे महत्त्वाचे ठरतात.

श्रीकांत देशमुख यांची ही कादंबरी एका सामाजिक व्यवस्थेचे चित्रण करते, जी व्यवस्था आपल्या सर्वांना वेढून आहे. यातली सर्व पात्रे आपल्याही अवतीभोवती सदैव वावरतात. शेतकरी असण्याला ना-लायक ठरवणाऱ्या, पराभूत करणाऱ्या प्रशासकीय मानसिकतेचा- अशी मानसिकता जी उपभोगाला लोकहितापेक्षा अधिक महत्त्वाचे मानते. भौतिक लालसा तिला अधिक प्रिय आहे. ही मानसिकता सर्वसामान्यांना थोडीशी परिचित असली तरी तिचा चेहरा इतका क्रूर आणि भीषण असतो हे मात्र ही कादंबरी वाचल्यानंतरच कळते. अर्थपूर्ण सत्तासंबंधातून वर्चस्व प्रस्थापित करणे या व्यवस्थेला माहीत आहे. इथे अमर्याद अशी लालसा दिसते. आसक्ती दिसते. शोषणाचे अनेक कंगोरे दिसतात. न दिसणारे; पण प्रत्यक्षात परिणाम करणारे प्रभावी असे राजकीय डावपेच दिसतात. नैतिक अधःपतन वगैरे शब्दांचाही संकोच व्हावा अशा बिघडलेल्या वास्तवाचं दर्शन ही कादंबरी घडवते. लेखकानेच मनोगतात शंका उपस्थित केल्याप्रमाणे ही कादंबरी अनेकांना आत्मचरित्रात्मक कादंबरी वाटू शकते. किंवा या कादंबरीतील पात्रे अनेकांना परिचित वाटू शकतात. कदाचित ही कादंबरी आत्मचरित्रात्मक असेल किंवा नसेलही; पण या कादंबरीत वास्तवाचे जे असंख्य संदर्भ विखुरलेले आहेत ते अधिक महत्त्वाचे आहेत.

नवनाथ हा या कादंबरीचा सभ्य, सोशिक आणि पापभीरू नायक आहे. नावावरूनच त्याची कौटुंबिक आणि सामाजिक पार्श्वभूमी अर्थातच ग्रामीण आहे. खेडवळ आहे. या दोन्ही शब्दांना लगडून टोकाची अभावग्रस्तता आहे. शिवाय पिढीजात म्हणजे एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे हस्तांतरित होणारा (दुःखाचा) वारसा होय. दुःख, दारिद्र्याचा आणि कुणबीकीचा वारसा असलेला हा नायक संयमी आणि प्रामाणिक आहे. हा त्याचा मूळ स्वभाव आहे. शेतकरी परंपरेच्या व्यापक संस्कारात तो घडला आहे. त्यामुळे उपजत संकोच हा त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा एक भाग झाला आहे. ताणतणावाचे अपमानाचे अनेक प्रसंग त्याच्या अवतीभोवती घडत असताना तो मात्र खूप निर्विकार हतबलतेने माणसांचे ढोंगी स्वभाव वाचत राहतो. ही निर्विकार हतबलता वैचारिक जडण-घडणीमुळे त्याच्या स्वभावाचा भाग झाली आहे. त्यामुळे त्याचा स्वतःशी आणि समाजाशी एकाच वेळी संघर्ष सुरू असतो. व्यवहारवादी जगातल्या संरचनेवर तो स्वतःच्या आदर्शवादाने, नैतिकतेने मात करू पाहतो; पण दुर्दैवाने तसे घडत नाही. तर तोच प्रत्येक वेळी खोल अधिक खोल गुंतत जातो. स्वतःच्या एकाकीपणावर मात करताना त्याला वास्तवाचे वर्चस्व झुगारून देता येत नाही, किंवा त्याला व्यवस्थेचा टोकदार निषेधही नोंदवता येत नाही. तो बंडखोर आहे; पण ही बंडखोरी इतरांसाठी त्याचा विक्षिप्तपणा ठरते. त्यामुळे त्याच्या या कृतीलाही तसा काही अर्थ उरत नाही. बौद्धिकता, तत्त्वचिंतन हे या व्यवस्थेला नको असलेले थोर गुण त्याच्याकडे आहेत.

त्याला बुद्ध आवडतो. त्याला कबीर, तुकाराम आवडतात. फुले-आंबेडकर, सानेगुरुजी, महर्षी शिंदे, गाडगेबाबा, यशवंतराव चव्हाण इ. त्याला स्वत:चे वैचारिक पूर्वज वाटतात. या सगळ्या विचारपरंपरेतून त्याची बौद्धिक जडणघडण झालेली असल्यामुळे प्रशासन किंवा राजकारण थोडेबहुत अपवाद सोडले, तर नाठाळांचा प्रदेश असल्याचे त्याला जाणवत राहते; पण तरीही या व्यवस्थेचा भाग म्हणून जगण्याशिवाय गत्यंतर नसतेच.

या व्यवस्थेचा एक भाग म्हणून हा नवनाथ या विशिष्ट अनुभवांना सामोरे जातो. तो राजकीय ढोंगाचा, स्वार्थी अध्यात्माचा आणि चालढकल करणाऱ्या प्रशासकीय यंत्रणेचा उपरोध करतो. मतलबी आणि भ्रष्ट यंत्रणेचा कडवट निषेध करतो. राजकीय अर्थव्यवस्थेत शेतकरी, कष्टकऱ्यांचे शोषण कसे होते? काम करणाऱ्या अधिकाऱ्याला विचलित करून कामे कशी स्थगित केली जातात? गल्ली पत्रकारांची भ्रष्ट मनोवृत्ती असो की, मंत्र्यांच्या पीएची व्यावहारिक अनैतिकता असो अशा अनेक पात्रांना आणि त्यांच्या संधीसाधू स्वभावाला तटस्थपणे न्याहाळले आहे.

तर हा नवनाथ शेळके कोण आहे? नवनाथ शेळके हा सोमाजी शेळके या अल्पभूधारक कोरडवाहू शेतकऱ्याचा मुलगा आहे. ज्याला शेतीची मोठी आवड आहे. कुणबीकीचा भोगवटा कधीही न संपणाऱ्या पिढीचा तो प्रतिनिधी आहे. विद्यापीठात वगैरे शिकून आणि पुढे लोकसेवा आयोगाची परीक्षा पास होऊन सरकारी अधिकारी म्हणून सेवेत रूजू झालेला नवनाथ नोकरीत येण्यापूर्वी खूप भाबडी स्वप्नं बाळगून होता. थोरांच्या स्वप्नातला समाज निर्माण करण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होती. अर्थात ती काही गैर नव्हती. शेतकरी वर्गाशी कायम जोडले जाण्याचा हेतूनेच त्याने सहकार खात्यातल्या उपनिबंधक, सहकारी संस्था या पदाला प्राधान्य दिले. सहकार चळवळीचा मानबिंदू असलेला महाराष्ट्र आणि या महाराष्ट्रातील साखर कारखाने ही तशी थोरच गोष्ट. कधीकाळी पंडित नेहरूंनी या सहकारी कारखान्यांना भारतातील आधुनिक मंदिरे असं म्हटलं होत. गाव पातळीवरच्या लहानसहान विविध कार्यकारी सोसायट्यांपासून, जिल्हा बँका,कारखाने, सूत गिरण्या,

**विठ्ठलराव विखे पाटील, यशवंतराव चव्हाण, धनंजयराव गाडगीळ, वसंतदादा पाटील, भाऊसाहेब हिरे अशा कितीतरी नावांनी सहकाराला उभं केलंच; पण दुर्दैवाने यातून शोषणाची नवी व्यवस्था आकाराला आली. नैतिक मूल्यं जपणारी मागची पिढी क्रमाक्रमाने संपली; पण तिला योग्य पर्याय आपल्याला देता आला नाही, ही खंत नवनाथ व्यक्त करतो, आणि हा पर्याय देता न आल्यामुळेच सामाजिक, आर्थिक आणि सांस्कृतिक पुनर्वसनाचे प्रश्न अद्यापही कायम असल्याचेही तो बोलून दाखवतो.**

खरेदी विक्री संघ, कृषी उत्पन्न बाजार समिती, नागरी बँका असा खूप मोठा पसारा सहकारात सामावलेला असतो, आणि या कक्षेत प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे शेतकरी कष्टकरी वर्गही असतोच.

तर अशा सहकार क्षेत्रात अधिकारी झालेल्या नवनाथकडे बंद पडलेल्या पद्मश्री सहकारी साखर कारखान्याचा लिक्विडेटर म्हणजे अवसायक म्हणून जबाबदारी येते, आणि मग क्रमाक्रमाने एकेक गोष्टी घडत जातात. बँकांचे कर्ज, खाजगी लोकांची देणी, मशिनरी स्पेअर्स पुरवणाऱ्यांची देणी, शेतकरी, कामगार आणि सुरक्षा रक्षकांचे थकीत पगार, कोर्टकचेऱ्या, सचिव, आयुक्तांच्या बैठका, विधानसभेतील एलक्यू, उपोषण, निदर्शनं, चोऱ्यामाऱ्या अशी अनेक संकटं नवनाथपुढे येतात, आणि जबाबदार अधिकारी म्हणून या सगळ्या प्रश्नांना त्याला तत्परतेने सामोरं जावं लागतं. मग या सगळ्या प्रवासात त्याला तथाकथित सहकार महर्षी रावसाहेब आवटे, अर्जुन आवटे, ना. दयानंद शिंदे, ना. हैबतराव देसाई, अनेक मंत्री, मंत्र्यांचे पीए, सभापती, संचालक, आयुक्त, सीईओ, मंत्रालयातले अंडर सेक्रेटरी गवई, युनियन लिडर पटेल, विभागीय सहनिबंधक बी. सी. पवार, गोखले नावाचे पुणेरी प्राध्यापक, ह.भ.प.



अनुक्रमणिका

कल्याणराव बारटक्के, पत्रकार सोनकांबळे, कोंडीबा चाबुकस्वार, नागनाथ दगा पाटील, सदोबा देसले, प्रसाद कुमार, एआर सर्जेराव दाभाडे, माळी, सुनील कांबळे हे कर्मचारी, भाप्रसे भरतकुमार वानखेडे, मकरंद देवकर, पद्मजाताई, देवश्री चव्हाण, पुरुषोत्तम शिंदे, डीवायएसपी तुकाराम पिसाळ, शरद जोंधळे, आयुक्त देवेंद्रकुमार गोयल, दादासाहेब पगारे, रगडे, मॅनेजर ब्रह्मानंद जोशी, बोगस सीबीआय अधिकारी पांडुरंग तावडे असे आमदार-खासदार, अधिकारी-कर्मचारी संघटनेचे नेते, कार्यकर्ते, मित्र, शेतकरी, शेतमजूर, प्रशासनाशी निगडित असलेले-नसलेले कितीतरी लोक या कादंबरीत आपल्याला भेटतात. काही चांगले, काही वाईट, काही बेरकी, काही खोडसाळ, काही इरसाल, काही सज्जन, कितीतरी तऱ्हेची बाया-माणसं प्रत्येकाची निराळी तऱ्हा. प्रत्येकाचे वेगवेगळे इंटरेस्ट. प्रत्येकाची जगण्याची आपली म्हणून एक स्वतंत्र पद्धत. एकमेकांवर कुरघोडी करणारे. लुटणारे. लुबाडणारे. माणसाच्या अमर्याद जगण्या-वागण्याचं दर्शन घडवणाऱ्या या असंख्य पात्रांना लेखक अनेक पातळ्यांवर समजून घेतो. याशिवाय त्याच्या भावविश्वात त्याचं कुटुंब-म्हणजे त्याची पत्नी नंदा आणि मुलगी गोदा हेही आहेतच.

बंद पडलेल्या सहकारी साखर कारखान्याच्या निमित्ताने जे प्रशासकीय उत्खनन लेखक करतो ते थक्क करणारे आहे. राज्यकर्ते, संस्थात्मक व्यवहार, सामान्य माणसांचे बेरकी स्वभाव, शेतकऱ्यांची हताशता. कितीतरी प्रसंगांच्या अत्यंत सूक्ष्म नोंदी लेखक घेतो. वेगवेगळ्या अधिकाऱ्यांची कार्यपद्धती, आत्मसन्मान दुखावलेले आणि तरीही विशेष तक्रार नसलेले, कारखान्यातले, बँकेतले, पतसंस्थेतले, मंत्रालयातले कर्मचारी. वेगवेगळ्या प्रारूपांचीही अत्यंत विस्तृत नोंद लेखक घेतो. ही सगळी नोंद घेताना त्याच्यातला संवेदनशील माणूस आपल्याला सतत जाणवत राहतो. वेळोवेळी त्याचे भावनिक होणे, गलबलून येणे किंवा पराभूत तटस्थतेने 'जे होईल ते होईल' या धारणेने कार्यरत राहणे या सगळ्या बाबींकडे लेखक वाचकांचे लक्ष वेधून घेतो.

ज्याला महाराष्ट्राच्या मागच्या दशक दोन दशकांतल्या राजकीय वा सामाजिक घडामोडींची जाण आहे, त्याला या कादंबरीतली कित्येक पात्रं ओळखीची वाटू शकतात. माध्यमांनी आकाराला आणलेला त्यांचा आदर्शवाद आणि प्रत्यक्षातला त्यांचा व्यवहार यांविषयी लेखक लिहितो. सर्वसामान्यांना माहीत नसलेल्या अनोख्या अशा जगाचं दर्शनच यानिमित्तानं घडते. राजकीय वर्चस्वाखाली दबलेल्या व्यवस्थेची अस्वस्थता तपासण्याचा हा एक चांगला प्रयत्न आहे. सामाजिक उत्थानासाठी उभ्या राहिलेल्या संस्थात्मक चळवळीचा हेतू कितीही उदात्त असला तरी या चळवळीशी जोडलेली यंत्रणा ही अत्यंत निगरगट्ट आणि भ्रष्ट असल्याची जाणीव आपल्याला होत जाते. नेते असोत. की त्यांच्या आश्रयाने मोठे होऊ पाहणारे कार्यकर्ते असोत, अधिकारी असोत, की त्याची हुजरेगिरी करून हवी ती पोस्ट मिळवणारे कर्मचारी असोत- व्यवस्थेला बाधित करणाऱ्या यंत्रणेचे हे सचित्र आरेखन आहे. व्यक्तिगत आणि सामाजिक अशा दोन्ही स्तरांवरची ही मांडणी म्हणता येईल. येथे व्यवस्थेचा उद्दामपणा आहे. इथे अपराधभाव आहे. इथे आश्वासक भविष्याची आस आहे. लेखक व्यवस्थेतल्या या सगळ्या सहसंबंधाचा शोध घेतो. विविध व्यक्तिरेखांच्या मानसिकतेची नेमकी चिकित्सा करतो.

अधिकारी ही ओळख घेऊन या कादंबरीचा नायक सगळ्या घटना घडामोडींचा साक्षीदार बनतो. अर्थात इथे कादंबरीच्या कथानकाचे तपशीलवार विवेचन करण्याचे काही प्रयोजन नाही; पण नोकरी ही नवनाथची अनिवार्य गरज आहे. नोकरीच्या निमित्ताने आकाराला आलेली माणसांची विविध नाती त्याच्या भोवतालात आहेत. ती पुष्कळच व्यवहार्य आणि तांत्रिक आहेत. तशीच काही खूप हळुवार आणि जवळचीही आहेत. माणसाच्या जगण्याचा एक वेगळाच परिवेश इथे उलगडत जातो. कादंबरीभर असंख्य अनुभव विखुरलेले आहेत. ते क्वचितप्रसंगी विकस्ळीतसुद्धा आहेत; पण अंतिमतः ते व्यवस्था दर्शनाचं एक सूत्रबद्ध विवेचनच ठरतं. कादंबरीच्या रूढ कथानकासारखं हे कथानक नाही. नवनाथ या नायकाच्या भोवती घडणाऱ्या घटनांचा हा व्यापक पट आहे. या पटाला सामाजिक, सांस्कृतिक, आर्थिक, राजकीय चिकित्सा आहे, तशीच बदलत्या काळानुसार बदललेल्या आदर्श धारणांचीही झाडाझडती आहे.

कथानकात एकच गोष्ट नाही. असंख्य गोष्टी आहेत.



अनुक्रमणिका

प्रत्येक गोष्टीत एक वेगळी गोष्ट आहे. एक वेगळी समस्या आहे. एक वेगळा पेच आहे. नायक विवेकी आहे. भाषा, साहित्य, तत्त्वज्ञान, राज्यशास्त्र हे त्याच्या आस्थेचे विषय आहेत. त्याने संत वाङ्मय वाचलेलं आहे. त्याने एकूण एकोणिसाव्या शतकातील प्रबोधन परंपरा समजून घेतली आहे. त्याला बहिणाबाई, कोलटकर, चित्रे, महानोर, ढसाळ आवडतात. गांधी आणि सानेगुरुजीही आवडतात. त्याची सांस्कृतिक अभिरुची इतरांपेक्षा वेगळी आहे. ही अभिरुची वेगळी असण हीच त्याची मोठी समस्या आहे. इथेच त्यांची गोची होते. बदलत्या परिवेशात त्याला स्वतःला जुळवून घेता येत नाही. तो वैचारिकदृष्ट्या समृद्ध आहे; पण त्याला समजून घेऊ न शकणारा भोवताल त्याला वेढून असल्याची त्याची भावना आहे. अनेक उथळ संकल्पना जन्माला घालणाऱ्या या काळातले त्याचे कर्तव्यनिष्ठ प्रामाणिक असणे, हे व्यवस्थेला अधिक गैरसोयीचे आहे. म्हणजे काहीतरी रचनात्मक करू पाहणाऱ्या त्याच्या स्वभावाला अनुकूल, असे पर्यावरण नाही किंवा अगदी याच्या उलटही म्हणता येईल.

खरंतर 'पिढीजात' ही कादंबरी राजकीय जाणिवांचे प्रकटीकरण करणारी एक महत्त्वाची कलाकृती तर आहेच; पण ती सहकार चळवळीच्या यशापयशाची, शेतकऱ्यांच्या शोषणाची साधार नोंद करणारी संहितादेखील आहे. साखर कारखानदारीचे जग प्रत्यक्षात शेतकरी हिताचे नाही, तर त्या अनुषंगाने राजकारण करण्याचा, वर्चस्व संपादन करण्याचा एक मोठा अड्डा आहे. नवनाथ शेळके या सगळ्या व्यवस्थेतला एक छोटा घटक आहे. त्याचा वापर करून प्रत्येकाला आपापले क्षेत्र विस्तारायचे आहे, आणि या कामी 'वर्तमानाच्या गरजा ओळखून भूमिगत कार्य करणारे प्रशासकीय कार्यकर्ते' शेकड्याने त्याच्या आजूबाजूला आहेत.

ही कादंबरी एकाच वेळी अनेक विषयांना स्पर्श करते. सावकारीचा इतिहास, नामांतराची चळवळ, नक्षलवाद, आदिवासींचे जगणे, मार्केट कमिटीतलं राजकारण, शेतकरी संघटना, मंत्र्यांचे, वरिष्ठ अधिकाऱ्यांचे प्रोटोकॉल, शेतकऱ्यांच्या आत्महत्या, स्वातंत्र्यदिन, कामगारांचे उपोषण, माहितीचा अधिकार, दुष्काळ, मोगलाई, लोकशाही दिन, प्रशासनातल्या लेखकांचे सांस्कृतिक राजकारण, इतिहासाचे असंख्य परिचित-अपरिचित तुकडे, वारकरी संप्रदायातले इरसाल ह.भ.प., मुंबईचं अनोखं जग, आमदार निवास मंत्रालय, शायनिंग इंडियाचा फोलपणा, विद्यापीठातले जुने दिवस, अनेक विषय या कादंबरीत सामावलेले आहेत.

**श्रीकांत देशमुख यांची ही कादंबरी एका सामाजिक व्यवस्थेचे चित्रण करते, जी व्यवस्था आपल्या सर्वांना वेढून आहे. यातली सर्व पात्रे आपल्याही अवतीभोवती सदैव वावरतात. शेतकरी असण्याला ना-लायक ठरवणाऱ्या, पराभूत करणाऱ्या प्रशासकीय मानसिकतेचा-अशी मानसिकता जी उपभोगाला लोकहितापेक्षा अधिक महत्त्वाचे मानते. भौतिक लालसा तिला अधिक प्रिय आहे. ही मानसिकता सर्वसामान्यांना थोडीशी परिचित असली तरी तिचा चेहरा इतका क्रूर आणि भीषण असतो हे मात्र ही कादंबरी वाचल्यानंतरच कळते. अर्थपूर्ण सत्तासंबंधातून वर्चस्व प्रस्थापित करणे या व्यवस्थेला माहीत आहे. इथे अमर्याद अशी लालसा दिसते. आसक्ती दिसते. शोषणाचे अनेक कंगोरे दिसतात. न दिसणारे; पण प्रत्यक्षात परिणाम करणारे प्रभावी असे राजकीय डावपेच दिसतात. नैतिक अधःपतन वगैरे शब्दांचाही संकोच व्हावा अशा बिघडलेल्या वास्तवाचं दर्शन ही कादंबरी घडवते.**

'बहुतेक अधिकारी सर्वसामान्य माणसाबद्दल तुच्छताभाव जोपासताना दिसतात. हे जे काही अधिकारीपण आहे ते कुठल्याही स्तरातले असू शकतं. यातूनच प्रशासकीय खात्यातला एक नवा मध्यमवर्ग, मध्यम आणि उच्चभ्रू, अति उच्च पातळीवर तयार झाला. त्यातून एक प्रकारची नवी जात, वर्गव्यवस्था आकाराला आली. फुले, आंबेडकरांनी जाती आणि पाखंडी धर्मव्यवस्थेविरोधात संघर्ष उभा केला. प्रशासनाने जी एक

भयाण स्वरूपाची व्यवस्था सामाजिक आणि कौटुंबिक स्तरावर उभी केली तिचं काय करायचं?' (पृ. १८५) किंवा 'जातिव्यवस्था तिच्या विखासह उलट-सुलट पुन्हा पुन्हा जन्म घेते. पुन्हा पुन्हा टोकदारपणा. हजारो वर्षांचा सूड उगवतोय. पुन्हा पुन्हा नव्या व्यवस्थेसह. जातीचा हा काटाळ प्राणी सारखा फिरत राहणार आहे. आपल्या भवतालून. त्याला गोंजारलं तरी ताप, रोकलं तरी ताप. आपण जातीने मराठा आहोत त्यामुळे जातीयवादी नसतानासुद्धा आपल्याला जातीयवादी ठरवलं जाणार. जमेल तसा त्याचा सूड घेतला जाणार. दलितांना निदान अॅट्रॉसिटीची एखादी का होईना ढाल आहे. मराठा म्हणून आपण जन्माला आलो; पण सत्ताधारी मराठ्यांनी तर कधी शिकताना, नोकरी लावताना आणि लागल्यावरही कधी आधार दिला नाही. मराठा असण्याचे तोटे मात्र आपण भोगतोय.' (पृ. १९०) ही नवनाथची व्यथा आहे. आणि त्याच्या मनातली सलही. तो मराठा असल्याची जाणीव त्याला वारंवार करून दिली जाते. समाजवादी संस्कारातल्या नवनाथला हे सगळं असह्य होतंय. त्यामुळेच तो 'आपली एकूण सामाजिक, राजकीय नैतिकता पाहिली, तर शिवाजी राजांचा फोटोही आपल्या घरात लावण्याचा आणि त्यांच्या डोळ्यात डोळे भिडवून पाहण्याचा आपल्याला अधिकार नाही.' असं विधान करतो. (पृ. २१८) हे विधान एकूणच सामाजिक चारित्र्य आणि नीतिमत्तेच्या संदर्भात समजून घ्यायला हवे.

या कादंबरीतला सदोबा देसले हा शेतकरी संपूर्ण शेती समूहाचा एक शोषित प्रतिनिधी म्हणून प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे कादंबरीभर वावरतो. कारखान्याला दिलेली जमीन आणि बंद पडलेला कराखाना, या चक्रात तो मानसिकदृष्ट्या अडकतो. खरेतर शेतीचा रीतसर व्यवहार झाल्यानंतरही कारखाना बंद पडल्यामुळे आपली जमीन आपल्याला परत मिळावी ही भाबडी आशा बाळगून तो असतो. कायदेशीरदृष्ट्या त्याची ही मागणी व्यवहार्य नसली तरी मानवतेच्या नात्याने त्याला त्याची जमीन परत मिळावी, असे नवनाथलाही वाटते; पण नियम आणि कायद्यापुढे त्याला काहीही करता येत नाही. जमिनीवर नितांत प्रेम करणारा; पण तरीही ती जमीन परत न मिळवू शकणारा आणि शेवटी आत्महत्या केलेला सदोबा देसले आपल्याला अस्वस्थ करतो. पूर्ण पराभूत झालेला, उमेद हरवून बसलेला आणि व्यवस्थेविषयी जराही आकांक्षा न बाळगणारा हा सदोबा आपल्या संवेदनाक्षम मनावर ओरखडे ओढतो. या कादंबरीतल्या शोकनाट्याचा तो एक घटक ठरतो. त्याच्या जाण्याचे दुःख कुणालाही होत नाही. व्यवस्थेच्या दृष्टीने तो मनोरुग्ण असतो. त्याच्या मृत्यूचे पडसाद कुठंच उमटत नाहीत. ही अस्वस्थता लेखकाला सतावते.

नागनाथ दगा पाटील हाही समग्र शेतकरी जातीचा एक प्रतिनिधी. त्याची भग्न आत्महत्याही हेलावून टाकते. अशी अनेक पात्रं या कादंबरीत आहेत आणि त्या सर्वांविषयी लेखकाला मोठी सहानुभूती आहे. वेडी बाई किंवा बोगस सीबीआय अधिकारी याच्याविषयीसुद्धा त्याला कणव आहे.

या कादंबरीत अनेक तथाकथित कृषिभूषण, तथाकथित सहकार महर्षी, तथाकथित बोगस कार्यकर्ते, पत्रकार, दलाल, तथाकथित युगप्रवर्तक, क्रांतिकारी नेते असे अनेक लोक वावरतात. या सगळ्यांविषयी बोलताना नवनाथ आपल्या भूतकाळाचे पापुद्रे उकरून काढतो. स्वातंत्र्योत्तर नोकरशाहीचा वस्तुनिष्ठ चेहरा दाखवतो. आणि मूल्यविलय नावाची कोणतीच व्यवस्था न मानणाऱ्या किंवा तिचं अस्तित्वच मोडीत काढणाऱ्या आणि वसाहतवादी शोषणापेक्षाही भयानक शोषण करणाऱ्या देश व्यवस्थेचे एक उग्र रूप दाखवतो. शेकडो प्रश्न उपस्थित करतो आणि त्या प्रश्नांच्या निराकरणाची अपेक्षा बाळगतो.

ब्रिटिशकालीन व्यवस्था आणि आत्ताची व्यवस्था यातला तुलनात्मक फरकही तो दाखवतो. गावाचा बदललेला चेहरा, तिथली अभावग्रस्तता या गोष्टीकडेही लेखक आपले लक्ष वेधतो. विशेष म्हणजे जातिव्यवस्थेचा एक वेगळा चेहरा या कादंबरीत पाहायला मिळतो. 'जात कितीही घटनाबाह्य मानली तरी जातीची समीकरणं वेगवेगळ्या पद्धतीने लोकशाहीतही आकाराला येतात.' (पृ.४४१) या विधानालाही अनेक मिती आहेत.

ही संपूर्ण कादंबरी वाचकांच्या कल्पनाशक्ती पलीकडचं एक वास्तव जग उभं करते. ज्या अनुभवांची पूर्वरूपे आपल्याला ठाऊक नाहीत, त्या अनुभवापर्यंत लेखक आपल्याला घेऊन जातो. मात्र हेही नोंदवायला हवं की, अनेकदा लेखक विनाकारणच विषयांतर करून

त्याच्या चिंतनाच्या प्रदेशाची सक्तीची सहल वाचकांना घडवतो. म्हणजे एकदम पेशवाई किंवा लॉर्ड कर्झन किंवा आटपाट नगरातल्या उदयकुमारची गोष्ट किंवा निसर्गाच्या ऋतुचक्राची काव्यमय वर्णन इ. अर्थात सगळं हे वाचायला छान वाटत असलं तरी कादंबरीच्या एकात्म रूपाला किंवा संहितेच्या गोळीबंदपणाला त्यामुळे मोठीच बाधा पोहोचते; पण एक मात्र खरं लेखक कोणत्याही वर्णनाला अजिबात रूक्ष होऊ देत नाही. अर्थात हे केवळ रचित कल्पनांचे खेळ म्हणूनही तो मांडत नाही, तर यातून लेखकाची अपरिहार्य आणि परिणत अशी जीवनदृष्टी प्रत्ययास येते. काहीतरी अलंकारभूत करण्याचा कृत्रिम सोसही इथे दिसत नाही. गावगाडा आणि प्रशासनातल्या ज्या बाबी लेखक नोंदवतो त्यातही मानवीवृत्ती-प्रवृत्ती आणि दु:ख, दैन्याचंच दर्शन घडतं.

समग्र समाज, राजकारण, इतिहास, भूगोल, चळवळी आणि तथाकथित नैतिक प्रश्नांपासून लेखक स्वत:ला वेगळं ठेवू शकत नाही. ही व्यवहारसापेक्षता सहज जाणवते. कादंबरीचा उत्तरार्ध तर गद्याच्या फॉर्ममधला एक काव्यात्म आविष्कार वाटतो. लेखक काळाच्या पटलावर जगतोय. त्या काळातल्या आंतर्विरोधाची , स्वत:च्या स्वयंपूर्ण तरीही पराभूत अशा जगण्याची ओळख पटवत राहतो. ट्रेनमधील हिजड्यांच्या हिंस्रतेचा प्रसंग तर अविश्वसनीय वाटावा, असा आहे. हा खरेतर या कादंबरीतला एक महत्त्वाचा प्रसंग आहे आणि तो जितका महत्त्वाचा आहे, तितकाच तो प्रतीकात्मकही आहे. म्हणजे प्रत्यक्षात जसे आपण पाहतो ते तसे असेलच असे सांगता येत नाही. अशा वेळी मानसिक स्तरावर होणारी भयव्याकूळ घुसमट त्रासदायक ठरते. हे सगळं मांडताना लेखक भाषा, तर्कशास्त्र, तत्त्वज्ञान, समाजशास्त्र, अध्यात्म, साहित्य आणि अशा कितीतरी ज्ञानशाखांचा पाया धुंडाळतो. मानवी वर्तनाचे असंख्य नमुने या कादंबरीत पाहायला मिळतात. लेखकाची काव्यमय आणि प्रतिमायुक्त भाषा या कादंबरीचे मोठे बलस्थान आहे, म्हणून जाणीवपूर्वक काही विधानांचा या ठिकाणी उल्लेख करतो.

उदा. १. 'प्रिपीकरानी उतारवयातही आटलेल्या झऱ्याच्या तळाशी थोडसं पाणी उरावं असं आपलं रसिकत्व सांभाळलेलं.' (३२)

२.'चोंडेकर आला आन त्यानं बाईच्या निरीला हात घालावा तसा ह्या जागेला घातला' (३३)

३. 'प्रशासकीयदृष्ट्या साईड पोस्ट म्हणजे एक प्रकारचं भटके विमुक्तपणच' (६३)

४. 'सत्यनारायणाची पोथी मन:पूर्वक वाचावी तसा तो पत्ते खेळतो' (६४)

५. 'बियरचा ग्लास भस्कन भरला की फेसाळतो तसे फेसाळलेले रस्ते' (६८)

६. 'मुक्या जगाची फिर्याद मौनामुळे अधिक प्रभावी होते.' (८४)

७. 'नम्रतेच्या आवरणाखाली असणारी सुप्त धमकी' (८९)

८. 'आरामात येणारे निर्विकार मृत्यू' (९७)

९. 'प्रेमळ ब्लॅकमेलिंग सारखं बोलणं' (११६)

१०.'कायम वाहणाऱ्या एवढ्या घनदाट वर्दळीवर किती थुंकणार' (११५)

११. 'निसर्गाचं ऋतुचक्र या झाडाझुडपावर आपल्या

**बंद पडलेल्या सहकारी साखर कारखान्याच्या निमित्ताने जे प्रशासकीय उत्खनन लेखक करतो ते थक्क करणारे आहे. राज्यकर्ते, संस्थात्मक व्यवहार, सामान्य माणसांचे बेरकी स्वभाव, शेतकऱ्यांची हताशता. कितीतरी प्रसंगांच्या अत्यंत सूक्ष्म नोंदी लेखक घेतो. वेगवेगळ्या अधिकाऱ्यांची कार्यपद्धती, आत्मसन्मान दुखावलेले आणि तरीही विशेष तक्रार नसलेले कारखान्यातले, बँकेतले, पतसंस्थेतले, मंत्रालयातले कर्मचारी. वेगवेगळ्या प्रारूपांचीही अत्यंत विस्तृत नोंद लेखक घेतो. ही सगळी नोंद घेताना त्याच्यातला संवेदनशील माणूस आपल्याला सतत जाणवत राहतो. वेळोवेळी त्याचे भावनिक होणे, गलबलून येणे किंवा पराभूत तटस्थतेने 'जे होईल ते होईल' या धारणेने कार्यरत राहणे या सगळ्या बाबींकडे लेखक वाचकांचे लक्ष वेधून घेतो.**



अनुक्रमणिका

पाऊलखुणा उमटवत जातं' (२२९)
१२. 'कारखान्याच्या सृजनशील कोलाहलाला कायमची श्रद्धांजली वाहणारी ही झाडं नीट उभी मातीवर' (२३०)
१३. 'आपल्या जमिनीचा तुकडा खिशात सांभाळावा तसा त्याने सातबाराचा जुना कागद आजही सांभाळला आहे' (२३४)
१४. 'गौतमाच्या डोळ्यातील आर्द्र पाण्यासारखे हे लोक' (२४३)
१५. 'सर्वांत कमीचं तिकीट काढल्यासारखे सर्वांत मागे डीडीआर वगैरे मंडळी' (२३४)
१६. 'दुःख निवारणाचा भ्रम निर्माण करणारी लोकशाही' (२८६)
१७. 'मासिक पाळीसारखी शुद्धीकरणाची प्रक्रिया' (३७४)
१८. नोकरशाही म्हणजे आपल्या मायलाच झवणारी एक जात हाये. ( ३२६)
१९. 'जाड भिंगाचा दोरी लावलेला म्हातारा चम्मा' (३७४)
२०. 'मुंबै, एक महान हिजडा, चपाक्कन टाळी वाजवत जगणारा' (४५२)
२१. 'प्रशासन म्हणजे गजानन वाटवे, अरुण दाते, कृष्णा कल्ले, सुधीर फडके किंवा सुमन कल्याणपूरनं गायलेलं एखादं भावगीत नाही' (४९५)
२२. 'आणि आता तर संपूर्ण दिवस समोर एखाद्या रिकाम्या पोकळीसारखा मोकळा वाढून ठेवलेला' (५८३)
२३. 'अहंकाराच्या परंपरेचा कणा मोडता येत नाही' (५२६)
२४. 'लैंगिक भावनेचं आदिमत्व आणि चिरस्थायीपण परोपरीनं जाणवत होतं'(५९५)
२५. 'नितळ भूमीतून उगवलेल्या आदिमानवासारखा तो हळूहळू पावलं टाकतोय, देहाला अंकुर फुटल्यासारखा' (६०४)

अशी कित्येक उदाहरणं देता येतील. या प्रत्येक विधानाला गहिऱ्या अर्थच्छटा आहेत. सूचक असं भाव प्रकटीकरण आहे. लेखकाच्या आविष्कार शैलीचा एक वेगळाच प्रत्यय इथे येतो, किंवा एखाद्या व्यक्तीविषयी रागलोभ व्यक्त करतानाही तो खास विशेषणं वापरतो. उदा. गांडू कृष्णा खेकाळे किंवा निरुपद्रवी संतासारखा तडवी, आयुक्त देवेंद्रकुमार गोयल खास आयएएस धाटणीचा सनातनी माणूस, दाक्षिणात्य भाबडेपण चेहऱ्यावर पांघरलेली सुजाता रेड्डी, गांधीवादी तात्यासाहेब, उपद्व्यापी लोमटे, म्हातारा अग्रवाल इ.

आधी म्हटल्याप्रमाणे मानवी वर्तनाचे असंख्य नमुने या कादंबरीत पाहायला मिळतात. प्रत्येकाची एक भाषा आहे. प्रत्येकाची एक जात आहे. प्रत्येकाला एक काहीतरी ओळख आहे. जगण्याविषयी प्रत्येकाची विशिष्ट स्वरूपाची धारणा आहे. प्रत्येकाच्या आयुष्यात काहीतरी आंतरिक कोलाहल आहे. त्या कोलाहलाचे नाद त्यांच्या वागण्याबोलण्यातून उमटत जातात. लेखक हे सर्व नवनाथच्या माध्यमातून टिपत जातो. अर्थात हे सगळं मांडताना लेखक विषयनिरपेक्ष राहू शकत नाही. माणसा माणसांचे परस्परांशी असलेले सामाजिक संबंध आणि एकूणच समूहाची देवाण-घेवाण नवनाथचा मानसिक ताण वाढवते. त्याला या सगळ्या समूहाशी, घटनांशी जोडून घेता येत नाही. त्याला व्यवस्थेचा एक रूक्ष दगड बनता येत नाही. त्याचा आदर्शवाद हीच त्याची मर्यादा ठरते. तो वारंवार कुठलीतरी भूमिका घेतो. तो तत्त्वचिंतनाचे धडे गिरवतो. इतिहास, पुराण आणि विचार परंपरेच्या आडून स्वतःला आरपार छिलून काढतो. मुळातच त्याची संवेदन प्रकृती कवीची असल्यामुळे तो या भोवतालातल्या सगळ्या गोष्टींची हेतुपूर्वक नोंद घेतो. सगळ्या व्यवहाराच्या मागेपुढे असणारे सांस्कृतिक अर्थ व्यक्त करतो. नैतिक किंवा मूल्यात्मक पातळीवर तो विचार करतो. त्याचा जगाकडे पाहण्याचा एक स्वतंत्र दृष्टिकोन आहे. व्यवहारनिरपेक्ष दृष्टिकोन. याच दृष्टिकोनातून तो बोलत राहतो.

समाजव्यवस्थेत जातीय कप्पे घट्ट असूनही आपण समता मानतो, किंवा नैतिक न्यायाची मागणी करणारा सामान्य माणूस त्याची प्रशासकीय कोंडी करणारे अधिकारी हा विरोधाभास लेखक मांडतो. कधीकाळी अभिजन वर्गाकडे असलेली सत्ता बहुजनांनी ताब्यात घेतली खरी; पण त्यामुळे शोषणसत्तेचं नवे केंद्र तयार झाले. राजकीय नेत्यांचा अधिकाऱ्यांच्या कामात होणारा हस्तक्षेप हा केवळ एखाद्या व्यक्तीपुरता मर्यादित राहत नाही, तर तो लोकशाही राज्यालाही मारक ठरणार असतो. याची जाणीव लेखक करून देतो. शूद्रातिशूद्रांच्या



अनुक्रमणिका

पारंपरिक स्थितीत खरंच नव्या काळात फरक काही पडलाय का? याचा विचार करायलाही भाग पाडतो.

राजकीय सत्तासंबंधाच्या जाचक संकेतबद्धतेतून मुक्त होण्याचा मार्ग शोधायचा कसा? अर्थात राजकारण किंवा प्रशासन हे काही निरामय प्रेमसंबंधाचे ठिकाण नाही, हे मान्य केले तरी सामान्य माणूस आणि या व्यवस्थेतली दरी किमान पातळीवर कमी व्हायला हवी, अशी अपेक्षा बाळगण्यात काही गैर नाही. या सार्वत्रिक सामाजिक प्रदूषणाच्या प्रारूपाची लेखक आरपार चिकित्सा करतो. त्यामुळे पिढीजात ही कादंबरी स्वातंत्र्योत्तर काळातल्या प्रशासकीय आणि सहकारी चळवळीच्या स्थितीगतीचे एक महत्त्वाचे आरेखन ठरते. शोषित शेतकरी हा या कादंबरीचा एक महत्त्वाचा घटक आहे. व्यवस्थेच्या पारंपरिक अवस्थांना लेखक तपासण्याचा प्रयत्न करतो. बदलत्या स्थितीगतीवर बोलताना स्वतःचे आकलनही तो जागोजागी मांडतो. त्यातून त्याची एक वैचारिक भूमिका स्पष्ट दिसते. भ्रष्ट प्रशासकीय व्यवस्थेत अधिकारी म्हणून जगताना त्याची होणारी घालमेल तीव्रतेने बळावत जाते. मानसिक स्तरावर त्याच्या भावनांचा अनेकदा स्फोट होतो. उद्रेक होतो; पण त्या उद्रेकाची झळ कुणालाच विशेष जाणवत नाही. अर्थात हे फार कमी वेळा घडतं. नामदारसाहेब जिन्यावरून पडल्यानंतर त्यांचा पीए नवनाथला नॉन्सेन्स म्हणतो, त्या वेळी तो एकाएकी उसळतो. 'आल्यापासून मी तुमचा तमाशा पाहातोय. प्रोटोकॉल मला मान्य आहे; पण त्याच्याही काही मर्यादा असतात. तुम्ही मला नॉन्सेन्स म्हणता? मी तुमच्यापेक्षा सिनियर अधिकारी आहे हे लक्षात घ्या. मंत्र्यांसोबत राहालं म्हणजे कोणालाही काहीही बोलण्याचा अधिकार नाही मिळत मिस्टर देवकर' असे दोन-चार प्रसंग सोडले, तर एरवी नवनाथ म्हणजे प्रशासनाला एक निरामय साधकच. निलंबनालाही समंजसतेने सामोरे जाणारा. आवटे, देवकर, बी.सी. पवार कितीतरी लोक त्याला सतत अडचणीत आणण्याचा प्रयत्न करतात. नियमबाह्य कामे करून घेण्याचा प्रयत्न करतात. अशा वेळी तो उद्विग्न होतो.

विठ्ठलराव विखे पाटील, यशवंतराव चव्हाण, धनंजयराव गाडगीळ, वसंतदादा पाटील, भाऊसाहेब हिरे अशा कितीतरी नावांनी सहकाराला उभं केलंच; पण दुर्दैवाने यातून शोषणाची नवी व्यवस्था आकाराला आली. नैतिक मूल्यं जपणारी मागची पिढी क्रमाक्रमाने संपली; पण तिला योग्य पर्याय आपल्याला देता आला नाही, ही खंत नवनाथ व्यक्त करतो, आणि हा पर्याय देता न आल्यामुळेच सामाजिक, आर्थिक आणि सांस्कृतिक पुनर्वसनाचे प्रश्न अद्यापही कायम असल्याचेही तो बोलून दाखवतो. सामाजिक स्तरावर असा तीव्र आंतर्विरोध आणि जातीय मानसिकतेने आणि राजकीय हस्तक्षेपाने ग्रासलेले प्रशासन हे जर अजूनही कायम असेल, तर आपल्या तथाकथित पुरोगामित्वाचं नेमकं काय करायचं? किंवा नैतिक शहाणपणा ही केवळ दाखवण्याचीच गोष्ट असेल, तर सामाजिक अंतर्विश्वातल्या विषमतेला आपण कसे दूर करणार? हितसंबंधाचे राजकारण जर दुर्बलांचाच बळी घेणार असेल, तर भविष्यकालीन विकासाच्या संकल्पनांना आपण कशी उभारी देणार? 'समाज' या संकल्पनेला बळ देणाऱ्या सामाजिक संस्थाच जर श्रेणी व्यवस्थेला बळकट करणार असतील, तर आपल्या पूर्व विचारपरंपरांचे काय? सर्वांत महत्त्वाचे म्हणजे धर्मनिरपेक्ष भारतातले बुद्धिजीवी वर्गाचे वैचारिक अधःपतन ही गंभीर गोष्ट आहे. ऱ्हासशील व्यवस्थेत पराभूत आणि तरीही आपल्या नैतिक भूमिकेवर ठाम असणारे असे कितीतरी नवनाथ असतील. त्यांच्या प्रगतिशील स्वप्नांचे पंख कापणारी व्यवस्थाही कायम असणार आहे. या व्यवस्थेचा व्यापक परिप्रेक्ष्यातून ही कादंबरी वेध घेते. म्हणूनच समकाळातील एक महत्त्वाची कलाकृती म्हणून या कादंबरीची नोंद घ्यायला हवी.

**पिढीजात (कादंबरी)**
**लेखक : श्रीकांत देशमुख**
**प्रकाशक : राजहंस प्रकाशन, प्रा. लि. पुणे**
**प्रथम आवृत्ती : फेब्रुवारी २०१९**



**डॉ. पी. विठ्ठल**
प्राध्यापक, भाषा संकुल, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड- ४३१६०६ मो ९८५०२४१३३२
मेल · p_vitthal@rediffmail.com





'व्युत्पन्नमती' डॉ. अशोक कामत यांच्या व्यक्तिमत्त्वाचा आणि कर्तृत्वाचा परिचय करून देणारा लेख.

# ज्ञानाचे 'अग्निहोत्र' व्रत आचरणारा ज्ञानतपस्वी – डॉ. अशोक कामत

■■ दीपक करंदीकर

काही काही माणसे ही त्यांच्या विशाल, व्यापक, चौफेर कार्यकर्तृत्वातून समाजापुढे एक आदर्श निर्माण करतात. आयुष्यभर केलेल्या वाटचालीतून अशी माणसे ही स्वतःलाच नव्हे तर समाजालाच उच्च ध्येयाकडे घेऊन जातात. आपल्या उदाहरणातून समाजालाच एक प्रकारची नीतिमूल्ये शिकवत राहतात. समाजाचे मार्गदर्शक गुरू बनतात. हे मार्गदर्शक गुरुपद शंभरातून एखाद्याला प्राप्त होणे, ही त्या त्या काळाची गरजही असते.

महाराष्ट्राच्या विद्वानांच्या परंपरेतील अलीकडचे एक घेण्याजोगे नाव म्हणून महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार यांचे घेता येईल. त्यानंतर कोण असा प्रश्न जेव्हा परंपरा विचारेल त्या वेळी निश्चितपणे डॉ. अशोक प्रभाकर कामत हे नाव घेतले जाईल. पोतदारांच्या काहीसे समकालीन असलेले अहिताग्नि शंकर रामचंद्र राजवाडे हे या विद्वानांच्या परंपरेतील त्या अगोदरचे नाव; पण राजवाडे हे विशेषतः संस्कृत आणि मराठी या भाषायुग्माचे पंडित होते. डॉ. कामतांच्या बाबतीत हीच गोष्ट, हिंदी आणि मराठी या भाषाभगिनींचे पांडित्य कमावणारा आजच्या काळातला विद्वान म्हणून, मान्य करावी लागेल. या दोघांच्या बाबतीत आणखी एक वैशिष्ट्य दिसते– राजवाडे यांनी प्रत्यक्षात कधी शिक्षकी पेशा स्वीकारला नव्हता; पण डॉ. कामतांनी मात्र त्यांच्या आयुष्यातील सुमारे ४२ वर्षे शिक्षकी पेशा स्वीकारला. राजवाड्यांनी स्वतः आयोजित केलेल्या असंख्य विषयांवरच्या व्याख्यानमाला याच त्यांच्या पाठशाला झाल्या. त्यामुळे संपूर्ण समाज हाच त्यांचा 'विद्यार्थी' झाला आणि डॉ. कामतांनी पुणे विद्यापीठाच्या सत नामदेव अध्यासनातून पीएच. डी. च्या सुमारे ५२ ज्ञानार्थींना मार्गदर्शन करून ही सर्वोच्च पदवी प्राप्त करून दिली. शिवाय गावोगावी जाऊन व्याख्याने दिली. त्यांची संख्या काही हजार आहे.

'महाराष्ट्र के नागपंथीय कवियोंका हिंदी काव्य' या विषयावर प्रबंध लिहून पहिली हिंदी पीएच.डी. संपादन केली. अगदी तरुण वयात महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार यांच्याकडून 'प्रत्युत्पन्नमती' अशी प्रशंसा या विद्यार्थ्याला मिळाली होती. परिणामी, आजपर्यंतच्या पाऊणशेहून अधिक वर्षांच्या आपल्या प्रदीर्घ आयुष्यात दत्तो वामनाच्या त्या प्रशसेत, स्वत.च्या बौद्धिक संपदेच्या जोरावर या माणसाने महाराष्ट्राच्या आघाडीच्या विद्वज्जनांच्या नामावलीत आपले उच्चीचे स्थान कमावलेले दिसते. आजपर्यंतच्या त्यांच्या एकूणच शैक्षणिक, सामाजिक, सार्वजनिक कार्याचा मोठा आवाका, त्यांच्या संस्थात्मक कार्याचा प्रचड व्याप पाहिला, तर त्याची नोंद, राज्यपातळीवर किंवा भारतीय पातळीवरच्या एखाद्या 'पद्मश्री' पुरस्काराने गौरान्वित व्हावी. तो क्षण फार दूर नाही, असे वाटते.

हिंदीतून पहिली पीएच.डी. मिळविल्यानंतर या अनोख्या माणसातील 'विद्यार्थी' स्वस्थ बसला नाही तर केवळ मातृभाषेच्या अभिमानापोटी १९८४ साली त्यांनी

मराठी भाषेतून 'संत नामदेवांचे जीवन आणि हिंदी-मराठी काव्य यांचा पुनर्विचार' हा प्रबंधासाठी अभ्यासाचा विषय घेऊन आपली द्वितीय पीएच.डी. ची पदवी संपादन केली. त्यातही वेगळी बौद्धिक करामत या 'विद्यार्थ्याने' दाखविली. ती अशी की, उत्कृष्ट प्रबंध लेखनासाठी दोन विद्यापीठीय पुरस्कार त्यांना मिळाले.

शाहू महाविद्यालय, आबासाहेब गरवारे महाविद्यालय, श्री. ना. दा. ठाकरसी महिला महाविद्यालय आणि त्यानंतर पुणे विद्यापीठ अशा चार संस्थांमधून कामतांनी एकूण ४२ वर्षे अध्यापनाचे कार्य केले, आणि त्या अगोदरच्या विद्यार्थीदशेत पुण्यातील भावे स्कूल, सर परशुरामभाऊ कॉलेज, वाराणसीचे हिंदू विश्वविद्यालय, मुंबई विद्यापीठ आणि मग पुणे विद्यापीठ असे कामतांचे अध्ययन-संशोधन झालेले आहे.

अर्थातच एखाद्या हुषार विद्यार्थ्यांचे अध्ययन हे मुख्यतः दोन प्रकारचे होत असते. एक प्रकार म्हणजे 'बंदिस्त क्रमिक' पुस्तकातून आणि दुसरा प्रकार म्हणजे व्यवहारी जगाच्या खुल्या प्रशाळेतले किंवा महाविद्यालयातले किंवा विद्यापीठातले! डॉ. अशोक कामत या हुषार विद्यार्थ्याचे हे संपूर्ण अध्ययन अशा दोन प्रकारे झाले आणि आजही ते चालूच आहेअसे म्हटले, तर ते वावगे ठरू नये.

या अध्ययनाची परिणती म्हणजे त्यांच्या नावावर जमा असलेली 'द्वैभाषिक' प्रचंड ग्रंथसंपदा होय! संत रोहिदासांपासून संत नामदेवांपर्यंत, संत कबीरांपासून वीरशैव संत बसवेश्वरांपर्यंत, गोस्वामी तुलसीदासांपासून गुरुनानकदेवांपर्यंत आणि अर्थातच संत ज्ञानेश्वरांपासून ते आधुनिक कालखंडातील संतांपर्यंतची अनेक मराठी पुस्तके / ग्रंथ कामतांच्या नावावर आहेत. त्यांच्या हिंदी भाषेचा प्रचंड व्यासंग लक्षात येण्यासाठी मराठीप्रमाणेच त्यांच्या हिंदी ग्रंथसंपदेकडे पाहावे लागते. मग त्यात मानपुरी पदावली, भक्तकवि ठाकूरदास, आद्य महाराष्ट्रीय हिंदी कवि आचार्य दामोदर पंडित की कविता, मराठी संतोंकी हिंदी बाणी, संत ज्ञानेश्वर जीवन और कार्य, भगत नामदेवविषयक चिंतन, प्राचीन हिंदी काव्य, हिंदी और महाराष्ट्र का स्नेहबंध आणि प्राचीन हिंदी काव्य अशा ग्रंथांचा समावेश होतो. याशिवाय राष्ट्रवाणी, विद्यापीठ पत्रिका (पुणे), युगप्रभात (कालिकत), केरलभारती (एर्नाकुलम), साप्ताहिक हिंदुस्थान (दिल्ली), सप्तसिंधु

**संस्थात्मक कार्याच्या अशा धावपळीत डॉ. कामतांनी आपल्या आयुष्यातील काही वर्षे महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कामासाठी दिली. म.श्री. दीक्षितांच्या साहाय्याने परीक्षा- विभाग सांभाळला. महाराष्ट्र साहित्यपत्रिका संपादनात भाग घेतला. आजीव सदस्य वाढविले, परिषदेच्या शाखांशी संपर्क वाढवून त्यांच्याकडून चांगली साहित्यिक कामे करून घेतली. व्याख्यानमाला सुरू केल्या.**

जनसाहित्य (चंदीगड), वीणा (भोपाळ), ममती (राजस्थान), हिंदुस्थानी (प्रयाग), सरस्वती (इलाहाबाद), समीक्षा (पाटणा), विवेक-ज्योती (रायपूर) इत्यादी हिंदी भाषिक प्रतिष्ठित नियतकालिकांतून दोनशेवर निबंध प्रकाशित झालेले आहेत. याशिवाय पुस्तिका-लेखन स्वरूपात तीनशे लेख प्रकाशित झालेले आहेत. कामतांच्या लेखन संभारात वृत्तपत्रीय आणि विविध प्रकारच्या साप्ताहिके, मासिके, त्रैमासिके, नियतकालिके यांच्यातून गेली ५५/ ६० वर्षे अनेकानेक विषयांवरची सुमारे दोनशेहून अधिक लेख, परीक्षणे, रसग्रहणे, प्रकाशित झालेली आहेत. उदाहरणच द्यायचे झाले,तर आद्य संस्थापक य. गो. जोशी यांच्या 'प्रसाद' या मासिकाच्या प्रत्येक अंकात, अखंडपणे गेली ५५ वर्षे कामतांचे लेख प्रकाशित होत असतात. 'प्रसाद' चा असा एकही अंक नाही की, ज्यात डॉ. अशोक कामत या विचारवंत लेखकाचा लेख नाही. डॉ. कामतांच्या या सर्वस्पर्शी लेखनकार्याची आणखी एक बाजू आहे. तिचीही नोंद घेतल्याशिवाय पुढे जाणे उचित होणार नाही.

२००२ साली कामतांनी प्रारंभ केलेल्या गुरुकुल प्रतिष्ठानमार्फत त्यांनी प्रकाशित केलेली सुमारे ७५ ग्रंथ प्रकाशने! यामध्ये संत माकनेरकर महाराज, ज्ञानेश्वरचरित्र (हिंदी), आळंदी नगर (हिंदी), श्रीतुकाराम अभंगगाथा (हिंदी), श्रीमद्भगवत गीता, रामदासांची काव्यसृष्टी, दासबोध (हिंदी गद्यानुवाद), रसमालय भागवत, ज्ञानेश्वरीकोश, सिक्ख गुरुचरित्र (तीन खंड), हिंदी

व्याकरण रचना, बसववचने, ग्रामगीता निरुपण, मीरा: साहित्यप्रवास, रसमानस, अशा विविध विषयांवरची ही गुरुकुलची प्रकाशने आहेत. शिवाय गुरुकुल प्रकाशित केवळ १०/१५ रुपये मूल्य असलेल्या १०० पुस्तिकांचे नुसते विषय जरी पाहिले तरी कामतांच्या प्रचंड लेखनकार्याची महती पटावी, असे ते विषय आहेत. त्यात हिंदू धर्मातील संस्कार, मराठी कोशवाङ्मय, बायबल आणि येशू ख्रिस्त, गुरुग्रंथसाहेब आणि नामदेवांची वाणी, महानुभावांचा धर्मग्रंथ, अरब आणि मुहंमद पैगंबर, इस्लाम आणि भारतीय मुसलमान, महात्मा बसवेश्वर, श्रीगणेशाची उपासना, कीर्तनकला, कविवर्य भूषण, हिंदवी स्वराज्याचे विस्तारकार्य, कौटिलीय अर्थशास्त्र, संस्कृतभाषा, पशुक्षयरोग निदान, अशा विषयांचा समावेश आहे.

आयुष्यभर कामतांनी समन्वयाचा राष्ट्रीय विचार घेऊन अगणित विषयांवर भारताच्या कानाकोपऱ्यात व्याख्याने दिली आहेत आणि आपल्या अखंड शोधयात्रेतील वैचारिक मंथनातून, सामाजिक, सांस्कृतिक, शैक्षणिक अभ्यास निरीक्षणातून तयार झालेले ज्ञानामृत मुक्तपणे समाजाला दिले आहे. त्या अर्थाने डॉ. कामतांना 'समाजशिक्षक' या जनपदवीने भूषविले गेले आहे.

कामतांचा पत्रव्यवहार (आवकजावक) हा सुद्धा प्रचंड आहे. देशाच्या सैनिकांपासून ते अगदी जिवश्चकंठश्च मित्रापर्यंत, हॅमिल्टन येथील गुरूवर्य कावळे यांच्यापासून कन्नड राष्ट्रकवी श्रीधर यांच्यापर्यंत आणि दैनिक सकाळपासून ते आकाशवाणी केंद्रापर्यंतचा, त्यांनी लिहिलेल्या किंवा त्यांना आलेल्या पत्रांची त्यांची संग्रहसंपदा पाहिली की थक्क व्हायला होते. गुरुकुलमध्ये किंवा त्यांच्या घरी गेले तरी आजही कामतांची संभाषणे दूरध्वनीवरून अखंड चालू असतात. डॉ. कामत प्रत्यक्षात भ्रमणध्वनी या अत्याधुनिक जादुई श्रवणयंत्रापासून चार हात दूरच राहिलेले दिसतात म्हणून एका प्रकारे बरे आहे, नाहीतर भ्रमणध्वनीवरच्या त्यांच्या संपर्क संभाषणाचे एक जागतिक 'रेकॉर्ड' झाले असते!

महाराष्ट्रातील अनेक विद्वान पंडितांप्रमाणे बाळशास्त्री हरदास यांच्याबद्दल असे सांगितले जाते की, त्यांना वेदवाङ्मयापासून ते तत्त्वज्ञान, इतिहास, धर्म ते सर्वसामान्यांच्या नवरसपूर्ण विविध जीवनपद्धतीपर्यंत कोणताच विषय वर्ज्य नव्हता!

डॉ. अशोक कामतांच्या बाबतीत सुद्धा असेच म्हणता येईल!

अशा प्रकारचे ग्रंथलेखन किंवा तदनुषंगिक कामे, कार्ये करण्यासाठी, चौफेर दृष्टी, वैचारिक घुसळण करण्याची बौद्धिक क्षमता, ज्ञानाच्या स्रोतापर्यंत पोहोचण्यासाठी आवश्यक असणाऱ्या शारीरिक संपदेची दैवी आणि स्वनिर्धारप्राप्त देणगी, अशा अनेक गुणांची आवश्यकता जशी असते तसेच आवश्यक ते संस्कार, विहित कार्यासाठी मार्गदर्शक ठरणाऱ्या पूर्वसुरींची पाठराखण, सत्याची चाड, प्रामाणिकपणाची आस्था, समाजाच्या भल्याविषयीची आस, जिद्दी स्वभाव अशाही गोष्टींची आवश्यकता असते; तरच ती व्यक्ती इतर कार्ये करू शकते.

बालपण, शालेय जीवन, महाविद्यालयीन जीवन, पोटापाण्याच्या तजविजीसाठीचे संघर्षमय जीवन, संसारात पडणे व तो यशस्वीपणे चालविणे, एका टप्प्यावर मागे वळून स्वतःच्याच वाटचालीचे सिंहावलोकन करणे व उर्वरित आयुष्यात काय काय करायचे त्याची कठोरपणे आखणी करणे, विशेषतः साठीनंतर 'नाठी' बुद्धीला पुन्हा प्रज्वलित करणे, आणि हे सर्व करीत असताना मार्गातील अनेक मोहमयी पाणपोयांना आणि त्यांच्या मालकांना बगल देऊन पुढचे मार्गक्रमण करणे, करीत राहणे, रोज पहाटे उठल्यावर आराध्यदैवताचे दर्शन घेण्याबरोबरच काल केलेल्या नव्या संकल्पपूर्तीसाठी दिवसभर अथक परिश्रम घेणे अशा लोकविलक्षण दिव्यातून डॉ.कामत हे निःसंशय उजळून गेलेले दुर्लभ व्यक्तित्व महाराष्ट्राच्या सांस्कृतिक पटलावर आजमितीला मौजूद आहे.

बालपणी मामा, पारू आणि सीताबाई, दादा खानोलकर, अलवण नेसणारी विधवा सुभद्रा, त्रिवेणीसारखी लाभलेली थोरली बहीण, चाकणच्या ताई, ओतूरची शारदामाई, नीराबाई नाईक ही दांडपट्टा फिरवून आपल्या लेकराला कठोरपणे संकटातून वाचविणारी शिक्षिका आई, हिंदीचे शाळेतील शिक्षक ठाकूरदेसाई, आयुष्यातील पुढचा मार्ग ठरविणारे कृष्ण वामन मोडक व त्यांच्या कर्तृत्ववान पत्नी सुशीलाताई, महामहोपाध्यायांशी जोडले जाणे, डॉ. वि. रा. करंदीकर, डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, डॉ. भुपटकर, परळीकर, डॉ. कावळे, डॉ. नागराजन, डॉ. सरोजिनी बाबर, नवनव्या विषयांचा अभ्यास करायला प्रवृत्त करणारा सन्मित्र रा.चिं. ढेरे, वीर सावरकरांची ज्वलजहाल संभाषणे या साऱ्यांचे

आणि साऱ्या संस्कारघटितांच्या मुशीतून धगधगीतपणे आकाराला आलेला ठसठशीत 'सुवर्णडाग' म्हणजे डॉ. अशोक प्रभाकर कामत होय.

वृत्तपत्राचा वार्ताहर म्हणून सुरुवात केलेले वृत्तपत्रीय लेखन ते भारतातील संतकार्याच्या संशोधनातून अभ्यासपूर्ण लिहिलेले ग्रंथ अशी लेखनझेप या माणसाने पुढील आयुष्यात घेतली. साधारण १९६६ पासून कामतांचे ग्रंथलेखन सुरू झालेले दिसते, ते आजही पुस्तिकांच्या रूपात चालूच आहे.

महाराष्ट्रातून बाहेर पडून गुजराथ, राजस्थान, सिंध-पंजाव, वायव्य भारत इथे हिंडून नवनव्या शोध-संशोधनाद्वारे संत नामदेवविषयक संशोधनकार्य तडीस नेण्यापासून ते व्याख्यानांच्या दौऱ्यातून कन्याकुमारीपासून काश्मीर, दिल्लीपर्यंत आणि गोवा-मुंबईपासून कलकत्ता, आसामपर्यंत सारा भारत या ज्ञानपिपासू माणसाने आजवर कितीदा पालथा घातला आहे, त्याला हिशोब नाही. उदाहरण द्यायचेच झाले तर, संत नामदेवांच्या उत्तर भारतातील जीवनकार्याविषयी शोधसंशोधन करण्यासाठी कामतांनी त्या काळात १२ वेळा नामदेव जिथे जिथे गेले तिथे तिथे प्रवास केला आहे. त्यातून जे संशोधन प्राप्त झाले ते ग्रंथरूपाने समाजासमोर मांडले आहे.

डॉ. कामतांनी समाजातील असंख्य संस्थांतून संस्थात्मक कामे उभी केली. राज्य पाठ्यपुस्तक मंडळाचे अकरा वर्षे सदस्य राहून पाठ्यपुस्तक निर्मिती आणि अभ्यासक्रम-सशोधनासंबंधीची कामे, बालभारतीच्या हिंदी समितीतील कार्य, त्या वेळचे महात्मा कबीरविषयक पाठाचे संपादन करण्यासाठी वाराणसीत मुक्काम ठोकून केलेले संशोधनकार्य, हिंदी बालभारतीच्या पहिल्या सात इयत्तांसाठी कामतानी दोन वेळा संपूर्ण क्रमिक पुस्तके तयार केली; पण त्या काळी पुस्तकावर सदस्यांची नावे देत नसत, म्हणून कामतांच्या या कामाची नोंद कुठे सापडणार नाही. 'गाँव हो तो ऐसा' ह्या कामतांनी लिहिलेल्या धड्याचा समावेश हिंदी पाठ्यपुस्तकात तर झाला, तेव्हा खरेच असे 'गाँव' असते का ते प्रत्यक्ष दाखविण्यासाठी या धड्याचा 'लेखक' बालभारतीच्या हिंदी विभाग प्रमुखाला अण्णा हजारेंच्या राळेगणशिंदी (आता सिद्धी) या आदर्श गावाला घेऊन गेला होता, टीकाकारांची खात्री पटविण्यासाठी!

सन्मित्र डॉ. रा. चिं. ढेरे यांच्या स्वप्नातून एकेकाळी

**या अध्ययनाची परिणती म्हणजे त्यांच्या नावावर जमा असलेली 'द्वैभाषिक' प्रचंड ग्रंथसंपदा होय! संत रोहिदासांपासून संत नामदेवांपर्यंत, संत कबीरांपासून वीरशैव संत बसवेश्वरांपर्यंत, गोस्वामी तुलसीदासांपासून गुरुनानकदेवांपर्यंत आणि अर्थातच संत ज्ञानेश्वरांपासून ते आधुनिक कालखंडातील संतांपर्यंतची अनेक मराठी पुस्तके / ग्रंथ कामतांच्या नावावर आहेत. त्यांच्या हिंदी भाषेचा प्रचंड व्यासंग लक्षात येण्यासाठी मराठीप्रमाणेच त्यांच्या हिंदी ग्रंथसंपदेकडे पाहावे लागते.**

'महाराष्ट्र संशोधन मंदिर' ही संस्थेची पाटी व लेटरहेडस् तयार झाली; पण संस्थेची वाटचाल थांबली. त्यातूनच स्फूर्ती घेऊन कामतांनी पुढे अनुकूल काळात 'गुरुकुल प्रतिष्ठान' ही स्वतःची संस्था स्थापन केली. आज ती चांगलीच नावारूपाला आली आहे; पण यामधल्या काळात काय घडले?

कामतांना प्राध्यापक म्हणून अनेक विद्यापीठात निवड समिती सदस्य, पीएच.डी. प्रबंध परीक्षक इ. कार्यांच्या निमित्ताने विद्यापीठीय स्तरावरील संस्थात्मक कामे करता आली. उत्तर महाराष्ट्र विद्यापीठाच्या उभारणीसाठी महत्त्वाचे कार्य कामतांना करता आले. संतसाहित्य संमेलनातून कामतांना अनेक प्रकारच्या महत्त्वाच्या भूमिका निभवायला मिळाल्या. अमरावतीच्या गाडगे महाराज विद्यापीठात आजही काम चालू आहे. तसेच नांदेडमधील स्वामी रामानंदतीर्थ मराठवाडा विद्यापीठात कामतांच्या संकल्पनेनुसार आणि पुढाकाराने दशमगुरू गोविंदसिंह अध्ययन-संशोधन केंद्र २२ वर्षांच्या अथक प्रतीक्षेनंतर सुरू झाले आहे. डॉ. अशोक कामतांचेच हे सारे श्रेय कुलगुरू डॉ. पंडित विद्यासागर मान्य करतात. अशाच संस्थात्मक कार्यात पुण्यातील महाराष्ट्र साहित्य परिषदेत परीक्षा विभाग आणि मराठी व मोडीचे वर्ग चालविण्याचे कार्य कामतांच्या हातून काही



अनुक्रमणिका

वर्षे घडले. तसेच महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभेच्या हिंदी विद्यासंकुलातही त्यांनी पंचवीस वर्षे स्वतःचा ठसा उमटविणारे कार्य केले आहे. प्रत्यक्षात नामदेव अध्यासन या पुणे विद्यापीठातील एका अध्यासनाला 'लोकासना' चा दर्जा देण्याचे महान काम कामतांनी त्या अध्यासनाच्या २२ वर्षांच्या अध्यापन सेवेत केले आहे. त्यातून त्यांचा प्रचंड लोकसंग्रह, नामवंत विद्यार्थी-शिष्यसंग्रह, निष्ठावान सन्मित्रसंग्रह असल्याचे वेळोवेळी दिसून आले आहे. निवृत्तीनंतरची एकेक करीत पाच वर्षे पुनर्नियुक्ती मिळालेला एकमेव अध्यासनप्रमुख म्हणून डॉ. कामतांचे नाव घेता येईल. एकूण विद्यापीठीय स्तरावरील नेमणुकीच्या पद्धती, नियम, राजकारण वगैरे लक्षात घेता अशी पुनर्नियुक्ती मिळणे ही गोष्ट दुर्मिळच म्हणावी लागेल; पण तेही भाग्य, नियतीने कामतासारख्या लेखन संशोधन-मार्गदर्शन-समाजप्रबोधन-संस्थात्मक कार्य आणि सहकार्य आणि पारदर्शी प्रशासन अशी कामांची सहा सूत्रे कायम ठेवणाऱ्यांना बहाल केले. हे अफाट कार्यकर्तृत्व करण्यासाठी प्रत्येक गोष्ट कृती संकल्पपूर्वक करायचा परिपाठच डॉ. कामतांनी आयुष्यभर अनुसरला आहे.

असा आयुष्यभराचा संस्थात्मक कार्याचा अनुभव पणास लावून कामतांनी साठी निवृत्तीनंतर लगेच जे विद्यापीठाच्या चौकटीत करता आले नाही ते कार्य करण्यासाठी 'गुरुकुल प्रतिष्ठान' संस्थेची आखणी केली. आज १७ वर्षांनंतर 'गुरुकुल' च्या माध्यमातून त्यांनी उभारलेले प्रचंड कार्य महाराष्ट्रभर आणि चार पावले परराज्यातही चांगले नावारूपाला आले आहे.

एकेकाळी पुण्यातील कँप भागातील संमिश्र समाजांच्या वस्तीत असलेली 'हिंदी विद्यालय' ही डबघाईला आलेली शाळा होती; पण केवळ पोतदार-नेने यांची शाळा म्हणून कामतांनी अथक परिश्रम घेतले. त्यासाठी चांगले साथीदार सहकारी मिळविले. त्या शाळेत सुसंस्कार व शिस्त यावर भर दिला. शाळेतील प्रत्येकाला स्वयंशासनाची अंमलबजावणी करायला लावून शाळेच्या सामूहिक, सांस्कृतिक कार्यक्रमांची नवी घडी बसवून, त्या शाळेचा कोसळता डोलारा कामतांनी सावरला. शाळेच्या परिसरात मोकळे व निसर्गरम्य वातावरण निर्माण केले आणि पुण्यातील हिंदी विद्यालयाचा आब व सन्मान सामाजिक, शैक्षणिक क्षेत्रात वाढविला.

डॉ. कामतांनी भारत इतिहास संशोधन मंडळ, राम कोश मंडळ, संस्कृती कोश मंडळ, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ अशा अनेक संस्थांमधून भरीव काम केले आहे. पुणे आकाशवाणी केंद्रावरून अनेक विषयांवरची भाषणे व 'चिंतन' सदरासाठी लेखन केले आहे.

या साऱ्या लेखन, समाजप्रबोधनामागे एकूणच भारतीय संतसाहित्याच्या महासमन्वयाची वैचारिक मंथनातून तयार झालेली बैठक आहे. या संदर्भातील कामतांचे विवेचन असे आहे की, सर्वच भारतीय भाषांचे वाङ्मय हे संतवाङ्मयातून निर्माण झालेले आहे. भारतातील कोणतीही भाषा याला अपवाद नाही. रामायण, महाभारत, उपनिषदांची निर्मितीसुद्धा 'महासमन्वयाच्या' संकल्पनेवर आधारित आहे. रामायणाच्या असंख्य कथा आसाम, कर्नाटक, महाराष्ट्र आणि भारताबाहेरील असंख्य देशातून, त्या त्या प्रदेशातील वेगवेगळ्या भाषांतून आजही उपलब्ध आहेत, त्यांचा अभ्यास झाला पाहिजे.

डॉ. कामतांच्या अशा प्रकारच्या लेखनातून प्रेरणा घेऊन संत रोहिदास गृहरचना संस्था आणि भिवंडीतील भव्य विद्यालय संकुल अशासारखे प्रत्यक्ष काम उभे राहिले. अशी कितीतरी उदाहरणे सांगता येतील. संत नामदेव जन्मसप्त शताब्दी वर्षाच्या (१९७०) निमित्ताने तयार झालेल्या पुस्तकातून, पुढे मुलांच्या नित्यपाठासाठी-शालेय प्रार्थना पाठ, शालेय देशगीते, प्रेमचंद अशी काही पुस्तके केवळ 'बालकुमार' वाचकांसाठी तयार झाली. त्याचा उपयोग याच काळात उभारणी झालेल्या 'मराठी बालकुमार साहित्य संमेलन' या संस्थेला झाला.

वक्ता कामतांनी असंख्य व्याख्याने दिली; पण महत्त्वाचे म्हणजे पुढच्या पिढीला या ज्ञानभांडाराचा उपयोग व्हावा या हेतूने त्यांनी त्यातील निवडक महत्त्वाच्या व्याख्यानांची 'नोंदकार्ड्स' लिहून ठेवली आहेत!

वीरशैव संत आणि 'लिंगायत' पंथाची स्थापना करणाऱ्या बसवेश्वरांच्या वीरशैव-मराठी अभ्यासकांचा मेळावा घेण्याची प्रथा डॉ. नीळकंठ कल्याणी याच्या सहकार्याने कामतांनी घेऊन दाखविली. मातृहृदयी साने गुरुजी या कामतांच्या पुस्तकामुळे सानेगुरुजी अध्ययन केंद्राची उभारणी व्हायला मदत झाली.

संस्थात्मक कार्याच्या अशा धावपळीत डॉ. कामतांनी आपल्या आयुष्यातील काही वर्षे महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कामासाठी दिली. म.श्री. दीक्षितांच्या साहाय्याने परीक्षा- विभाग सांभाळला. महाराष्ट्र

**कामतांना प्राध्यापक म्हणून अनेक विद्यापीठात निवड समिती सदस्य, पीएच.डी. प्रबंध परीक्षक इ. कार्यांच्या निमित्ताने विद्यापीठीय स्तरावरील संस्थात्मक कामे करता आली. उत्तर महाराष्ट्र विद्यापीठाच्या उभारणीसाठी महत्त्वाचे कार्य कामतांना करता आले. संतसाहित्य संमेलनातून कामतांना अनेक प्रकारच्या महत्त्वाच्या भूमिका निभवायला मिळाल्या. अमरावतीच्या गाडगे महाराज विद्यापीठात आजही काम चालू आहे. तसेच नांदेडमधील स्वामी रामानंदतीर्थ मराठवाडा विद्यापीठात कामतांच्या संकल्पनेनुसार आणि पुढाकाराने दशमगुरू गोविंदसिंह अध्ययन-संशोधन केंद्र २२ वर्षांच्या अथक प्रतीक्षेनंतर सुरू झाले आहे.**

साहित्यपत्रिका संपादनात भाग घेतला. आजीव सदस्य वाढविले, परिषदेच्या शाखांशी संपर्क वाढवून त्यांच्याकडून चांगली साहित्यिक कामे करून घेतली. व्याख्यानमाला सुरू केल्या.

'गुरुकुल प्रतिष्ठान' ही स्वतःची संस्था स्थापन केल्यावर, अशा सस्थात्मक कामाचे अनुभवसंचित डॉ. कामतांच्या उपयोगी पडले आहे. या प्रतिष्ठानात दुर्मिळ प्रकाशनांचे आणि संदर्भ ग्रंथांचे उत्तम रीतीने जतन करीत उत्तम संदर्भ ग्रंथालय व अभ्यासिका आता जिज्ञासूंसाठी अस्तित्वात आहे.

'गुरुकुल' तर्फे सत साहित्याचा उपयोग करून दरवर्षी एक दैनंदिनी प्रकाशित केली जाऊ लागली आहे.

सविता भावे स्मृती विद्यासन, डॉ. मो. प्र. मराठे स्मृती विद्यासन, सुधाकर प्रभू स्मृती विद्यासन, अशी विद्यासने गुरुकुलात उपलब्ध आहेत. या विद्यासनांच्या मागची कल्पना अशी आहे की, या संदर्भ ग्रंथालयात नियमितपणे बसून योजनापूर्वक समाजोपयोगी लेखन-संशोधन लेखक-संशोधकाने करावे. अशा त्यांच्या प्रकल्पासाठी मार्गदर्शन, टंकलेखन इत्यादी सहकार्य गुरुकुल करील. प्रकाशनासाठीसुद्धा प्रयत्न करील. त्या व्यक्तीस हे काम करण्यासाठी विद्यावेतन दिले जाईल. या गुरुकुलच्या ग्रंथालयात एकावेळी १० ते १५ अभ्यासक काम करू शकतील अशी व्यवस्था केली आहे.

गुरुकुलच्या वतीने आदर्श माता-पिता, आदर्श गृहिणी-सहधर्मचारिणी, आंतरभारती कार्य पुरस्कार, हेरेकर पुरस्कार. ध. द. धोंड मुद्रणकलेविषयक मुद्रांजली पुरस्कार, जीवनगौरव पुरस्कार असे पुरस्कार जाहीर सभासमारंभातून दिले जातात. गुरुकुलमध्ये अतिथिगृहाची सोय आहे.

गुरुकुलच्या सध्याच्या इमारतीमागे झाडांच्या दाटीवाटीत आणि शेजारूनच प्रचंड वाहतूक चालू असलेल्या जागेत गेली काही वर्षे असंख्य विषयांवरची तज्ज्ञ मंडळी निमंत्रित करून, दरमहा भाषणे, चर्चा, परिसंवाद घडवून आणले जात आहेत. आणि या जागेत असे 'ज्ञानसत्र' अखंडपणे चालू आहे.

अर्थात त्याचे पौरोहित्य, स्वतः ज्ञानाचा सागर असलेले डॉ. अशोक कामत करीत असतात. कमतरता एवढीच असते की, महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदारांसारखी सोनेरी झिरमिळ्यांची पुणेरी पगडी विद्वान पंडित डॉ. अशोक कामतांच्या मस्तकावर नसते; पण त्यामुळे काहीच फरक पडत नाही. प्रास्ताविकांतून किंवा समारोपाच्या भाषणांतून कामतांनी मंत्रोच्चारासारख्या उच्चारलेल्या ज्ञानयुक्त मतमतांतराच्या 'समिधा' ज्ञानयज्ञात सातत्याने पडतच असतात आणि राजवाड्यांप्रमाणे हे ज्ञानाचे 'अग्निहोत्र' हा ज्ञानयोगी अग्निहोत्री निष्ठेने आचरत असतो. कर्तव्यात कोणतीही कसूर न ठेवता हे कार्य अव्याहत चालू आहे.

❖❖

**दीपक करंदीकर**
१०४३/४/२, दर्शन, सदाशिव पेठ, रहाळकर राममंदीरासमोर,
पुणे - ४११०३० भ्रमणध्वनी - ९४२३००७०३५



अनुक्रमणिका

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी सुरू केलेल्या 'मूकनायक' नियतकालिकाच्या शताब्दीनिमित्ताने मूकनायकविषयी माहिती देणारा लेख.

# डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे शंभर वर्षांपूर्वीचे 'मूकनायक'

डॉ. हरिश्चंद्र निर्मळे


मूकनायक

## नियतकालिक: एक समर्थ माध्यम

कोणतीही समस्या विश्लेषणात्मक स्वरूपात समाजमनापर्यंत पोहोचविण्यासाठी नियतकालिकासारखे समर्थ माध्यम नाही कारण एकच विचार, एकाचवेळी असंख्य वाचकांच्या मनात नियतकालिकेच रुजवू शकतात. पाश्चात्त्यांनी वर्तमानपत्रांचे असे मार्मिक पण समर्पक वर्णन केले आहे. नियतकालिकांच्या बाबतीतही तेच म्हणता येईल. वास्तविक एखादा नवा विचार, नवे तत्त्व किंवा नवीन कायदा समाजमनात एकाएकी रुजविणे कधीही शक्य नसते. त्यासाठी अगोदर समाजमनाची तयारी करावी लागते. विचारजागृतीची बीजे प्रथम त्याच्या मनात पेरावी लागतात. हे अत्यंत अवघड कार्य समर्थपणे पार पाडण्यासाठी नियतकालिकेच अधिक उपयुक्त असतात. महाराष्ट्रातील समाजजीवनात नियतकालिकांनी उच्च स्थान पटकाविण्याचे कारणही हेच आहे. लष्करापेक्षाही नियतकालिकांची शक्ती प्रभावी होती, कारण जनतेच्या हक्कांची ती राखणदार झाली. लोकमतांना वाचा फोडणे, त्यांना वळण लावणे आणि लोकमताची जडणघडण करणे या त्यांच्या कर्तव्यामुळे समाजात त्यांना अग्रस्थान मिळाले.

नियतकालिकांची ही सामर्थ्यशाली शक्ती डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या लक्षात येताच, असे समर्थ आणि प्रभावी माध्यम हाती असल्याशिवाय दलितांची दु:खे जगाच्या वेशीवर टांगता येणार नाहीत आणि अस्मितेची ज्योत त्यांच्या अंत:करणात तेवती ठेवता येणार नाही याची जाणीव बाबासाहेबांना १९१८ पासूनच होऊ लागली होती, कारण माँटेग्यू सुधारणा अंमलात आणण्यासाठी साऊथबरो कमिटी हिंदी लोकांच्या साक्षी घेत होती. याशिवाय या सुधारणांचा उपयोग करून घेऊन दलितांनाही राजकीय क्षेत्रात वेगळे हक्क प्राप्त करून देणे बाबासाहेबांच्या मते अत्यावश्यक होते. या सर्व बाबींचा विचार करून त्यांनी तो आपल्या सर्व निकटवर्ती सहकाऱ्यांजवळ बोलून दाखवला. दरम्यान १९१९ साली कोल्हापूरचे छत्रपती शाहू महाराज मुंबईत आले असता,

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी आपल्या सहकाऱ्यांसह त्यांची भेट घेऊन, केवळ दलितांच्या उद्धारासाठी आणि त्यांच्या न्यायहक्कांसाठी स्वतंत्र नियतकालिकाची आवश्यकता बोलून दाखविली. छत्रपती शाहू महाराजांना ही कल्पना खूपच आवडली आणि तत्काळ त्यांनी रु. २५००/- चा चेक बाबासाहेबांच्या स्वाधीन केला. एवढे घसघशीत आर्थिक पाठबळ मिळताच, आपल्या मूक बांधवांच्या व्यथा-वेदनांना वाचा फोडण्यासाठी, त्यांचे नायकत्व स्वत: स्वीकारले आणि शनिवार दि. ३१ जानेवारी, रोजी 'मूकनायक' या केवळ दलितांच्या उद्धारासाठी वाहिलेल्या पाक्षिकाचा पहिला अंक प्रसिद्ध करून, मराठी नियतकालिकांच्या क्षेत्रात पहिले पाऊल टाकले.

**'मूकनायक': स्वरूप**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी सुरू केलेल्या या 'मूकनायक' पाक्षिकाचे ३१ जानेवारी १९२०, ते २३ ऑक्टोबर १९२० या दरम्यान एकूण १९ अंक प्रकाशित झाले. त्यांपैकी आज अंक क्र.१ ते ३,५, ६ व१० आणि १३ ते १९ एवढे अंक उपलब्ध आहेत. विशेष म्हणजे योगायोगाने हे सर्व अंक प्रत्येक शनिवारीच प्रसिद्ध झाले आहेत. यांपैकी कोणत्याही अंकावर संपादक या नात्याने कोणाचेही नाव सुस्पष्टपणे छापलेले दिसून येत नाही; परंतु ३१जुलै, १९२० च्या अंक क्र. १३ च्या मुखपृष्ठावर, 'या अंकापासून मूकनायक पत्राची अंतर्व्यवस्था बदललेली असून, संपादकीय लेख व इतर सर्व पत्रव्यवहार रा. रा. ज्ञानदेव ध्रुवनाथ घोलप यांचे नावे करावा' अशी सूचना करण्यात आली आहे. मूकनायक हे पाक्षिक आठ पानांचे होते. यांपैकी दहावा अंक हा दि.३०, ३१ मे व १ जून १९२०, रोजी छत्रपती शाहू महाराज यांच्या अध्यक्षतेखाली, नागपूर येथे संपन्न झालेली 'अखिल भारतीय बहिष्कृत समाज परिषद', तिचा संपूर्ण अहवाल प्रसिद्ध करणारा दहा पानांचा विशेषांक होता. या सर्व अंकांचा कालावधी जानेवारी ते ऑक्टोबर असा केवळ दहाच महिन्यांचा असला, तरी दलितांचे एक स्वतंत्र, स्वायत्त आणि 'केसरी' चा बाणा असलेले परखड विचारांचे, मूकनायक हे पहिलेवहिले नियतकालिक होते. त्याचे सर्व उपलब्ध अंक महाराष्ट्र शासनाच्या, शिक्षण विभागाने, वसंत मून यांच्या संपादकत्वाखाली नोव्हेंबर, १९९० साली पुनर्मुद्रित केले आहेत.

**दलितांच्या व्यथा, वेदना आणि समस्यांचे चित्रण करणारी इतरही अनेक सदरे मूकनायकची वैशिष्ट्ये होती. आमची हालचाल, आमची जखम, कुशल प्रश्न, काठीचे सपाटे (वेसकर), कळावे की, शेला पागोटे (जावई), पत्रव्यवहार, वर्तमानसार, मननीय उद्गार, निवडक पत्रातील उतारे अशी त्यांची नावे होती. महाराष्ट्रातील बहिष्कृत समाजातील घडामोडी, अन्यायकारक घटना, चळवळीविषयक सभा, परिषदा, यांसंबंधीचे लेखन सदर सदरांतून प्रसिद्ध होत असे.**

'मूकनायक' पाक्षिकाचे सर्व अंक के. आर. मित्र यांनी आपल्या मनोरंजन प्रेस, सँडहर्स्ट रोड, गिरगाव, मुंबई येथे छापले, आणि ते, हरारवाला बिल्डिंग, पोयबावडी, परेल, मुंबई येथील मूकनायकच्या कार्यालयातून प्रकाशित झाले; परंतु या उपलब्ध अंकांपैकी क्र.२, ३ व ६ हे श्री. पां. न. भटकर यांनी प्रकाशित केले असून, क्र. ५ व १३ ते१९ हे सर्व अंक श्री. ज्ञा. ध्रु.घोलप यांनी प्रकाशित केल्याची नोंद दिसून येते.

'मूकनायक' चे पहिले संपादक श्री. पांडुरंग नंदराम भटकर या वऱ्हाड प्रांतातील गृहस्थाचे शिक्षण पुण्यातील फर्ग्युसन महाविद्यालयात इंटरपर्यंत झाले होते. ५ जुलै, रोजी १९२० डॉ. आंबेडकर शिक्षणासाठी लंडनला गेले तेव्हा त्यांनी भटकरांना व्यवस्थापकांच्या सल्ल्याने मूकनायक व्यवस्थित चालविण्यास सांगितले; परंतु भटकर मनस्वी आळशी. तशात वृत्तपत्र चालविण्याइतपत त्यांना मनस्वास्थ्यही नव्हते आणि त्यांच्या आळसामुळे कामही वेळेवर होत नसे. यासाठी व्यवस्थापक मंडळाने त्याच्याकडून संपादकीय सूत्रे काढून घेतली आणि बाबासाहेबांच्या सल्ल्यानुसार व्यवस्थापक म्हणून काम पाहणारे श्री. ज्ञा. ध्रु. घोलप यांच्याकडे मूकनायकच्या संपादकत्वाची जबाबदारी सोपवली. घोलपांचे मूळ गाव



सातारा जिल्ह्यातील सरूड सांगाव. इंग्रजी सहाव्या इयत्तेनंतर ते पोर्टट्रस्टमध्ये नोकरी करीत होते. त्यांना लेखन-वाचनाचे आणि समाजकार्याचे विलक्षण वेड होते. त्यामुळेच वृत्तपत्र चालविण्यासंबंधी बाबासाहेबांच्या घोलपांकडून काही रास्त अपेक्षाही होत्या; पण दुर्दैव असे की, संपादकत्वाची ही धुरा बाबासाहेब विलायतेहून परत येईपर्यंत घोलपांनाही सांभाळता आली नाही आणि मूकनायक योग्य व्यवस्थापनाअभावी बंद पडले. यासंदर्भात खेद व्यक्त करताना डॉ आंबेडकर लिहितात, राहिलेला अभ्यासक्रम पूर्ण करण्यासाठी मला विलायतेस जाणे भाग पडले. जाताना मूकनायकची सूत्रे एका तरुणाच्या हाती दिली. मला आशा होती की, परत आल्यावर सदरील वृत्तपत्र भरभराटीस आलेले आपल्या दृष्टीस पडेल; पण माझ्या कमनशिबाने ती आशा व्यर्थ ठरली, कारण परत येणारा निघण्यापूर्वीच मूकनायकला मूठमाती मिळाल्याची बातमी त्यास कळाली. (बहिष्कृत भारत, ३/४/१९२७)

**'मूकनायक': अंतरंग**

केवळ वैचारिक लेखनालाच प्राधान्य देण्यात आलेल्या; पण दुर्दैवाने अल्पजीवी ठरलेल्या आणि आज उपलब्ध असलेल्या मूकनायकमधून मात्र सुमारे बारा अग्रलेख, सात वैचारिक लेख, विविध विचार आणि क्षेमसमाचार या सदरात येणारे चोवीस स्फुटलेख, याशिवाय आमची हालचाल, कळावे की, कुशल प्रश्न, शेला पागोटे अशा सदरातून अठरा प्रासंगिक विचार, असे विपुल लेखन प्रसिद्ध झाले. कथा, कवितेसारख्या ललित लेखनाला मात्र केवळ डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या ध्येय धोरणानुसार मूकनायकमधून प्रसिद्धी मिळू शकली नाही. असे असले, तरी त्यामधून एकूण बत्तीस जाहिराती मात्र प्रसिद्ध झाल्या. 'श्री भक्त चोखामेळा चरित्र' आणि 'मेस्मेरिझम इंस्ट्रक्टर' या दोन पुस्तकांची जाहिरात वगळता, बाकीच्या सर्व शिवतरकर विमा पॉलिसी, माधवराव ब्रदर्स फर्निचर, गोदरेज मॅन्युफॅक्चरिंग कंपनी, लोकमान्य जोडे-पैजारा, रॉयल बूट आणि शूज, फेआनिक्स बायडिंग वर्क्सस अशा त्या व्यावसायिक स्वरूपाच्या होत्या.

'मूकनायक' सुरू झाल्यापासून डॉ. आंबेडकर ४ जुलै, १९२० पर्यंत भारतात होते, तोपर्यंतचे म्हणजे नंतर ते लंडनला जाईपर्यंतचे 'मूकनायक' मधील सर्व लेखन ते स्वत:च करीत होते. या दरम्यान दहा अंक प्रसिद्ध झाले. यामधील मनोगत, स्वराज्याची सर सुराज्याला नाही! हे स्वराज्य नव्हे, आमच्यावर राज्य, स्वराज्यातील आमचे

आरोहण, राष्ट्रातील पक्ष हे पाच अग्रलेख आणि स्वराज्याचे माता पिता, बुजतील म्हणून, मुसलमान ब्राह्मण झाले, टोणगे पान्हवतील काय?, यांचा ब्राह्मण वर्ण असावा खास, वैऱ्यांनी की हो नेला कैवारी, अपराध कोणता? द्वेष्ट्यांशी सहकार्य, मूळ शोधा मग वाद मिटेल हे विविध विचार मधील आठ स्फुटलेख डॉ.आंबेडकरांनीच लिहिले आहेत, हे त्यांच्या खास भाषा आणि लेखनशैली वरून आणि त्याच्या अभ्यास, विद्याव्यासंग, बहुश्रुतता, प्रकाड पांडित्य संत आणि पौराणिक संदर्भ देण्याच्या पद्धतीवरून सुस्पष्टपणे जाणवते. आज मूकनायकचे ४,७, ८ व ९ हे अंक उपलब्ध असते, तर त्यांचे आणखी चार अग्रलेख आणि किमान बारा स्फुटलेख अभ्यासावयास मिळाले असते.

डॉ. बाबासाहेबांचे अग्रलेख

'मूकनायक' चा पहिलाच अंक प्रसिद्ध करताना, या पाक्षिकाचे ब्रीद म्हणून डॉ. आंबेडकरांनी संत तुकारामांचा, 'काय करू आता धरुनिया भीड!

निःशंक हे तोंड वाजविले!!

नव्हे जगी कोणी मुकीयांचा जाण!

सार्थक लाजून नव्हे हित!!'

हा परखड अभंग हेतुत: स्वीकारला. आपल्या पहिल्याच अग्रलेखात, हिंदू समाजाचे वर्णन ते विषमतेचे माहेरघर असे करून, पुढे लिहितात, 'हिंदू समाज हा एक मनोरा आहे व एक एक जात म्हणजे त्याचा एक एक मजलाच होय; पण लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही आहे की, या मनोऱ्यास शिडी नाही आणि म्हणून एका मजल्यावरून दुसऱ्या मजल्यावर जाण्यास मार्ग नाही. ज्या मजल्यात ज्यानी जन्मावे, त्याच मजल्यावर त्यांनी मरावे. खालच्या मजल्यातला इसम, मग तो कितीही लायक असो, त्याला वरच्या मजल्यात प्रवेश नाही व वरच्या मजल्यातला माणूस, मग तो कितीही नालायक असो, त्याला खालच्या मजल्यात लोटून देण्याची कोणाची प्राज्ञा नाही' हा मनोरा सर्वांसाठी खुला करण्याचा प्रयत्न तत्कालीन विविध वृत्तपत्रांनी केला असला तरी, त्यामधून 'बहिष्कृतांच्या प्रश्नांचा सांगोपांग ऊहापोह होण्यास पुरेशी जागा मिळत नसल्याने, त्यांना एक स्वतंत्र पत्र पाहिजे, हे कोणीही मान्य करील. ही उणीव भरून काढण्यासाठी मूकनायक या पत्राचा जन्म' असल्याचे आंबेडकर सांगतात.

१९२० साली भारताला मिळावयाच्या स्वातंत्र्याविषयी देशभरात जोरदार चर्चा सुरू होती. याविषयीची आपली भूमिका मूकनायकमधील अग्रलेखांतून डॉ. आंबेडकरांनी हिरिरीने मांडली. आधी सुराज्य की आधी स्वराज्य या वादावर जेव्हा राष्ट्रातील विविध पक्षांत चर्चा सुरू झाली, तेव्हा प्रजापक्षात फूट पडू लागली. यामध्ये निर्भेळ स्वराज्य मागणारांचा कंपू जहाल बनला. 'प्रजा हीच राजा म्हणून तिच्या चैतन्याच्या दोरी तिच्याच हातात असाव्या असे ठोकून सांगणारा बलवत्तर प्रजापक्ष इंग्रजी परिचयाशिवाय उभा राहिला असे म्हणण्यास काही आधार दिसत नाही.' या पार्श्वभूमीवर स्वराज्याची संकल्पना मांडताना, डॉ. आंबेडकर म्हणतात, 'व्यक्तीच्या उन्नतावस्थेस अनुरूप अशी सामाजिक स्थिती घडवून आणण्यास दिलेले स्वातंत्र्य हीच खरी स्वराज्याची व्याख्या आहे.' 'राष्ट्रीय सभेच्या आद्य हेतूत आता बदल झालेला असून, तिला आता सुराज्य नको, कारण स्वराज्याची सर सुराज्याला नाही या नवीन तत्त्वाने तिच्यावर पगडा बसविला आहे. निव्वळ तत्त्वाला हरकत नाही; पण व्यावहारिकदृष्ट्या महत्त्वाचे आहे.' 'भारताला जर स्वराज्य मिळणार असेल, तर ते सुराज्य असावे, ते स्वराज्य कोणाचे व ते कशासाठी हे कळल्याखेरीज या तत्त्वाची री आम्ही तरी ओढू शकत नाही,' असेही ते ठणकावून सांगतात.

हिंदुस्थानचे भावी स्वातंत्र्य हे आमच्यासाठी स्वराज्य नव्हेच, कारण 'ज्या बहिष्कृत लोकांना समान नागरिकत्वाचे किमान हक्क नाकारले जाणार असतील आणि शिकल्यासवरल्यावरही जात लपविल्याखेरीज किंवा धर्मांतर केल्याखेरीज नोकरीचा सर्वसाधारण हक्क त्यांना मिळणार नसेल तर, हे तर आमच्यावर राज्य' असा ऊहापोह करून डॉ. आंबेडकर म्हणतात, 'इंग्रजी राज्यात ज्यांची बात सहन होत नव्हती त्यांची लात सोसावी लागणार! स्वकीयांच्या सामाजिक,आर्थिक आणि धार्मिक जुलुमाच्या आड यातलेले इंग्रजी सत्तेचे सुदर्शन लोपून स्वराज्याच्या वज्राचा आमच्यावर प्रत्यक्ष आघात होण्याची वेळ येणार! म्हणूनच आम्ही म्हणतो की, द्याल तर असे स्वराज्य द्या की, त्यात थोडेबहुत आमचेही राज्य आहे.' स्वराज्यातील आमचे आरोहण काय? याची मांडणी करताना ते म्हणतात, 'हिंदुस्थानातील भावी स्वराज्य

एकसत्तात्मक किंवा प्रजासत्तात्मक राज्य नसून प्रजा प्रतिनिधिसत्तात्मक राज्य होणार आहे; परंतु आमच्या वाट्यास येणारे प्रतिनिधी किती आहेत व ते कोणत्या पद्धतीने मिळणार हे निश्चित झाल्याखेरीज जातवार प्रतिनिधीनुरूप होणारे आरोहणापासून आमचे कल्याण होईल असे मानून घेण्यास आम्ही केव्हाही तयार होणार नाही.' तसेच 'स्वराज्यातील प्रतिनिधींच्या संख्येच्या प्रमाणाचा पाया जातींच्या परस्पर संख्येवरच उभारला पाहिजे. संख्येने जात मोठी असली; पण तिच्या गरजा जर फार नसतील, तर त्या जातीला संख्येच्या मानाने स्वतंत्र प्रतिनिधी देणे आमच्या मते जरूर नाही.' दलितांच्या न्याय्य हक्कापोटी मांडलेल्या डॉ. आंबेडकरांच्या या परखड विचारांचा अन्वयार्थ दुर्दैवाने तत्कालीन राजकारण्यांनी बाबासाहेब स्वातंत्र्याच्या विरोधात आहेत, असा लावला.

**डॉ. बाबासाहेबांचे स्फुटलेख**

दीनमित्र, जागरूक, डेक्कन रयत, विजयी मराठा, ज्ञानप्रकाश, सुबोधपत्रिका अशा काही तत्कालीन वृत्तपत्रांमधून अस्पृश्य समाजाच्या प्रश्नांची चर्चा होत असे. 'केसरी' मध्ये मात्र फारशी होत नसे. डॉ. आंबेडकरांनी आपल्या 'मूकनायक' ची जाहिरात मोफत करण्याची विनंती केसरीकारांना केली होती; परंतु ती त्यांनी धुडकावून लावली. त्यावर 'तुमचा आकार देतो, छापा' असे कळविल्यावर त्यांनी 'जागा नाही,' असे कळविले होते. तेव्हापासून केसरी आणि लोकमान्य टिळक यांच्याविषयी बाबासाहेबांच्या मनात अढी निर्माण झाली. ती त्यांच्या अनेक स्फुटलेखांमधून व्यक्त होताना दिसते. 'लो. टिळक हे स्वत:ला स्वराज्याचे मायबाप समजतात', स्वराज्य हा त्यांचा जन्मसिद्ध हक्क असला, तरी ब्रिटिशांच्या हातून ते हिसकावून घेणार का?, 'डेमोक्राट' या पत्राचा उद्देश सांगताना जो केसरीकारांनी लपंडाव केला आहे, तो चव्हाट्यावर आणण्यासारखा आहे, 'सक्तीचे शिक्षण करून मागासलेल्या व बहिष्कृत वर्गातील मुलांना साक्षर करण्यास आणि उत्पन्नाचा अपव्यय करण्यात काय हशील,असे केसरीकारांना वाटल्यास नवल नाही', चांभाराचा गणपती आपण गाडीत घेतला, असे भर सभेत सांगून, लो. टिळकांनी सर्वांस चपापून टाकले, लो. टिळकांनी पुण्यातील एका व्याख्यानात, 'ब्राह्मणेतरांत ऐक्याची भावना नाही असा अज्ञानपणाचा वाद लढविला आहे', अशी बाबासाहेबांची अनेक विधाने ही मुळाबरहुकूम तपासून पाहण्यासारखी आहेत. अस्पृश्यता निवारणासंबंधी जेव्हा ढोंगी कल्पना आणि विचार विविध पत्रांमधून छापून येत असत, तेव्हा बाबासाहेब त्यांचा मूकनायकमधून खरपूस समाचार घेत असत.

**पां. न. भटकर आणि ज्ञा. ध्रु. घोलप या संपादकद्वयाच्या कारकिर्दीतील 'मूकनायक' मधील लेखन.**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर लंडनला गेले आणि मूकनायकच्या संपादकत्वाची जबाबदारी भटकरांवर आली. या दरम्यान नागपूरची अखिल भारतीय बहिष्कृत समाज परिषद संपन्न झाली होती. तिचा सविस्तर विशेषांक निघाल्याने त्यामध्ये अग्रलेख लिहिण्याचा प्रश्नच नव्हता; पण पुढील दोन अंकातही ते लिहिले गेले नसावेत. त्यानंतर मात्र घोलप संपादक झाले आणि तेराव्या अंकापासून शेवटच्या एकोणिसाव्या अंकापर्यंत सलग काकगर्जना, सिंहप्रतिबिंब, दास्यावलोकन, मागून आलेले लोण पुढे पोचविणे, आमचा संदेश, उन्नतीचे साधन आणि हिंदी राष्ट्राची प्राणप्रतिष्ठा असे सात अग्रलेख प्रसिद्ध झाले. तसेच क्षेमसमाचार या सदराखाली शंकराचार्य की शर्कराचार्य, केसरीचा हुंदका, पण हे केव्हा?, छत्रपती आणि सामाजिक सुधारणा, हृदयस्फोट, पेशवाई पाताळीयंत्र, द्वेषाचा पारा, हेच ते गूढ, जाती वर्चस्वाचे डोहाळे, लोकमान्य म्हैस झाले, स्त्री शिक्षणासंबंधी मननीय उद्‌गार, आमची चळवळ, हे नाते कोणते?, बहिष्कृत मतदारांस इशारा, पिशाच्च भक्त, पेशवाईची पुनरावृत्ती आणि प्रेम की सूड असे एकूण सतरा स्फुटलेख प्रसिद्ध झाले.

**अग्रलेख**

३१ जुलै, १९२० च्या तेराव्या अंकात, सुरुवातीलाच, या अंकापासून मूकनायक पत्राची अंतर्व्यवस्था बदललेली आहे. तरी संपादकीय लेख व इतर सर्व पत्रव्यवहार हा रा. ज्ञानदेव ध्रुवनाथ घोलप यांचे नावे करावा, अशी सूचना करण्यात आली आहे. त्यामुळे उपरनिर्दिष्ट सर्व लेखन नामनिर्देश नसलेल्या विविध लेखकांनी केलेले दिसते. 'काकगर्जना' या पहिल्याच अग्रलेखात, 'बहिष्कृतांच्या उन्नतीस विरोध करणाऱ्या मूठभर ब्रह्मवृंदाच्या निरर्थक काकगर्जनेस न जुमानता छत्रपतींनी आपल्या सत्य आणि



अनुक्रमणिका

न्यायी चळवळींपासून रतीभरही ढळू नये', अशी छ. शाहू महाराजांना विनंती करण्यात आली आहे. 'सिंहप्रतिबिंब' लेखात, संपादकांनी 'आपण धनगरांच्या मेंढ्यांच्या कळपातील सिंहाप्रमाणे प्रत्यक्ष सिंह असून स्वत:ला मेंढरेच म्हणवून घेणार का?' असा बहिष्कृत लोकांना आव्हानात्मक प्रश्न विचारला आहे. तर 'दास्यावलोकन' या लेखात, दलितांच्या पूर्वापार शोषणाचा आढावा घेऊन, 'बहिष्कृताच्या घरी तापलेल्या दुधावरील मलई तुपाच्या रूपाने मुसलमान व्यापाराच्या मार्गाने गेली तरी पवित्र देवास स्नान घालून यांच्या (पुढारलेल्या बंधूंच्या) कोपर ओगळाने उदरभरात गेली तरी चालते; पण बहिष्कृतपणाची कीड काढण्याचे यांना धैर्य काही होत नाही,' अशी मल्लीनाथी करण्यात आली आहे. ही कीड काढण्यासाठी आपणच आता सज्ज झाले पाहिजे हे सांगताना, 'आमचा संदेश' या लेखात, 'हे बहिष्कृत तरुणा, अज्ञानरूपी निद्रेला सोडून, मी कोण? माझे खरे स्वरूप काय? माझा निसर्गदत्त परिस्थितीशी संबंध काय? सृष्टीने मला का उत्पन्न केले आहे? हल्ली माझी काय स्थिती आहे आणि पुढे काय होणार आहे? यांचा विलंब न करता आताच विचार करून आपल्या वरचा अन्याय दूर करण्यासाठी, नित्यश: होत असलेला अपमान त्यजण्यासाठी तयार हो!' असा आव्हानात्मक संदेश दिला आहे. तर 'उन्नतीचे साधन' या लेखात, 'ते साधन म्हणजे शिक्षण असून ते अधाशीपणे प्राशन करून, सुधारणेच्या चढाईत आपलाही नंबर वरतीच पटकावण्याची संधी व्यर्थ दवडू नये', असा सल्ला देण्यात आला आहे. शिक्षणासोबतच, 'नर करनी करेगा तो नारायण बन जायेगा,' ही म्हण सतत मनात ठेवून, सामर्थ्य आहे चळवळीचे, जो जो करील त्याचे,' या समर्थांच्या उपदेशाप्रमाणे वागण्याचा संदेश, 'हिंदी राष्ट्राची प्राणप्रतिष्ठा' या लेखात दिला आहे. या सर्व अग्रलेखांतून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारांचा संदेश सर्वदूर पोहचविण्याचा प्रयत्न केला आहे.

### स्फुटलेख आणि अन्य लेख

तत्कालीन महाराष्ट्रात अस्पृश्यता निवारणासाठी चाललेल्या चळवळी, आधी सामाजिक की आधी राजकीय सुधारणा, डिप्रेस्ड क्लास मिशन अंतर्गत सुरू असलेला दलितोद्धार सार्वजनिक पाणवठे, शाळा, मंदिरे येथे बहिष्कृत लोकांवर होणारे अत्याचार यासंबंधीच्या घडामोडी आणि वृत्तपत्रांमधून येणाऱ्या बातम्या यांवर आधारित अनेक स्फुटलेख मूकनायकमधून प्रसिद्ध होत असत. शंकराचार्य की शर्कराचार्य, जातिवर्चस्वाचे डोहाळे, पेशवाई पाताळीयंत्र, पेशवाईची पुनरावृत्ती, प्रेम की सूड?, केसरीचा हुंदका असे काही स्फुटलेख तपासून पाहण्यासारखे आहेत. परदेशात हिंदी बांधवांवर होणारे अत्याचाराला आळा घालण्यासाठी येथे समाजसुधारक सभा घेऊन, तेथे पायबंद घालू पाहतात; पण येथल्या बहिष्कृत लोकांचे काय?, दस्तुरखुद्द छ. शाहू महाराज बहिष्कृत लोकांना उन्नतीचे मार्ग उपलब्ध करून देत असताना, ब्रह्मवृंदांच्या पोटात का दुखते? असे प्रासंगिक विचार सदर स्फुटलेखांमधून मांडून, समाजधुरीणांना जाब विचारून, बहिष्कृत लोकांना जागृत करण्याचे काम मूकनायकच्या संपादकांनी पार पाडले.

मूकनायकमधून अन्य लेखकांनी लिहिलेले लेख हे पाक्षिकाच्या ध्येयधोरणांनुसारच होते. आधुनिक काळात हिंदुस्थानचा सामाजिक दर्जा (मु. ना. खंडकर), रिकामा न्हावी कुडाळला तुंबड्या लावी (बा. ग. भातनकर), अस्पृश्य बंधू आपल्या पायावर उभे राहतील काय? (कों. शि. सकट), ब्राह्मणांचा विचित्र सोवळेपणा (टोळके), असहकारिता आणि बहिष्कृत समाज (पोळके) असे मोजकेच पण ते नेमके होते. हिंदुस्थानातील जाती, धर्म, पंथ आणि येथल्या रूढीपरंपरांचा आढावा घेऊन, खंडकर म्हणतात, 'जगातील इतर राष्ट्रांमध्ये प्रगती फार झपाट्याने चालली आहे. ती दूर गेल्यावर हा देश अतिशय मागे राहील आणि हिंदुस्थानची स्थिती जगापुढे अगदी हीन दीन पशुवत अशी दिसेल... यांचा ज्याला आपल्या मातृभूमीची उन्नती व्हावी असे वाटत असेल त्याने विचार करणे बरे', तर कोंडिराम सकट आपल्या बांधवांना सांगतात, 'आमच्या दीनबंधूंनी डॉ. बुकर वॉशिंग्टनसारख्या थोर पुरुषांचे चरित्र मनन करून आपल्या ज्ञातीची ब्राह्मणशाहीपासून मुक्तता केली पाहिजे'. आगगाडी, स्टेशन, हॉटेल आदी सार्वजनिक ठिकाणी ब्राह्मणांचा सोवळेपणा कुठे जातो? असे विचारून श्री. पोळके त्यांना आवाहन करतात, की 'जर तुम्हाला राष्ट्रीय ऐक्याची जरुरी वाटत असेल, तर विलंब न लावता सहा कोटी प्रजेवरील अनिष्ट धार्मिक व सामाजिक बंधन नाहीसे करून, त्यांचेशी सहकारित्वाने

राष्ट्र कार्य साधण्यातच खरा धर्माभिमान व राष्ट्राभिमान आहे', पण त्यांचा अहंभाव आडवा येतो. त्यामुळे पोळके यांना अशा अहंभावींऐवजी ब्रिटिशच बरे, असे उद्वेगातून सांगताना लिहितात, 'बहिष्कृतांनी आपल्या मायबाप सरकाराशी विरोध करणे म्हणजे अतिनीच कृत्य आहे. असे समजून पुढे सरकारला ज्या ज्या अडचणी येतील. त्या त्या वेळी आपले क्षात्रतेज दाखवून ब्राह्मण बनियाना पळता भुई थोडी करून टाकली पाहिजे.'. 'मूकनायक' मधील हे सर्व अग्रलेख. स्फुटलेख आणि अन्य लेखकांनी लिहिलेले लेख म्हणजे तत्कालीन समाजातील अस्पृश्योद्धार चळवळीचे आणि त्यानिमित्तच्या घडामोडींचे स्वच्छ प्रतिबिंब आहेत.

**'मूकनायक' मधील अन्य सदरे.**

दलितांच्या व्यथा, वेदना आणि समस्याचे चित्रण करणारी इतरही अनेक सदरे मूकनायकची वैशिष्ट्ये होती. आमची हालचाल, आमची जखम. कुशल प्रश्न, काठीचे सपाटे (वेसकर), कळावे की, शेला पागोटे (जावई), पत्रव्यवहार, वर्तमानसार, मननीय उद्गार, निवडक पत्रातील उतारे अशी त्यांची नावे होती. महाराष्ट्रातील बहिष्कृत समाजातील घडामोडी, अन्यायकारक घटना, चळवळीविषयक सभा, परिषदा, यासंबंधीचे लेखन सदर सदरांतून प्रसिद्ध होत असे. शिवाय अस्पृश्येतर समाजसुधारक आणि त्यांच्या दलितांच्या उद्धारासाठी केलेल्या प्रयत्नांची, त्यातील ढोंगी आणि फोलपणा यांचीही दखल या सदरातून घेतली जात असे. विविध वृत्तपत्रांनी दलितविषयक दिलेल्या बातम्या, लेख, टिपणे, सभा परिषदा यांचा गोषवारा याविषयीची खुलेआम चर्चा, खरपूस समाचार असेही त्यांचे स्वरूप होते. यांपैकी पाठीचे सपाटे आणि शेला पागोटे ही दोन सदरे परखडता आणि विडंबनात्मकता यासाठी संस्मरणीय होती.

**समारोप**

अस्पृश्योद्धार चळवळीतील मूकनायकचे योगदान, फलश्रुती आणि यशस्वीता आज ३१ जानेवारी, २०२० रोजी शंभर वर्षांनंतर तपासून पाहायची असेल, तर या पाक्षिकाचे फक्त सहावा आणि दहावा हे दोन अंक प्रत्यक्षच अभ्यासावयास हवेत. २१ व २२ मार्च, १९२० रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली मु. माणगाव, कागल संस्थान येथे 'दक्षिण महाराष्ट्रातील बहिष्कृत वर्गाची पहिली परिषद' संपन्न झाली. या परिषदेस स्वत: छत्रपती शाहू महाराज उपस्थित होते. ते म्हणाले, 'मी डॉक्टर आंबेडकरांचे भाषण ऐकण्यासाठी आलो आहे.' यावेळी त्यांनी केलेल्या उत्स्फूर्त भाषणातून दलितांविषयीची कणव आणि त्यांच्या उन्नतीसाठी केलेले सकल्प महनीय होते. तर बाबासाहेबांचे पहिल्या दिवशीचे भाषण बहिष्कृत लोकांना दिग्दर्शन करणारे होते. दि. ३०, ३१मे आणि १ जून, १९२० या तीन दिवशी राजर्षी छत्रपती शाहू महाराज यांच्या अध्यक्षतेखाली नागपूर येथे पहिली 'अखिल भारतीय बहिष्कृत समाज परिषद' संपन्न झाली. या परिषदेत छत्रपतींचे जे प्रदीर्घ. मुद्देसूद, बहिष्कृत लोकांचे मन हेलावून टाकणारे आणि त्यांच्या आशा पल्लवीत करणारे भाषण वाचण्यात आले, ते जसेच्या तसे दहाव्या अंकात प्रकाशित करण्यात आले आहे. या परिषदेत डॉ. आंबेडकरांनी केलेले मार्गदर्शन, परिषदेची भूमिका आणि कर्तव्य याविषयी केलेले मुक्तचिंतन तसेच या परिषदेत पारित करण्यात आलेले ठराव मुळाबरहुकूम मूकनायकमध्ये पाहावयास मिळते. हे दोन्ही अंक आज मौलिकच आहेत.

राजकीय स्वातंत्र्य आणि सामाजिक स्वातंत्र्य या दृष्टिकोनातून विचार करणाऱ्या 'मूकनायक' मधील लेखनाने टिळकांचा केसरी आणि आगरकरांच्या सुधारक यांमधील लेखनाच्या बरोबरीची झेप घेण्याचा प्रयत्न केलेला आहे. विचारजागृतीची बीजे तत्कालीन दलितांच्या मनात रुजवून त्यांना अन्याय-अत्याचाराविरुद्ध बंड पुकारण्यास 'मूकनायक'ने शिकवले.

संदर्भ:

. मून वसंत (संपादन), डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे बहिष्कृत भारत आणि मूकनायक, शिक्षण विभाग, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई. नोव्हेंबर, .

. निर्मळे हरिश्चंद्र. दलितांची नियतकालिके, सुगावा प्रकाशन, पुणे, जानेवारी, .

❖❖

डॉ. हरिश्चंद्र निर्मळे
मोबा. ७७०९८१७७१०.



अनुक्रमणिका







महाराष्ट्राचे पहिले मुख्यमंत्री
माजी उपपंतप्रधान आणि विचारवंत
मा. यशवंतराव चव्हाण यांच्या
भाषणांमधून प्रत्ययास येणाऱ्या
वाङ्मयीन गुणवतेवर भाष्य

# यशवंतराव चव्हाण यांच्या भाषणांची वाङ्मयीन गुणवता



"कुठलाही महाकवी किंवा कुठलाही कवी, निव्वळ शब्दांचा जुळारी होऊन कवी होऊ शकत नाही. नादमाधुर्य म्हणजे काव्य, असे आपणाला म्हणता येणार नाही. आपल्या मराठी वाङ्मयामध्येही असा एक काळ होता की, ज्यावेळी शब्दलालित्य म्हणजे साहित्य असे समजून अशा साहित्यामागे लोक धाव घेत; परंतु निव्वळ नादमाधुर्यातूनच निर्माण होणाऱ्या काव्यात जनतेचे मन काबीज करण्याचे सामर्थ्य येऊ शकत नाही. त्या जुळणाऱ्या सुंदर नादमधुर शब्दांच्या पाठीमागे एक नवा सामर्थ्यवान संदेश देणारे मन आणि विचार असल्याशिवाय कवी किंवा महाकवी निर्माण होऊ शकत नाहीत."

प्रा. भास्कर ढोके

हे कुठल्याही समीक्षक किंवा साहित्याच्या अभ्यासकाचे वाक्य नाही तर यशवंतराव चव्हाण यांनी आपल्या भाषणातून साहित्याविषयी मांडलेला एक विचार आहे. नवतेचा विचार आहे. या चिंतनात्मक विचारामधून कवितेविषयीची त्यांची जाण व्यक्त होताना दिसते.

यशवंतराव चव्हाण यांनी शेकडो भाषणे दिली आहेत. त्यातील अनेक भाषणे उत्कृष्ट ललित आणि वैचारिक निबंधांच्या दर्जाची आहेत. या भाषणांचे विश्लेषण करायला सुरुवात केली असता त्यातील वाङ्मयीन गुणवत्तेची जाणीव होऊ लागते. या भाषणांमधून केवळ लालित्याचा प्रत्यय येत नाही, तर वाङ्मयविषयक चिंतन, साहित्याविषयी प्रगल्भ जाण आणि साहित्याविषयी ठाम मते निदर्शनास येतात. भाषेविषयीची त्यांची मतेही व्यक्त होतात. उदा. आपल्या एका भाषणात ते म्हणतात की, 'माझ्या मते "भाषांतरीत" भाषा फारशी चांगली नसते. जमिनीतले पाणी, जमिनीतली सत्त्वे आणि जमिनीत इतर जी काही शक्ती असेल, ती घेऊन पिऊन जमिनीतून ऊस जसजसा वाढत जातो तशी भाषा ही जिवंत असली पाहिजे. मराठी भाषेने मराठी मनाचा कस घेऊनच वाढले पाहिजे. तरच खऱ्या अर्थाने मराठी भाषा वाढेल. अधिकाधिक उत्कर्ष पावेल.'

जगभरातील भाषाशास्त्रज्ञ भाषेविषयीचे जे चिंतन सतत



अनुक्रमणिका

व्यक्त करत असतात, भाषांतर मीमांसा करीत असतात तोच विचार यशवंतराव किती सहजपणे व्यक्त करतात. मातृभाषेविषयीच्या प्रेमाबरोबरच भाषिक चिंतनही व्यक्त करतात, आणि भाषेविषयीचा हा विचार सहजपणे आपल्या भाषणांमधून व्यक्तही करतात. यशवंतरावांची भाषा जमिनीतील कस घेऊनच तयार झालेली होती. त्यात अस्सल मातीचा रंग आणि समाजाचा गंधही होता. चंद्रभागा नदीवर उजनी धरण बांधण्यात आले त्या वेळेस आपल्या भाषणात यशवंतराव म्हणाले, ''पंढरीच्या विठ्ठलाच्या परिसरात त्याच्या पंचक्रोशीत आज मोठ्या आनंदाने आलो आहे. येताना मी विठ्ठलाला म्हणालो चंद्रभागा तुझ्या अंगणात पोहोचण्यापूर्वीच आज आम्ही तिला अडवली आहे. तिला आम्ही आज साकडे घातले आहे. तुझ्या चरणांजवळ ही चंद्रभागा अठ्ठावीस युगं वाहत आली. या चंद्रभागेला उजनीजवळ आज आम्ही थाबवित आहोत. महाराष्ट्रातील शेतकरी दरसाल आषाढी-कार्तिकी एकादशीला खांद्यावर पडशी टाकून ''ग्यानबा तुकाराम'' म्हणत तुझ्या दाराशी येत असतो. त्या ग्यानबा तुकारामाच्या शेतीत आणि झोपडीत विठ्ठला आता तू जा. तिथे तुझ्या चंद्रभागेला तू भेट. जनाबाईच्या मदतीला तू धावून गेलास आणि तुझी मनापासून भक्ती करणाऱ्या तुझ्या सगळ्या भक्तांच्या मदतीलाही तू धावून गेलास, तशीच तुझी भक्ती करणाऱ्या आणि महाराष्ट्राच्या झोपडीत राहणाऱ्या गरीब शेतकऱ्याने आज तुझी चंद्रभागा अडविली आहे. त्यांच्या कल्याणासाठी, त्यांच्या मदतीसाठी 'विठ्ठला, तू त्यांच्या शेतीत जा.'' तू आता पंढरपूरच्या मंदिरात राहू नकोस. विठ्ठलाला मीही मनोभावे प्रार्थना केली आहे; पण कृपा करून आपण हे मात्र लक्षात ठेवा की, निव्वळ प्रार्थनेने हे सर्व घडणार नाही. त्याकरिता तुम्हाला कष्टाची गंगा आणावी लागणार आहे. त्यासाठी जिद्दीने काम करण्याचा आपण निश्चय करू या.''

या भाषणातून यशवंतरावांची नाळ वारकरी संप्रदायाशी केवळ जोडलेली होती असे नाही तर कर्मवादही त्यांना नीट कळलेला होता हेच दिसते. महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांतून पंढरीच्या विठ्ठलाच्या भेटीस येणारा हा सामान्य वारकरी मुळात शेतकरी आहे आणि तो गरीब आहे. त्याचे कल्याण करण्याचा महत्त्वाचा विचार या भाषणात आहे. वारकऱ्यांनी आपल्या कृतीतून कर्मवादाचा धडा घालून दिलेला आहे.

कांदामुळाभाजी
अवघी विठाबाई माझी

असे म्हणणारा सावता माळी असो की,

'आम्ही वारीक वारीक वारीक
करतो केस बारीक बारीक बारीक'

असे म्हणणारा सेना न्हावी. हे आपले निद्धीत कर्म पार पाडतानाच परमेश्वराची सेवा करतात. हा कर्मवाद पुढेही आपल्याला मराठी साहित्य परंपरेतून सतत व्यक्त होताना दिसतो. विठ्ठल वाघांपासून नारायण सुमंतापर्यंत अनेक कवींनी आपल्या कवितेतून पंढरपूरच्या विठोबा शेतातून,पिकातून शेतकऱ्यांच्या घामातून पाण्याच्या दांडातून भेटल्याचे म्हटले आहे. यशवंतराव तीच परंपरा जोपासताना दिसतात. त्यांना सामान्य शेतकऱ्यांमध्ये ग्यानबा तुकाराम दिसतो आणि म्हणूनच वारकऱ्यांच्या सलगीने ते विठ्ठलाला ग्यानबा तुकारामाच्या शेतीत आणि झोपडीत जाऊन चंद्रभागेला भेटण्याचा सल्ला देतात.

एका महाकाय धरणाच्या उभारणी प्रसंगी असे नम्रतेचे भाषण सामान्यजनांविषयी कळवळा आणि उच्च कोटीची प्रतिभा असल्याशिवाय कसे शक्य आहे? यशवंतराव राजकारणात वावरत होते, आणि त्या निमित्ताने सतत चिंतन करत होते. त्या चिंतनातूनच त्यांची साहित्य आणि संस्कृतीविषयीची विशिष्ट धारणा तयार झाली होती. शेवटी साहित्य असो अथवा संस्कृती किंवा राजकारण या सगळ्याचाच संबंध असतो माणसाशी. ज्याला माणूस कळतो तोच चांगले साहित्य निर्माण करू शकतो. राष्ट्राची खरी ओळख कशात सामावलेली आहे हे त्यांना माहीत होते. म्हणूनच ते म्हणतात की, देशातील लेखक, देशातील विचारवंत, देशातील कलावंत, शास्त्रज्ञ आणि संशोधक यांच्या प्रयत्नाने निर्माण होणारे जे विचारधन आहे, ते खरे म्हणजे समाजाचे फार मोठे धन आहे, असे मी मानतो. ते असले म्हणजे देश ओळखला जातो; समाजाचे जीवन प्रवाही राहते. समाज जिवंत राहतो तो त्याच्याजवळ असणाऱ्या नैतिक सामर्थ्याने नाही, तर त्याच्याजवळ असणाऱ्या सांस्कृतिक मूल्यांवर व विचारधनांवर.'

यशवंतराव चव्हाणांच्या भाषणांमधून आपल्याला त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा अंदाज घेता येतो तसाच त्यांच्या विचारसरणीचाही. त्यांच्या भाषणांमधून त्यांची नाळ ज्याप्रमाणे वारकरी परंपरेशी जोडलेली दिसते तशीच ती प्रबोधनाच्या परंपरेतील आहे हेही दिसते. त्यांच्या



अनुक्रमणिका

भाषणांमधून हा वारसाही दिसतो. भारतीय समाजाच्या मागासलेपणाची चिकित्सा करताना ते म्हणतात, ''आम्ही आमच्यामध्ये नाना तऱ्हेच्या सामाजिक भेदाभेदांची मोठी थोरली उतरंड रचली म्हणून हिंदुस्थान दुबळा झाला. हिंदुस्थानाचा दुबळेपणा, हिंदुस्थानाचा मागासलेपणा हा या उतरंडीचा परिणाम आहे, असे माझे स्पष्ट मत आहे. आम्ही खूप खटपट करतो आहोत. आर्थिक क्रांती करावयाची, औद्योगिक क्रांती करावयाची, हातात आलेल्या मोठ्या थोरल्या स्वातंत्र्याच्या शक्तीचा लोकशाहीच्या सत्तेचा वापर करावयाचा प्रयत्न चालला आहे; पण गाडा अजूनही काही फार पुढे जात नाही. याचे कारण समाजातील ही उतरंड आहे. उतरंड हा शब्द मी मुद्दामच वापरीत आहे. समाजामध्ये आम्ही ही जी उच्च-नीचतेची, जातिभेदाची, वर्णभेदांची उतरंड रचलेली आहे, ती केवळ एकाच प्रांतात रचलेली नसून सर्व हिंदुस्थानभर रचलेली आहे. ही उतरंड मांडण्याचे काम ज्या दिवशी आपण करू त्या दिवशी आपण खरी क्रांती केली, असे मी म्हणेन.''

भारतात असलेल्या या जातींच्या उतरंडीने देशाचे मोठे नुकसान केले असल्याची खंत ते अनेक ठिकाणी व्यक्त करतात. भारतातील जातिभेदाची वस्तुस्थिती मांडताना सहजतेने तुकाराम, नामदेव, ज्ञानेश्वर, चोखामेळा, गोरा कुंभार, सावता माळी यांचे संदर्भ देतात. त्यांच्यामते असा संतमेळा ज्या समाजात अस्तित्वात आला तेथे सामाजिक क्रांतीच व्हायला हवी; पण दुर्दैवाने संतांची वाटणी आपण कुंभार माळी, न्हावी, सोनार, शिंपी या जातींमध्ये करून टाकली. आपल्या प्रवृत्तीवर बोट ठेवताना ते कुसुमाग्रजांप्रमाणेच भावना व्यक्त करतात. कुसुमाग्रजांच्या पुतळा या कवितेचे गद्यरूपच यशवंतरावांच्या भाषणात दिसते. ते म्हणतात, ''ज्योतिबा फुल्यांनी सामाजिक क्रांतीचा संदेश दिला. त्या संदेशातून डॉ. आंबेडकर याच्यासारखी कर्तृत्वावान, धगधगती माणसे निर्माण झाली. एक मोठी शक्ती निर्माण झाली; पण महात्मा फुले फक्त माळ्यांचे. डॉ. आंबेडकर महारांचे, शिवाजी महाराज फक्त मराठ्यांचे अशा प्रकारे जर आम्ही या महापुरुषांच्या वाटण्या केल्या, तर या हिंदुस्थानमध्ये सामाजिक क्रांती कधीच होणार नाही. महाराष्ट्रातील बहुसंख्य वस्ती खेड्यात आहे आणि त्यात मराठा समाज बहुसंख्येने आहे. जास्त असल्याने महार-

**''ज्योतिवा फुल्यांनी सामाजिक क्रांतीचा संदेश दिला. त्या संदेशातून डॉ. आंबेडकर यांच्यासारखी कर्तृत्वावान, धगधगती माणसे निर्माण झाली. एक मोठी शक्ती निर्माण झाली; पण महात्मा फुले फक्त माळ्यांचे. डॉ. आंवेडकर महारांचे, शिवाजी महाराज फक्त मराठ्यांचे अशा प्रकारे जर आम्ही या महापुरुषांच्या वाटण्या केल्या, तर या हिंदुस्थानमध्ये सामाजिक क्रांती कधीच होणार नाही. महाराष्ट्रातील बहुसंख्य वस्ती खेड्यात आहे आणि त्यात मराठा समाज बहुसंख्येने आहे. जास्त असल्याने महार-चांभार-ब्राह्मण-सुतार-माळी इत्यादी अल्पसंख्य लोकांचे रक्षण करण्याची जवाबदारी मराठ्यांवर आहे,''**

चांभार-ब्राह्मण-सुतार-माळी इत्यादी अल्पसंख्य लोकांचे रक्षण करण्याची जबाबदारी मराठ्यांवर आहे,'' अशी त्यांची धारणा होती. त्यातूनच मराठ्यांचे राज्य म्हणजे 'मराठा' जातीचे नव्हे तर एकसंध मराठी समाजाचे, असे त्यांना अभिप्रेत होते. 'मराठा' हा जातिवाचक नाही. आचार्य अत्र्यांनी आपल्या वर्तमानपत्रात 'मराठा' शब्दामागे महाराष्ट्राच्या एकजिनसी जीवनाची भावना आहे. 'मराठा' शब्दाचा हाच अर्थ आम्हाला अभिप्रेत आहे आणि म्हणून मराठी राज्य हे कोणा एका जमातीचे राज्य मुळीच होता कामा नये. या गोष्टीवर माझा जरूर विश्वास आहे.'' असे विचार आपल्या भाषणांमधून मांडत त्यांनी प्रबोधनाची परंपरा रुजविण्याचा प्रयत्न केला.

प्रबोधनाची परंपरा रुजवीत असतानाच यशवंतराव जीवनाच्या वेगवेगळ्या समस्यांची चिंता वाहात होते. चिंतन करीत होते. कुठल्याही समाजाची ओळख ही त्या समाजाच्या साहित्य संस्कृती मध्ये दडलेली असते आणि साहित्याचा आणि संस्कृतीचा त्या समाजाच्या भाषेशी जवळचा संबंध असतो. भाषा हेच समाजाच्या आविष्काराचे माध्यम असते. यशवंतरावांनी भाषेविषयी

मूलभूत चिंतन केले होते. त्यांच्या वेगवेगळ्या भाषणांमधून त्याचे प्रत्यंतर येते. 'राज्य मोठे असो अगर लहान असो, त्या त्या राज्यात राहणाऱ्या लोकांची जी भाषा असेल तिचा तिथल्या शासनाचे, शिक्षणाचे व दैनंदिन व्यवहाराचे माध्यम म्हणून स्वीकार झाला नाही, तर लोकशाही शासन हे केवळ नावापुरतेच लोकशाही शासन राहील. लोकशाहीचा आत्माच ते हरवून बसलेले असेल कारण जनतेची इच्छा हा लोकशाहीचा मूळ आधार असल्यामुळे लोकांच्या इच्छा, त्यांच्या आकांक्षा यांना प्रकट रूप देण्याचा भार त्यांच्या भावनेनेच वाहिला पाहिजे ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे.

मराठवाडा विद्यापीठाच्या पदवीदान समारंभातील आपल्या भाषणात मराठी भाषेच्या विकासाविषयी बोलताना व्यक्त केलेले विचार उद्‌बोधक आहेत. ''मराठी भाषेचा विकास हा महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीचा एक स्वाभाविक परिपाक होय. शिक्षणाचे माध्यम व राष्ट्रभाषेचा दर्जा तिला आता प्राप्त होत आहे. कै. माधव ज्युलियनांनी आपल्या एका काव्यात आशा व्यक्त केल्याप्रमाणे आपल्या मायबोलीला आज दिव्य सुखाचे दिवस लाभत आहेत.'' मराठी भाषेच्या विकासाची चिंता वाहतानाच ते जगाचे भानही विसरत नाहीत म्हणून पुढे ते म्हणतात, ''अर्थात मराठीच्या अभ्यासाबरोबर राष्ट्रभाषा म्हणून हिंदी सर्व भाषांची मायभाषा व आपल्या प्राचीन संस्कृतीची भाषा म्हणून संस्कृत व आंतरराष्ट्रीय व्यवहाराची भाषा म्हणून इंग्रजी या भाषांचाही अभ्यास करणे आपल्याला आवश्यक आहे.

''भाषेचा विकास केवळ ललित भाषेच्या संदर्भातच होत नाही. तर निरनिराळ्या वैज्ञानिक शास्त्रांचा आविष्कार भाषेतून झाला तरच खरा आणि साहित्य व्यवहाराशिवाय इतिहास, विज्ञान, तत्त्वज्ञान, तंत्रज्ञान इत्यादी सर्वच क्षेत्रांत मराठीच्या वापराला चालना मिळाली पाहिजे.'' अशी अपेक्षाही व्यक्त करतात. विदर्भ साहित्य संमेलनाच्या उद्‌घाटनाच्या भाषणात त्यांनी व्यक्त केलेले विचार फारच मौल्यवान आहेत. ''मराठी भाषिक राज्याचे माझ्या मनात चित्र काढण्याचा जेव्हा मी प्रयत्न करतो तेव्हा मराठी जनता राज्यसिंहासनावर येऊन बसली आहे, असे चित्र उभे राहण्याऐवजी या सिंहासनावर मराठी भाषा विराजमान झाली आहे असेच चित्र माझ्या मनात चितारले जाते.. राज्यभाषेचा दर्जा जेव्हा भाषेला प्राप्त होतो तेव्हा लोकजीवन समृद्ध करण्याचे एक महत्त्वाचे साधन म्हणून आपण त्या भाषेकडे पाहत असतो. आपण जाणतोच की, वेगवेगळी राज्यं झाल्यानंतर ज्ञानाच्या सर्व क्षेत्रांतील विचारांची संपदा तिने मराठी जीवनात आणली पाहिजे ही जिम्मेदारी तिच्यावर आहे. त्याकरिता मराठी भाषा ही अधिक विचारप्रवाही झाली पाहिजे.''

भाषेविषयी एवढी प्रगल्भ जाणीव दाखविणारा विचार हा म्हणूनच अत्यंत सशक्त विचार मानला पाहिजे. महाराष्ट्रातील विचारवंतांनी आपल्या वैचारिक निबंधांतून भाषाविषयक चिंतनातून आणि समीक्षात्मक लेखनातून जेवढा भाषा विचार मांडला असेल तेवढाच प्रभावी भाषा विचार यशवंतरावांनीही मांडला आहे.

आपल्या भाषणांमधून त्यांनी वेळोवेळी आपल्या साहित्यविषयक धारणाही व्यक्त केलेल्या आहेत. ते विचार प्रासंगिक असले तरी त्यातून त्याचे साहित्यविषयक चिंतन आणि विचार व्यक्त झाल्याशिवाय राहात नाही, आणि या विचारांतून ते साहित्याकडे जीवनवादी भूमिकेतून पाहतात. त्यांना साहित्याचा मानवी चेहरा जास्त महत्त्वाचा वाटत होता हे स्पष्ट होते. उदा. साहित्यिकांची जबाबदारी या आपल्या भाषणात ते म्हणतात, ''साहित्याची अंतिम प्रेरणा मानवी मूल्यांची जाणीव करून देणारी असली पाहिजे. रशियातील कादंबरीकार आणि अमेरिकेतील कादंबरीकार यांच्या कादंबऱ्यांतील नावे बदलतील, त्यातील सृष्टिसौंदर्याची स्थळे बदलतील. त्यातील लेखन तंतूही कदाचित वेगवेगळे असतील; परंतु मानवी मनाचे त्यात जे पृथक्करण केलेले असते, भावनांचा त्यात जो प्रत्यय असतो हीच वाङ्‌मयाची आपण शेवटची कसोटी मानली, तर मानवी मूल्यांची किंवा मानवी गुणांची वाढ करणे हे आम्ही आमचे साध्य मानले पाहिजे.

संदर्भ


१) सह्याद्रीचे वारे –यशवंतराव चव्हाण, यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान, मुंबई. आवृत्ती चौथी, २०१२ मार्चरकर

२) यशोधन – विनायक पाटील


❖❖


**प्रा. भास्कर ढोके**

चलभाष :- ९४२३०८१०४६

ई-मेलः Bhaskar112@gmail.com





अनुक्रमणिका

# आत्मशोधातून सत्यशोधाकडे जाणारी कादंबरी

रंगनाथ पठारे यांच्या 'सातपाटील कुलवृतांत' ह्या कादंबरीविषयी भाष्य करणारा समीक्षा लेख.

■■ राजीव जोशी



'कस्त्वं कोऽहंकुत आयातः" असा प्रश्न आद्य शंकराचार्यांनी चर्पटपंजरीमध्ये विचारलेला होता. मात्र ऋग्वेदकाळापासूनच 'मी कोण?' असे मूलभूत प्रश्न माणसाला पडत आलेले आहेत. सांगायचं कारण, शब्दालय प्रकाशनाने अलीकडेच प्रकाशित केलेली सुप्रसिद्ध लेखक श्री. रंगनाथ पठारे यांची सातपाटील कुलवृत्तांत ही महत्तम कादबरी.

गेल्या साठ वर्षांपासून- मग कथा असो वा कादंबरी- निष्ठा, व्रतस्थता आणि सातत्याने स्वत.मधील घालमेल वाचकांच्या आतआत आवर्तात घेऊन जाण्याच्या लेखन सिद्धीतून श्री. रंगनाथ पठारे यांनी सातपाटील कुलवृत्तांत ही सातशे शहाण्णव पानांची महत्तम कादंबरी सिद्ध केलेली आहे. मी कोण? म्हणून पडलेला प्रश्न घेऊन लेखक सात पिढ्या, सातशे वर्षे एवढ्या मोठ्या अतीताच्या गुहेत शिरलेला आहे. कालखंडाचा आवाका भव्य, अवकाशही मोठा आहे. प्रत्येक कालखंडाच्या सुरुवातीलाच तत्कालीन सामाजिक, राजकीय व ऐतिहासिक पार्श्वभूमी, वाचकांच्या सोयीसाठी देणं हे कादंबरीचं वेगळेपण आहे. यातलं समग्र सर्वांगीण आकलन आणि अनुभवाचे संश्लेषण यातून समकालीन जीवनाचा इतिहास, अक्षांशरेखांश, भाषा, राज्यव्यवहार, समाजशास्त्र, अर्थकारण, मानवी आशा-आकांक्षा तसेच मागणी-पुरवठ्यावर आधारित समकालीन शेतीकारण, जीवनसंघर्ष या सर्वांना एकत्रित घेऊन लेखकाने मांडलेला हा शोध विलक्षण प्रवाही झालेला आहे. अलीकडेच सुप्रसिद्ध कवीमित्र सौमित्र- श्री. किशोर कदम यांनी घेतलेल्या मुलाखतीत श्री. पठारे यांनी या कादंबरीच्या लेखन प्रवासाचे अनेक पैलू उलगडले. वीस वर्षे कादंबरीने पछाडणं, त्याच्या तपशीलवार अभ्यास आणि लेखन प्रक्रियेतून कादंबरीचा प्रवास उलगडण हा मुद्दा एक कादंबरी लेखनाचा धडा होता.

कथाकार, कादंबरीकार, समीक्षक आणि विचारवंत म्हणून गेली साठ वर्षे श्री. रंगनाथ पठारे लेखन करीत आलेले आहेत. मराठी साहित्य क्षेत्रात त्यांनी आपलं वेगळं



अनुक्रमणिका

स्थान निर्माण केलंय. त्यांची जवळपास चाळीसहून अधिक पुस्तकं प्रकाशित झालेली आहे. 'ताम्रपट' या कादंबरीने वाचक, समीक्षक आदिंचे लक्ष वेधून लोकप्रियता मिळवलेली आहे. कादंबरीकार म्हणून 'दिवे गेलेले दिवस' ही श्री. पठारे यांची पहिली कादंबरी १९६२ मध्ये प्रकाशित झाली. त्यानंतर रथ, चक्रव्यूह, हरीण टोकदार सावलीचे वर्तमान, ताम्रपट, दुःखाचे श्वापद, नामुष्कीचे स्वगत, कुंठेचा लोलक, भर चौकातील अरण्यरूदन, एका आरंभाचे प्रास्ताविक, चोषक फलोद्यान अशा एकूण दहा कादंबऱ्यांनंतर कुलवृत्तांत संकल्पनेचा अनोख्या रूपबंधाच्या माध्यमातून आपल्या मराठा कुटुंबाच्या मागील सात पिढ्या व कुळाचा शोध घेत घेत, मराठा कुटुंबाचं पिढ्यापिढ्यांचं जगणं सांगत एकूणच महाराष्ट्रीय समाजाचं तत्कालीन सामाजिक-आर्थिक वास्तव मांडणारी सातपाटील कुलवृत्तांत ही या शतकातली महत्तम ठरावी अशी कादंबरी आहे.

असं म्हणतात, की समाजाच्या अंतःस्तरावर प्रचलित सामाजिक, सांस्कृतिक जाणिवांच्या पार्श्वभूमीवर प्रत्येक काळात बदलत जाणाऱ्या सामाजिक धारणांचा शोध कादंबरीत अपेक्षित असतो. कुठल्याही क्षणापासून मागं वळून पाहणं स्वतःच्या पुढे जाण्यासाठी आवश्यक असतं. विज्ञान तर वनस्पती, जनुकं, सूर्यमालेची, पृथ्वीची उत्पत्ती इतक्या मागे जाऊन माणसाचा आणि सर्वांगीण जीवनसृष्टीचा शोध घेतच असतं. याचं कारण मागे गेल्यामुळेच आजच्या माणसाची शारीरिक, मानसशास्त्रीय जडणघडण तपासता येते. घटना आणि घटितांचे अर्थ, अन्वयार्थ लावता येतात. कुलवृत्तांत म्हणजे पिढ्यांचा विस्तृत वांशिक पट; पण सातपाटील कुलवृत्तांत ही केवळ माणसांची, माणसांच्या पूर्वजांची, भूतकाळात घडलेल्या घटना व त्याच्या कार्यकारणभावांची जंत्री नाही तर त्या त्या पिढ्यांमध्ये अस्तित्वात असलेली कृषिकेंद्रित मूल्यव्यवस्था, ऐतिहासिक ऐवज, तत्कालीन सांस्कृतिक पर्यावरणात माणसामाणसातील नातेसंबंध, भाषिक व्यवस्था, सामाजिक वास्तव, कुटुंब पर्यावरण आणि पर्यायाने त्या पर्यावरणातलं स्त्रीचे स्थान जाणून घेण्याचा, त्याचा वर्तमानाशी अन्वयार्थ लावण्याचा प्रयत्न आहे. त्यामुळे वांशिक शोध घेणारी सातपाटील कुलवृत्तांत ही कादंबरी जशी कुळाची शोधकथा आहे त्याचबरोबर काळाच्या गुहेत शिरून घेतलेला स्वतःचा, समाजाचा आणि त्यानिमित्ताने एकूणच मराठी समाजाचा सत्त्वशोधही आहे.

सातपाटील कुळातला सध्याचा वंशज देवनाथ या कादंबरीचा लेखक आहे. शिकलेला आहे. संवेदनशील आहे. आपले वडील घरात बसून असतात. आई लोकांच्या शेतात कामाला जाते. कष्ट करते. कांदा भाकर खाऊन क्षुधा शमवते हे त्याचे कळत्या वयातलं निरीक्षण. आपल्या पूर्वजांचं आजवरचं कर्तृत्व आणि समोर दिसणारं वास्तव यातनं निर्माण होणाऱ्या कुतूहलातून साहजिकच आपला वंश कोणता? वंशज कोणकोण? कुठून आले? कर्तृत्व काय? अशा अनेक प्रश्न आणि उपप्रश्नांतून आपल्या वंशाचा, वंशजांचा मागोवा घेता घेता तो सर्वदूर पसरलेल्या मराठा समाजाचा, तत्कालीन सामाजिक व्यवस्था आणि संस्कृतीच्या सातशे वर्षे मागे जात असता त्याच्या असं लक्षात येतं की, आधीच्या पिढीतले आपले वंशज, त्यांच्या अवतीभोवतीचे लोक, सभोवतालच्या जनजीवनाचं स्वरूप आणि आदिम प्रेरणा, परंपरेच्या साच्यातल्या, संघर्षमय तर आहेच, समाज आणि कुटुंबव्यवस्था पुरुषप्रधान आहे. स्त्रियांकडे भोग्यवस्तू म्हणून पाहणारी आहे. आपल्या पूर्वजांबद्दलचं झालेलं ज्ञान हे या शोधाचं संचित हा शोध घेताना वाटा-वळणांतून, प्रत्येक कालखंडातल्या वृत्ती आणि प्रवृत्तीतून निर्माण झालेल्या संबंधातून, संबधाच्या ताणतणावातून, त्या काळातलं लोकजीवन, रूढी, परंपरातून, अनेक माणसं, प्रसंग, घटना, त्याच्या जाणिवेच्या पातळीवरच्या तत्कालीन तसेच नेणिवेच्या पातळीवर जाणवणाऱ्या दीर्घकालीन तर्कांच्या व परिणामांच्या प्रवाहात वाचकही लेखकाबरोबर त्याच गतीने सरकत जाणं हा एक विलक्षण अनुभव कादंबरीतून मिळतो.

आपल्याला लेखनकला अवगत आहे हे लक्षात आल्यामुळे देवनाथने मराठीतला महत्त्वाचा लेखक हे स्थान मिळवलं आहे, तो या कादंबरीचा लेखक, नायकही आहे. मी कोण? हे त्याच्या ठायी असणारं कुतूहल कुटुंबाचा, वंशाचा शोध घेण्याची प्रेरणा आहे. हा लेखक व्यक्तिगत अनुभवांपलीकडे वर्तमान सामाजिक वास्तव व्यापक पद्धतीने आवाक्यात घेतो, तो स्वतः मराठा समाजाचा असल्यामुळे आपल्या वंशाचा शोध घेता घेता महाराष्ट्रभर

पसरलेल्या मराठा समाजाचा आणि त्या निमित्ताने समाजाची कुटुंबव्यवस्था, नातेसंबंध, लग्नादि विविध कार्ये, कुळाचार, गावकी व भावकी, त्यातले परस्पर व्यवहार, मर्दुमकी, पराक्रम, शौर्य, रांगडेपण, आदिमवृत्ती हे इतकं ओघाने येतं की, शोधाच्या निमित्ताने संस्कृती आणि परंपरेचे अनेक पापुद्रे उलगडत जातात. अर्थात सातशे वर्षांपूर्वीच्या कालखंडाचा विचार करता हा काळ आधुनिक-पूर्व असा काळ आहे. गाव, खेडे, वाडे, छोटी छोटी गावं आणि विखुरलेली वस्ती, निरक्षरता, अडाणीपणा आणि गावपातळीवर, पाटील, देशमुख, सुभेदार, कुलकर्णी आदि लोक म्हणजे स्थानिक पातळीवर गावाचा चेहरा.

इ.स. १२८९ मध्ये अल्लाउद्दीन खिलजीने पैठणवर स्वारी केल्याच्या कालखंडापासून जवळपास इ. स. २००० अशा जवळपास सातशे-आठशे वर्षांच्या प्रदीर्घ अवकाशात श्रीपती, दसरत, जानराव, रखमाजी, पिराजी, शंभूराव आणि देवनाथ अशा त्या त्या कालखंडातल्या सात व्यक्तिरेखा तसेच अल्लाउद्दीन खिलजीच्या पैठणवरील स्वारीपासून निजामशाही, आदिलशाही, पेशवाई, ईस्ट इंडिया कंपनीपासून इंग्रजांची राजवट, पहिलं जागतिक महायुद्ध, आणि पुढे स्वातंत्र्योत्तर काळ अशा भव्य कॅनव्हासवर ही कादंबरी घडत जाते. अर्थातच त्या त्या काळातले अनेक सामाजिक, राजकीय, कौटुंबिक बदल, असंख्य घटना, आघात, वंशविस्तार आणि कुटुंबातली स्थलांतरं यातून कादंबरी आणि कादंबरीतला काळ प्रवाही होत राहतो. व्यक्तीव्यक्तींमधील नातेसंबंध, त्यातून आलेले ताणतणाव आणि त्यांचं एकमेकांशी असलेलं नातं जे केवळ रक्ताचं राहत नाही तर कादंबरीतल्या काळाशी जोडलं जाणं हा एक चक्रावून टाकणारा गुंता आहे. म्हणूनच कादंबरी केवळ टाईमपास म्हणून न राहता वाचकाच्या मनातही त्यातल्या घटनांचा, संबधांचा अर्थ नव्याने समांतरपणे शोध सुरू होतो. जीपीएस काय दाखवेल इतकं सुस्पष्ट त्रिमितीय भौगोलिक लोकेशन इतर ऐतिहासिक तपशीलासह केवळ शब्दांतून लेखक वाचकाच्या डोळ्यांसमोर उभं करतो. गंमत म्हणजे या कादंबरीत बलुतेदारीच्या पार्श्वभूमीवर मराठा जातीचा कुलवृत्तांत सांगताना जातसंघर्ष नाही, जातश्रेष्ठत्व नाही. उलट लेखक तत्कालीन मराठी माणसाच्या जगण्याची बहुपदरी रचना, प्रचलित जनरीत, मूल्यव्यवस्था, श्रमसंस्कृती, युद्धशास्त्र आणि लढाया, शेती, गावगाडा, कृषिसंस्कृती असं सगळं फिरवून एखाद्या कसलेल्या गवय्यासारखं वाचकाला परत समेवर, मूळ कथानकाकडे खेचून आणतो.

देवनाथ या कादंबरीच्या केंद्रस्थानी असला तरी तत्पूर्वी क्रमाक्रमाने श्रीपती, साहेबराव, दसरत, जानराव, पिराजी, शंभुराव मग शंभूनाथ येतात. हा काळ अनुक्रमाने राजा रामदेवराव आणि पैठणवरील अल्लाउद्दीन खिलजीची स्वारी, निजामशाही व आदिलशाही, पेशवाई, ईस्ट इंडिया कंपनीची / ब्रिटिशांचा काळ, पहिलं जागतिक महायुद्ध आणि शेवटी अर्थातच १९५० नंतरचा स्वातंत्र्याचा काळ. या प्रत्येक काळात असंख्य घटना, नात्यांची गुंतागुंत चक्रावून टाकणारी असली तरी हा गुंता सोडवत सोडवत लेखक वाचकांनाही बांधून ठेवतो, कधी कधी अनुषंगिक इतिहास व त्याच्या तपशीलवार माहितीमधून, तर कधी त्या अनुषंगाने असलेल्या तत्त्वज्ञानाच्या पातळीवर गुंतवून ठेवतो. श्रीपती मेंढपाळ. मेंढ्या चरताना मेणा थांबतो. मेण्यातल्या बाईच्या बाळाला तो मेंढीचं दूध देतो ते पाजल्यावर बाळ दुखण्यातून बरा होतो. या प्रसंगातून श्रीपतीच्या आयुष्यात बदल होतात, मानकऱ्याच्या शरीररक्षणाची जबाबदारी येणं, मानकऱ्याच्या कुटुंबाला वांभोरीला मोठ्या जबाबदारीने नेणं, तेथल्या वास्तव्यात अठरापगड जातीच्या लोकांशी संबंध येणं या काळातले ऐतिहासिक सदर्भ आणि सामाजिक वास्तवाची लेखक भाषिक अंगाने गुंफण करतो. याच वांभोरी गावातल्या पाटलांच्या दहा-अकरा वर्षांच्या मुलीला पठाणांनी उचलून नेणं आणि याच अठरापगड जातीच्या मुलांनी तिला सोडवून आणणं आणि पाटीलकी या सात घराण्यांत आळीपाळीने वाटून देणं, साहेबरावाचा सायबू होणं, बेहरामखानाला मारणं, त्यांच्या बायकोच्या आर्यानाच्या प्रेमात पडणं, आर्यानाचं आरेना होणं आणि तिचा मुलगा आरेनचं आरेनराव साहेबराव पाटील होणं. साहेबरावाचं आदिलशाहीतल्या पुण्यात स्थलांतर करणं, खराडीच्या बंजर मुलुखात गाव वसवणं, देशमुखीची सनद मिळवणं, शिवराम पाटलाशी मैत्री, त्यांनी विठ्ठल रखुमाईची मूर्ती देणं आणि आरेनाबरोबर अफगाणिस्तानात जाताना ती मूर्ती घेऊन जाणं ह्या घटनांच्या गुंतागुंतीतच रानवा आणि

पारूबाईचा मुलगा दसरतच्या आयुष्याचा कालखंड सुरू होतो. पानिपतचं युद्ध याच काळातलं. दसरत पठाणासारखा गोरापान, उंच एका अनपेक्षित घटनेने त्याला परागंदा व्हावं लागतं. मजल दरमजल करत, अंधारात, जंगलात, उपाशीतापाशी राहत तो पळ काढतो. तुळसाबाईमुळे शुद्धीवर येतो, दत्ताजी पाटलाच्या भटारखान्यात लाकूड तोडण्याचं काम, वाघाच्या तोंडात हात घालण्याचा पराक्रम करणं आणि दत्ताजींच्या खाजगी सेवेत पोहचणं, पानिपतच्या युद्धात भाग घेणं, गिलच्यांनी कैद करणं, युद्धात मारलेल्या झोरावरच्या जागी झोरावर बनून अफगाणात जाणं, त्याच्या पत्नीने आफियाने त्याचा झोरावर म्हणून स्वीकार करणं, तिच्याकडे आपण पठाण नाही मराठा आहोत अशी कबुली देणं आणि सगळ्यात कळस म्हणजे तिच्या घरात दिसलेली विठ्ठल-रखुमाईची मूर्ती. मग आफियाला घेऊन परतीचा प्रवास, आपल्या गावी करंजेला येऊन राहणं हा विलक्षण रोमहर्षक दसरतचा प्रवास आहेच, आफिया आफूबाई म्हणून मराठा कुळातली होते आणि तुळसाबाई दसरतचं आई होणं म्हणजे मराठा होणं आहे.

जानराव चौथ्या पिढीतला सातपाटील, दसरत पाटीलचा नातू, उत्तर पेशवाई कालखंडातला, कुस्तीची आवड असलेला. जानराव बाजीरावाची खाजगीत नेमणूक. पिराला नवस करून सरूबाईला मुलगा झाला म्हणून त्याचे नाव पिराजी. जानरावाची मुलं जनावरांच्या गोठ्यात त्याची सोय करतात आणि तेथेच जानराव ठार वेडा होतो. एकाकी, विपन्नावस्थेतच त्याचा अंत होतो. रखमाजीचा धाकटा भाऊ पिराजी. रखमाजी व समिंदरा पाटील यांचे कुटुंब साल्पी या गावी स्थिरावते, तो काळ ईस्ट इंडिया कंपनीच्या राजवटीचा. पिराजी रंगाने गोरा, उंच, पठाणासारखा, बेदरकार, स्वतंत्र, न जुमानणारा. आबाराम कोल्हाट्याची देखणी मुलगी उल्फी हिला पळवून गावाबाहेर कोपी बांधून राहतो, दरोडे घालून धन कमावतो. गावात त्याचा चांगलाच दरारा असतो, पण कुणीतरी केलेल्या विषप्रयोगाने तो मरतो. त्याचा संशय उल्फीवर येऊ नये म्हणून मरता मरता तो तिला, पोटच्या पोरासकट पळून जायला सांगतो. ती जीवाच्या आकांताने पळते, गोऱ्या साहेबाकडे काम करणारी राणूबाई तिला आसरा देते. गोरा साहेब उल्फीवर भाळतो, तिच्या प्रेमात पडतो, लग्न करून इंग्लंडला घेऊन जातोच; पण पिराजीपासून झालेल्या मुलाचा जालिंदरचा मुलगा म्हणून स्वीकारही करतो.

सातपाटील कुळाचा पुढचा वंशज शंभुरावचा काळ पहिल्या जागतिक महायुद्धाच्या आसपासचा. शंभूराव-तुळजाबाईला पाच मुलगे आणि दोन मुली. शंभूरावचा एक मुलगा युद्धात सैनिक म्हणून भरती होतो, तो आफ्रिकेत लढतो, तर माणकोजी इटलीमध्ये लढतो. मुंबईत आल्यावर माणकोजी ड्रायव्हरची नोकरी करतो, शेलजीच्या बरोबरीने अर्ध्या ट्रकचा मालक होतो. शंभूरावाचं आयुष्य आपला व मुलांचा संसार सांभाळण्यात जातं. बायकोच्या मृत्यूनंतर तो निरिच्छ होत जातो आणि बैलाची मान फासळीस लागण्याचं निमित्त होतं, तो वेगळ्या भाषेत बोलू लागतो, त्याचा अंतकाळ जवळ आलेला असतो व त्यातच तो जातो.

माणकोजीचा मुलगा देवनाथ सातपाटील घराण्याचा सातवा प्रतिनिधी, तो शिकलेला आहे, आधुनिक विचारांचा आहे, संवेदनशील, विवेकी आहे. तो या कादंबरीचा लेखक आणि निवेदक आहे. इंग्लंडमध्ये सेमिनारच्या दरम्यानच्या वास्तव्यात त्याला अनेक धक्के बसतात. ब्रिटीश मानववंश शास्त्रज्ञ रिचर्ड लेसिंग सातपाटील आडनावावरून त्याला घरी बोलावतो. गप्पांच्या ओघात त्याला रिचर्ड लेसिंगकडून कळतं की, त्याची खापरपणजी भीमाबाई नावाची भारतीय, मऱ्हाटा होती, सातारा जवळच्या करंजे गावची. त्याचा खापर पणजा स्टुअर्ट लेसिंक होता. दोघेही एकमेकांच्या प्रेमात पडले आणि भीमाबाई त्याच्याबरोबर पळून आली. हे सारं देवनाथला अचंबित करणारं होतं. भीमाबाईने छोटेखानी आत्मवृत्तही लिहिलं होतं, ते त्याला वाचायला मिळालं. दसरत पाटील हा तिचा बाप होता. देवनाथचा खापर पणजोबा जानरावाची आणि तिची अहमदनगरला भेट झालेली होती. दुसरा धक्का केंब्रिजला अंतोनी बलाकसिमित (ब्लॅकस्मिथ) या गोऱ्या साहेबाची भेट, निमंत्रणावरून त्यांच्या घरी गेल्यावर देवनाथला साहेबाची बायको मऱ्हाठी असल्याचं कळतं. प्रत्यक्ष भेटीत ती पिराजी सातपाटील यांची कोल्हाटीण बायको उल्फी असल्याचं कळतं. ती त्याला आपल्या जगण्याचा प्रवास उलगडून दाखवते, पिराजीच्या मृत्यूबद्दल सविस्तर सांगते.

देवनाथचा पणजा रखमाजी आणि अंतोनीचा खापरपणजा पिराजी हे सख्खे भाऊ. पिराजीच्या मृत्यूनंतर त्याची कोल्हाटी जातीतील बाई उल्फी ही पळून गेली, तरुण कलेक्टर ॲथनी तिच्या प्रेमात पडला. ॲथनीनं तिचा मुलगा जालनला आपला मुलगा मानला. तोच ॲथनीचा वंशपुरुष. ॲथनीकडून उल्फीने आत्मवृत्त लिहून घेतलं होतं, त्याची प्रत देवनाथला मिळाली. भीमाबाईच्या लिखाणावरून गुहेची दारं किलकिली झाली तर, उल्फीच्या आत्मकथनातून कोल्हाटी असणाऱ्या उल्फीचं पिराजी आणि ॲथनीच्या संदर्भातलं तरल पुरुषभान जाणवत राहतं.

या सगळ्या घटनांतून लेखक देवनाथची शोधवृत्ती अधिकच तीव्र होते. तो साल्पी, करंजे, खगडी अशा सातपाटलांशी संबंधित गावांत जाऊन माहिती गोळा करतो, ॲथनीलाही उल्फीच्या जीवनावर कादंबरी लिहायची असते. तो मुंबईला येतो, जामखेड, बीड, गेवराईतल्या कोल्हाट्यांच्या वस्तीला भेट देतो. देवनाथला वांभोरीत सातपाटीलांच्या वंशाचा उलगडा होत जातो. कादंबरीच्या सुरुवातीलाच आलेला त्र्यंबकेश्वरच्या धार्मिक विधींचा उल्लेख विषयप्रवेश या अर्थाने सूचक आहे. तसाच तो शोधाच्या सर्वांगीण धांडोळ्याचा एक भाग आहे. कुलवृत्तांत एक निमित्त आहे; पण लेखकाने हा जो पट मांडलेला आहे तो नानाविध माणसांनी, घटनांनी, वृत्ती-प्रवृत्तींनी गजबजलेला एक मोठा कॅनव्हास आहे. एकाच वेळी लहान-मोठ्या, स्त्री असो वा पुरुष प्रत्येक व्यक्तिरेखेची मानसिकता लेखक रेखाटतो. एका स्त्रीचीच किती रूपे आलेली आहेत; आई, बायको, बहीण, सवत, रखेल. मात्र या प्रत्येक भूमिकेतली स्त्री, मग ती तुळजाबाई असो, उल्फी असो यांच्याकडे प्रासंगिक उपजत शहाणपण आहे. कादंबरीतलं सामाजिक भान कुणबी समाजाच्या संरचनेत आहे. बलुतेदारी, सोयरीक आदिंबरोबरच नातेसंबंधात रममाण होण्याची वृत्ती, राहणीमान, एकत्र कुटुंब पद्धत, रांगडेपणा, बेदरकारपणा, श्रेय घेण्याची धडपड आणि सर्वांत महत्त्वाचं म्हणजे तीव्र आत्मभान यातून वाढणारे कलह दृश्य होतं. याशिवाय इतिहासातील घटना, लढायांच्या निमित्ताने भौगोलिकता, लूटालूट, अराजकसदृश स्थिती, निजामशाही, पेशवाई, पानिपतची लढाई, मराठ्यांचा दारुण पराभव, पळापळ, जागतिक महायुद्ध, या घटनांबरोबरच मऱ्हाटीपण आणि मऱ्हाटी भाषा, सिंधू संस्कृती, लिपी, मराठी भाषेची व्युत्पत्ती, इरावती कर्वे, राजारामशास्त्री भागवत यांच्या विविध संदर्भांनी सातपाटील कादंबरी वाचकाला समृद्ध करत जाते.

काळी आजी आणि आफु आजी या खरं तर सवती; पण त्यांच एकमेकींबद्दल असणारं नातं हे दोन संस्कृतींतलं तर आहेच, माणसामाणसातलं आहे, महत्त्वाचं म्हणजे दोन स्त्रियांमधलं शाश्वत नातं आहे. इतिहास नेहमी जेत्यांचा असतो, जयाचा असतो. सातपाटील कादंबरीत आलेला इतिहास रणांगणात लढणाऱ्या सामान्य सैनिकाच्या जगण्याचा, त्यांच्या आव्हानांचा आहे. तिथलं वास्तव, नामुष्की, धास्ती, भय आदि सर्व प्रसंग रोमांच आणणारे आहेत, तर दुसऱ्या बाजूला त्याच्या मागे त्याच्या कुटुंबाच्या जगण्याच्या विलक्षण तऱ्हा आहेत. सातपाटील कादंबरीत लेखक कथानकाच्या ओघात अनेक तपशील सांगतो, उदा. लेखक हा मुळातच प्रगतीशील असतो आणि तशी भूमिका घेतल्याशिवाय त्याच्या लिखाणाला मोठेपणा येत नाही या मुन्शी प्रेमचंद यांच्या १९६३ सालच्या भाषणाचा संदर्भ, वैश्विक तत्त्वज्ञान सांगणारी निरीक्षणं मांडतो, गुंतागुतीच्या परिस्थितीत, संवदेनशील होऊन भाष्य करतो. समाजातलं आणि जातीतलं अज्ञान, दंभ, अहंकार, कुळाचा अभिमान, अंतर्गत कलह यांवर लेखकाच भाष्य सडेतोड आहे. जातीयतेतल्या अमानवी प्रथापरंपरा आणि वृत्ती यांवर कादंबरीत थेट बोट ठेवलं गेलंय. आपल्या अज्ञानातून जो अहंकार व दंभ आपण मिरवतो त्यामुळे आपलं नैसर्गिक जगणंही आपण असहाय्य करून टाकतो. आपल्या आडनावापुढे पाटीलकी दर्शक विशेषणं, देशमुखी हे सारं आत्मविश्वास गमावल्याच्या खुणा आहेत. हा केवळ कुणबी समाजातला कलह नाही तर एकूणच मराठी समाजातला वर्गकलह आहे हे दूरान्वयाने वाचकास जाणवत राहतं. कादंबरी प्रथमपुरुषी आहे. यातला नायक हा लेखक आहे. आजच्या जगाचं, काळाचं भान असल्यामुळे तो आधुनिक विचारसरणीचा, मानवतेच्या अंगाने विचार करणारा, उदारमतवादी आहे. जागतिक परिप्रेक्ष्यात आपण व आपला समाज, संस्कृती याचं तुलनात्मक भान त्याच्यापाशी आहे. आपल्याकडे 'मान सांगावा जनात आणि अपमान सांगावा मनात' अशा



अनुक्रमणिका

पूर्व संस्कारामुळे जीवनातले नामुष्कीचे प्रसंग समोर येत नाही. कादंबरीत उल्फीसारख्या स्त्रिया पळवून आणल्याचा पराक्रम जसा आहे. त्याचबरोबर पठाणाने पळवून नेलेल्या आपल्या मुलीचंही कथानक आहे, आंतरजातीय विवाहाचे भूतकालीन संदर्भ आहेत. युद्धातील सैनिक, कैदी यांच्या युद्धानंतरच्या लैंगिकतेविषयीचं चित्रण आहे, स्त्रियांचं एकाच वेळी अनेकांशी शरीरधर्म निभावणं आहे. थोडक्यात मुक्त लैंगिकतेचा समाजातला पुरस्कार दाखवते, महाभारतकालातही तेच दिसून आलेलं होतं. याठिकाणी संस्कृतीतली बहुविधताच लेखकाला अपेक्षित आहे.

सातपाटील कुलवृत्तांत एका अर्थाने मराठा समाजाची जीवनशैली सांगते हे खरं असलं तरी दुसऱ्या बाजूला विशिष्ट भूप्रदेशाच्या अंगाअंगाने जगणाऱ्या, घडणाऱ्या, वृद्धिंगत होणाऱ्या मराठी समाजाच्या, संस्कृतीचा, जीवनशैलीचा धांडोळा घेतलेला आपणास पाहावयास मिळतो. सात शतकांचा काळ खूप मोठा स्पॅन आहे. अनेक राजकीय-सामाजिक बदल प्रत्येक कालखंडात झाले, अठरापगड जाती, वंश, त्यांचे कौटुंबिक समूह, स्थळकाळाचे एकमेकांना दिलेले छेद हे प्रत्येक कालखंडात आणि कालखंडाशी एकरूप झालेय. निवेदनाची किंवा संदर्भासाठीची प्रमाणभाषा सोडल्यास कादंबरीतली बाया-माणसं आपुलकीची भाषा बोलतात. त्यांचा राग-अनुराग, शृंगार, आवेग सारं त्यांचं वाटतं, या मातीतलं वाटतं, इंग्लंड असो वा अफगाण मऱ्हाटी मातीतलं सौंदर्य उठून दिसतं. भाषेबरोबर कादंबरीचा आत्मा म्हणून जर काही दाखवायचं असेल, तर मराठी माती आणि मराठी संस्कृतीशी अतूट नातं असलेल्या विठ्ठल रखुमाईच्या मूर्तीचं अस्तित्व आणि कादबरीतला शतकांचा प्रवास. विठ्ठल-रखुमाईची मूर्ती जसं एक सांस्कृतिक संचित आहे त्याचप्रमाणे ते एक प्रतीक आहे शोषणाविरुद्ध पाय रोवून विटेवर उभ्या असलेल्या दैवताचं. मराठा समाज आणि मराठी संस्कृतीच्या मानसिकतेचं, सोशिकतेचं प्रतीक म्हणजे विठ्ठल रखुमाई आहे असं वाटून जातं. सातपाटील कुलवृत्तांत वादातीतपणे पूर्णांशाने देशीव परंपरेतील कादंबरी आहे, असं म्हटलं तर वावगं ठरू नये. देशीपणाबद्दल भालचंद्र नेमाडे सर टीकास्वयंवरमध्ये म्हणतात, की देशीपणा भावना, जाणिवा, विचार, प्रबोधन आणि स्मृती यांच्या पुंज्याला आवाहन करतो, जो विशिष्ट भूप्रदेशाच्या साह्याने वाढत आलेला असतो, मागच्या पुढच्या सबंध समूहगणाचा प्रतिसाद असतो; सबंध समूहाच्या वंशाची ती जीवनशैली असते; समाजाची सामूहिक चिंतनशक्ती, भावशक्ती प्रकट होत असते. हा सगळा विचार थिअरीचा भाग असला तरी वाचक म्हणून, यातल्या समूहाचा एक भाग म्हणून कादंबरी पूर्णपणे आपल्या देशीपणाचा एक भाग वाटते.

भाषा विज्ञानाचा खोल विचार यापूर्वी श्रीधर व्यंकटेश केतकर, इरावती कर्वे आदिंनी मांडला होता. हाच विचार पुढे नेत महार लोकांची भूमी म्हणजे महाराष्ट्र अशी महाराष्ट्र व मऱ्हाटी शब्दाची उकल लेखक कादंबरीत करतो. कुलवृत्तांताच्या अंगाने पाहिल्यास मराठा समाजाची कहाणी कौटुंबिक पातळीवर न राहता एक विश्वरूप धारण करते म्हणूनच सात पिढ्यांत वावरणाऱ्या प्रत्येकाचं वागणं माणसाचं क्षुद्रत्व दाखवून देतो. आपल्या श्रमसंस्कृतीचं आणि त्यातल्या उदात्त मूल्यांचं दर्शन हा आपला सांस्कृतिक वारसा कादंबरीत सांगितलेला आहे. संस्कृती ही एकल अंगाने वाढत नाही किंबहुना एकल वाढ ही या संस्कृतीत वाढणाऱ्यांची आणि जगणाऱ्यांची वृत्तीही नाही त्यामुळे वंशसंकर भाषा, धर्म, प्रांत यांना ओलांडून अटळ आहे, असं सूचित करताना आपला मूळ पुरुष अफगाण पठाण होता आणि अर्थातच मुसलमान होता यात धारिष्ट्य आहे, प्रामाणिकताही आहे; पण यात मानवी संस्कृतीचं वैश्विक सूत्र लेखक सूचित करत आहे. जगण्याचा दंभ जळण्याचं, मानवी संबंधातल्या गुंतागुंतीतही टिकून राहण्याचं भान येतं आणि वैश्विक पातळीवर मानवाच्या क्षुद्रत्वाचं भान झिरपत जातं.

❖❖

**राजीव जोशी**
दूरध्वनी : ९५९४०७४४५३
ई-मेल : josrajiv@gmail com



अनुक्रमणिका



संजय कळमकर यांच्या
'एका स्वर्गस्थ देशाच्या गोष्टी'
या विनोदी कादंबरीचे परीक्षण :

# 'एका स्वर्गस्थ देशाच्या गोष्टी' ची उद्बोधक गोष्ट



प्रा. डॉ. सुधाकर शेलार

आजवरच्या मराठी कादंबरीविश्वाने लालित्याच्या अनेकांगांना आपल्या कवेत घेतले आहे. काल्पनिकता, अद्भुतता, अलौकिकता, चमत्कृती, विविध प्रकारचे सामाजिक वास्तव, मानवी जगण्यातील विविध समस्या, इतिहास, वर्तमान अशा मानवी जीवनाच्या विविधांगांचे चित्रण करीत त्यावर लालित्याची पुटे चढवित मराठी कादंबरीचा प्रवास आजही चालू आहे. तिच्या या प्रवासात वेळोवेळी अनेक नवनवीन प्रयोगांची भर पडली आहे. त्यांपैकीच एक प्रयोग म्हणजे युटोपिया. काल्पनिक विश्व उभे करून वास्तवविश्वातील त्रुटींवर उपरोधिकतेने भाष्य करीत, त्या उपरोधिकतेतून आदर्शव्यवस्थेचे सूचन करणे असे काहीसे या युटोपियात्मक रचनेचे प्रयोजन असते. निसर्गनिर्मित आणि मानवनिर्मित अशा दोन्ही विश्वांच्या वाटचालीस आज हजारो वर्षे उलटून गेली आहेत. या वाटचालीत या विश्वांमध्ये विकासाबरोबर अनेक विकृती उत्पन्न झाल्या आहेत. या विकृतींना सुधारण्यासाठी अनेकांनी अनेक पातळीवर प्रयत्न केले आहेत. काही ललितलेखकांनी यासाठी 'युटोपिया' चा आधार घेत सामाजिक अपवृत्तींमध्ये सुधारणा सुचविल्या आहेत.

मानवाने आपल्या बुद्धीच्या व भाषेच्या आधारे निसर्गाला सामोरे जाताना एका बाजूला सामाजिक आणि दुसऱ्या बाजूला नैतिक विश्व उभे केले. निसर्गाला सामोरे जाताना कधीतरी 'देव' संकल्पना उदयाला आली व त्यानंतर मानवी विश्वाप्रमाणेच देवांचेही एक विश्व उभे राहिले. ही सगळी माणसाचीच निर्मिती होती; मात्र कालौघात या निर्मितीला अपौरुषेयत्व प्राप्त झाले. 'मानवाने निर्माण केलेल्या देवसृष्टीने मानवसृष्टी जन्माला घातली' असा या रचनेचा उलटा प्रवास माणसाच्या मनीमानसी पक्का रुजला. या मानवसृष्टीचा आणि देवसृष्टीचा संबंध मग अनेक कथांमधून पुराणांमधून-महाकाव्यांमधून रेखाटला गेला. पुरोहितशाहीने या संबंधांचा फायदा घेत देवसृष्टीची (स्वर्ग आणि नरक) भीती मनुष्याभोवती उभी केली. हजारो वर्षांच्या वाटचालीत माणसाला ही रचना वास्तव वाटू लागली. पुढे युरोपमध्ये सोळाव्या शतकात रेनेसान्स उदयाला आल्यानंतर आणि भारतात एकोणिसाव्या शतकात प्रबोधनयुग अवतरल्यानंतर या रचनेमागील खरे वास्तव माणसाच्या लक्षात आले. हे सगळे विश्व काल्पनिक

आहे आणि मानवी समाजाच्या धर्तीवरच देवसृष्टीची रचना केली गेली आहे हे लक्षात आल्यानंतर अनेक समाजसुधारकांनी या रचनेतील बेगडीपणा आपल्या वैचारिक लेखनातून उघड केला; तर अनेक लेखकांनी ललितसाहित्यातून या दोन सृष्टींच्या (मानव आणि देव) संबंधातील फोलपणा उघड करायचा प्रयत्न केला. श्री. कृ. कोल्हटकर, चिं.वि. जोशी यांनी मानसपुत्रांची निर्मिती करून धार्मिक-सामाजिक घटना-घडामोडींचा व त्यातील मूर्ख वर्तनपरंपरांचा उपरोधिक समाचार घेतला. दीनमित्रकार मुकुंदराव पाटलानीही १९१०-११ मध्ये आपल्या दीनमित्र साप्ताहिकातून 'देवाची परिषद' भरवून देवांच्या आणि पुरोहितांच्या विकृत वर्तनावर प्रकाश टाकला; तर १९५२-५४ दरम्यान 'देशभक्त लीलासार' हे खंडकाव्य लिहून स्वातंत्र्योत्तर ढोंगी देशभक्तांच्या लीळा कथन केल्या आहेत. यातील दुसऱ्या अध्यायात लीलेचे स्थळ इंद्र दरबार असून, देवदेवता आणि इंद्र ही कथा महात्मा गांधींना उपरोधिकपणे सांगत असल्याची कल्पना वापरली आहे. १९५६ मध्ये वि.वा. शिरवाडकरांनी 'कल्पनेच्या तीरावर' ही युटोपियात्मक कादंबरी लिहिली. यात त्यांनी नव्या आदर्श समाजाचे स्वप्न रंगवताना नवी समाजमूल्ये सुचवली आहेत. वास्तवात काय आहे यापेक्षा काय असायला हवे याचे चित्रण केले आहे. त्यानंतरही अनेक कथा-कादंबऱ्यांमधून, नाटकांमधून, प्रहसनांमधून या देव-मानव सृष्टींचे विडंबनात्मक चित्रण आले आहे. त्याच परंपरेला पुढे नेताना संजय कळमकर यांनी 'एका स्वर्गस्थ देशाची गोष्ट' लिहून सध्याच्या वास्तवात काय आहे यावर भाष्य करताना काय असायला हवे याचे सूचन केले आहे.

संजय कळमकर हे मुळात विनोदी लेखक म्हणून महाराष्ट्राला परिचित आहेत. मानवी वर्तनातील विसंगतीशोधक नजर त्यांनी यावेळी देवलोकाकडे वळती केली आहे; आणि भारतातील मनुष्यलोक आणि देवलोक यांच्यातील देव -मानव संबंधांच्या चित्रणाचा माध्यम म्हणून उपयोग करत मानवाच्या आणि देवांच्या वर्तनातील अनेक वृत्ती-प्रवृत्तींवर भाष्य केले आहे. कादंबरीची मध्यवर्ती कल्पना द. ता. भोसले यांनी मलपृष्ठावर नेमक्या शब्दांत शब्दबद्ध केली आहे, 'वैज्ञानिक प्रगती साधलेला मानव यानाद्वारे स्वर्गात प्रवेश करेल अशी भीती देवांना वाटते. मानवजातीचे सर्वेक्षण करण्यासाठी देव, वेष बदलून पृथ्वीवर येतात. तेव्हा त्यांना सर्वच क्षेत्रात राजकारण हवेप्रमाणे शिरलेले दिसते. राजकारण्यांचे जनहित, समाजहित, राष्ट्रहिताकडे दुर्लक्ष असल्याचे त्यांना जाणवते. अशीच परिस्थिती स्वर्गातही असल्याने चार देव एकत्र येऊन देवेंद्राच्या सिंहासनाला आव्हान देतात. स्वर्गात भारताप्रमाणे निवडणुका होतात. या माध्यमातून लेखकाने भारतीय लोकशाहीच्या अंतरंगाचे भयावह रूप रंजकतेआडून ढळढळीतपणे समोर आणले आहे. राजकारण्यांना अस्वस्थतेचा शाप असतो. देवेंद्रांनाही आपले सिंहासन जाण्याची भीती वाटते. त्यासाठी ते नरकातील मानवांची मदत घेतात.' आणि मग देवेंद्रही भारतीय राजकारणी निवडणुकीत करतात; त्या प्रकारचे सगळे उद्योग करीत निवडून येतात. स्वर्ग आणि नरक यांनी मिळून बनवलेल्या एकंदर देवलोकाचा कारभार चालतो कसा; आणि तिथे लोकशाहीप्रणीत निवडणुकांनी प्रवेश केल्यानंतर काय काय घडू शकते याचा एक 'युटोपिया' म्हणजे ही कादंबरी.

या कादंबरीला शुभेच्छा देताना ॲड. उज्ज्वल निकम म्हणतात, ''डॉ. संजय कळमकर यांच्या 'एका स्वर्गस्थ देशाची गोष्ट' या कादंबरीइतके प्रभावी राजकीय प्रहसन माझ्या वाचनात आले नव्हते. ही कादंबरी कल्पनारम्यतेने शिगोशिग भरलेली आहे; परंतु ही कल्पनारम्यता वास्तवतेच्या पायावर उभी आहे. लेखकाला सध्याच्या सामाजिक, राजकीय दुरवस्थेवर तळमळीने व्यक्त व्हायचे आहे. त्यासाठी त्यानी निवडलेला कादंबरीचा फॉर्म मात्र विलक्षण आहे. थेट देवांच्या नजरेतून आपला देश कसा आहे हे लेखकाने अत्यंत मिश्किलपणे सांगितले आहे. अर्थात त्या मिश्किलपणात गांभीर्य व आशय दडल्याचे मला पानोपानी जाणवले. हसता हसता ही कादंबरी खूप काही सांगून जाते. अंतर्मुख करते. तरी या कादंबरीचे वर्गीकरण कशात करावे त्याचे आकलन मला होत नाही. विनोदी म्हणावे, तर यात गांभीर्य आहे. आध्यात्मिक म्हणावे, तर यात विज्ञान आहे. विज्ञान कादंबरी म्हणावे, तर यात अनेक ठिकाणी तत्त्वज्ञान आलेले दिसते.'' निकम म्हणतात त्याप्रमाणे खरोखरच या कादंबरीत लेखकाने उपरोध-उपहासाबरोबरच मूल्यात्मकता, नीतिमत्ता, मानवाच्या जीवनदृष्टिकोन, मानवी आणि दैवी नैतिकता

आणि न-नैतिकता या संदर्भात खूपच मूलगामी अशा स्वरूपाचे भाष्य केले आहे. कादंबरीत येणारे घटना -प्रसंग फक्त कादंबरीचे कथानक प्रवाही करण्यासाठी येत नाहीत; तर प्रत्येक प्रसंगातून समकालीन सामाजिक, राजकीय परिस्थितीवर भाष्य येते. या भाष्यातून समाजासाठी आवश्यक असणारी मूल्ये, मानवी जीवनाच्या संवर्धनासाठी आवश्यक असणाऱ्या तत्त्वप्रणालींचा उल्लेख येत जातो. हा उल्लेख सरळ सरळ येत नाही, तर या मानवी वर्तनांचे आयाम लेखक रेखाटत जातो; त्या आयामांच्या निरीक्षणातून वाचकाला हा तत्त्वबोध आपातत: होत जातो.

देवसृष्टीच्या आणि मानवसृष्टीच्या व्यवहारवर्तनात कालौघात खूप फरक पडत गेला असणार याचा अचूक अंदाज पकडून, त्या अंदाजबीजावर आधारित अशा अनेक घटनांची निर्मिती कळमकरांनी केली आहे. मानवाने देवसृष्टीची जेव्हा केव्हा निर्मिती केली असेल तेव्हा त्याची जी समज असेल त्या समजेनुसार ती केलेली असणार हे नक्की. पुढे या निर्मितीला स्थायीरूप लाभणे स्वाभाविक होते. दुसरीकडे मानव मात्र विज्ञानाच्या जोरावर वर्तनव्यवहारात आमूलाग्र बदलला. या बदलांची भणक देवसृष्टीला अधूनमधून कशी लागते आणि मग देवसृष्टी कशी अचंबित होते याचे अनेक दाखले लेखक रंगवत जातो आणि वाचक हसत राहतो. त्यात साध्या चहा नामक रंजक द्रव्यापासून ते मोबाईलमधील व्हॉट्सअपपर्यंत अनेक गोष्टींचा अंतर्भाव दिसून येतो. या बहुतांश गोष्टी देवसृष्टीतून वारंवार पृथ्वीवर येणाऱ्या गणपतींच्या माध्यमातून देवसृष्टीला माहीत होत जातात. पृथ्वीवरील मानवनिर्मित ही विचित्रपुरी पाहण्याचा मोह मग खुद्द इंद्राणीलाही आवरता येत नाही; तर मोबाईलमधील अॅप शिकण्याचा मोह देवेंद्रालाही आवरत नाही. इंद्राणी गणेशाबरोबर पृथ्वीदर्शनासाठी येते आणि मग गणेशोत्सवातले सगळे उद्योग समोर येतात. इंद्राणी म्हणते, ''येथे खरे भक्त कमी आणि त्यांच्या भोळेपणाचा फायदा घेऊन लबाडी करणारे जीव अधिक आहेत. आम्ही दोन दिवस अनेक देवालये पाहिली. मूठभर लोकांनी 'देवांना' गाभाऱ्यात बंदिस्त करून ठेवले आहे. सामान्य भोळ्या भक्तांना दिवसदिवस दर्शनासाठी रांगेत तिष्ठावे लागते. विशिष्ट लोकांना खास दाराने दर्शन देऊन देवालये विषमतेला स्थान देतात. आपल्या नावावर तिजोरीत

**माणसाची स्वर्गात जाण्याची-सदेह जाण्याची व तिथे जाऊन स्वर्गावर राज्य करण्याची इच्छा हा एक जुनाच 'युटोपिया' आहे; पण संजय कळमकरांनी त्याला लोकशाही आणि निवडणुकीच्या माध्यमातून नवा आयाम मिळवून दिला आहे. यासाठी त्यांनी पुराणांचा आणि एकूणच देवसंबंधांचा आधी बारकाईने अभ्यास केलेला दिसून येतो. कथानकाची रचना करताना त्यांनी एका कथेच्या स्पष्टीकरणासाठी दुसरी कथा, एका कथेचा संदर्भ दुसऱ्या कथेशी जोडत उत्तम रचनातंत्राचा वापर केलेला दिसून येतो.**

अमाप चलन जमा होते. यात शुद्ध भावनेने कमावलेले चलन अल्प असते. या धनाचा उपयोग गरीब व सामान्य भक्तांसाठी केला जात नाही. खेरीज आम्ही गुप्तपणे काही गोष्टी पाहिल्या त्या भयकारी आहेत. तेथे आपल्या नावाने धन जमा केले जाते. काही आश्रमात भोळ्या भक्तांचे, विशेषत: स्त्रियांचे शोषण केले जाते. या प्रदेशात देवाचा उपयोग भक्तीसाठी कमी आणि सुखेनैव जगण्यासाठी जास्त केला जातो. आमच्या नावाने गरिबांना आश्रयस्थाने, भोजनावळी दिल्या जातात हे सत्य असले तरी, आमचे भय दाखवून त्यांच्यातील भक्तीचा फायदाही उचलला जातो.'' या आणि अशा अनेक उद्विग्न करणाऱ्या अनुभवांना सामोरे जात इंद्राणी एकाच दिवसात पुन्हा स्वर्गाकडे प्रयाण करते. अशा प्रकारे स्वर्गातून भूतलावर आलेल्या अनेक देव -देवतांच्या तोंडून आणि भूतलावरून देवलोकांत गेलेल्या मानवांच्या तोंडून समकालीन माणसांच्या बिघडत चाललेल्या स्थितीगतीवर व वृत्तीप्रवृत्तींवर कादंबरीत भाष्य करताना लेखक अनेक प्रकारची निरीक्षणे नोंदवत जातो. यात जाणवणाऱ्या विसंगतीतून वाचक हसता हसता आपोआपच अंतर्मुख होत जातो.

मानवी आक्रमणाच्या भीतीपोटी मानवी प्रगतीचा अभ्यास करण्यासाठी देवेंद्र एक अभ्यासगट पृथ्वीवर पाठवतात. हा अभ्यासगट महाविद्यालये, हॉस्पिटल्स, भागवत सप्ताह, मठ अशा ठिकाणांना भेट देतो. या गटातील सदस्य रोज रात्री एकत्र येऊन आपल्याला आलेल्या



अनुक्रमणिका

अनुभवांची देवाणघेवाण करतात. माणसांबद्दलची निरीक्षणे नोंदवतात व त्यावर भाष्यही करतात. खरे तर ही लेखकाचीच भाष्ये आहेत. या भाष्यांमधून लेखकाचे समाजचिंतन आणि समाजाप्रति असलेली आस्था जाणवते. लेखकाचे हे समाजचिंतन कधी कधी तत्त्वचिंतनाच्या पातळीवर जाऊन पोचते. या अभ्यासगटातील एक सदस्य पराशर म्हणतात, "आम्ही निरीक्षण केले, तर मनुष्याचे जगणे पाच प्रकारांत विभागले गेले आहे. काही मोजकी माणसे अतिश्रीमंत आहेत. ते स्वर्गात राहिल्याप्रमाणे जीवन व्यतीत करतात. त्यातील अपवादात्मक मंडळी आपल्या अफाट संपत्तीचा उपयोग समाजासाठी करतात. दुसरा वर्ग श्रीमंत लोकांचा आहे. त्यात परिश्रम, कौशल्य, प्रतिभा वापरून श्रीमंत झालेल्या मनुष्याविषयी कुणाला असूया किंवा तक्रार असण्याचे कारण नाही. उलट त्यांचे कौतुक करायला हवे. किंतु यातील बहुतांश माणसे लबाडीने, अनीतीने, भ्रष्टमार्ग अनुसरून श्रीमंत झाली आहेत. मानवी जीवनात विषमता याच ऐदी व भ्रष्ट वर्गामुळे निर्माण झाली आहे. गरीब व सामान्य माणसांचा हक्क असलेली संपत्ती ते येनकेन प्रकारे लुबाडतात. या वर्गातील मोजक्या लोकांना सामाजिक भान आहे. बाकीचे पैशांनी मिळणारी सुखे ओरबाडून सुखेनैव जगण्यात मग्न आहेत. तिसरा वर्ग उच्च मध्यमवर्गीयांचा आहे. ही माणसे श्रीमंत नसतात; पण श्रीमंत असल्याप्रमाणे राहतात. नवनवीन सुविधा मिळवून जगण्यात त्यांचे बरेचसे आयुष्य खर्ची पडते. यातून ते समाधान हिरावून बसतात. चौथा वर्ग मध्यमवर्गीयांचा आहे. लहानमोठे उद्योग व चाकरी करून हा वर्ग सुखी राहण्याचा प्रयत्न करतो. उपजीविकेसाठी त्यांना अनेकदा स्वातंत्र्य व स्वाभिमान गहाण ठेवावा लागतो. हप्त्यावर कुठल्याही भौतिक सुविधा मिळवण्याची त्यांची तयारी असते. हा वर्ग समाजाशी जास्त निगडित असल्याने सदैव भानावर असतो. पाचवा वर्ग गरीब मानवांचा आहे. भौतिक सुविधा तर दूर, रोजच्या उदरभरणासाठी त्यांना खस्ता खाव्या लागतात, नको ती कामे करावी लागतात. इतर वर्गातील कुणाला स्वतःची, पक्षाची प्रगती करून घ्यायची असेल तर, या गरीब वर्गाचा कच्चा माल म्हणून उपयोग करून घेतला जातो. 'गरिबांना मदत केली पाहिजे, गरिबी हटाव' म्हणत अनेक माणसे मोठी होतात. मात्र गरिबी तशीच राहते." अशा प्रकारे देवांच्या नजरेतून मानवी समाजाविषयी लेखक निरीक्षण नोंदवताना दिसतो. ही निरीक्षणे बऱ्याच अंशी स्वाभाविक वाटतात. मात्र आरक्षण आणि समान नागरी कायदा अशा काही विषयांच्या आकलनासंदर्भात लेखकाची गडबड झालेलीही दिसून येते.

अभ्यासगटातील सर्वांनाच सर्व ठिकाणी मानवाचे टोकाचे स्वार्थी वर्तन आणि भ्रष्टाचार आढळून येतो. हा अभ्यासगट शेवटी जेव्हा राजकारणाचा अभ्यास करतो तेव्हा त्यांच्यावरच इथल्या राजकारणाचा प्रभाव पडतो. परिणामी अभ्यासगटातच फूट पडते; आणि प्रभास, पिप्पलय, रतीदेव आणि सगरदेव वेगळी वाट धरतात. स्वर्गात गेल्यानंतर तिथेही पृथ्वीवरील लोकशाहीप्रमाणे 'देवशाही' असावी असा आग्रह धरतात. त्यांचा हा आग्रह महादेव मान्य करतात आणि देवसृष्टीत 'निवडणुकी' ला प्रारंभ होतो. भारतीय निवडणुकीचे प्रतिबिंब जसेच्या तसे या निवडणुकीत उमटते. निवडणुकीतल्या सगळ्या कुलंगड्या सांगताना लेखक इथे भारतीय लोकशाहीवर टीकात्मक भाष्य करीत जातो. जे दहा लोक देवेंद्राला निवडून येण्यासाठी मदत करतात ते 'आम्हा दहा मानवांना, तुमच्या स्वर्गाच्या मंत्रिमंडळात दहा जागा राखीव ठेवा.' अशी मागणी करतात. देवेंद्रही ती मागणी मान्य करतात; पण माणसांवर कडी करण्याचा प्रयत्न करताना त्या दहा जणांना सोडून प्रतिनिधी घेण्याचे कबूल करतात; पण माणसे देवेंद्रालाही धोबीपछाड देतात आणि आपल्या जागेवर आपल्या मुलांना सदेह स्वर्गात बोलावून घेतात. चिमणराव कुजबुजत सहकाऱ्यांना म्हणतात, "उद्या माझा मुलगा ! परवा अजून कुणाचा...! अशी माणसे सदेह स्वर्गात येत राहतील. हळूहळू आमचा संपूर्ण देश स्वर्गस्थ होईल. तो दिवस लवकरच उजाडेल, की मानव स्वर्गावर राज्य करील. मग प्रभासदेवा, आपलं ठरल्याप्रमाणे तुमची इच्छाही पूर्ण होईल. स्वर्गाचा पंतप्रधान होण्याची!" आणि अशा प्रकारे आपला सगळा देशच स्वर्गस्थ करण्याची शक्कल भारतातील हे राजकारणी कशी लढवतात याची कथा इथे सफल संपूर्ण होते.

माणसाची स्वर्गात जाण्याची-सदेह जाण्याची व तिथे जाऊन स्वर्गावर राज्य करण्याची इच्छा हा एक जुनाच 'युटोपिया' आहे; पण संजय कळमकरांनी त्याला

लोकशाही आणि निवडणुकीच्या माध्यमातून नवा आयाम मिळवून दिला आहे. यासाठी त्यांनी पुराणांचा आणि एकूणच देवसंबंधांचा आधी बारकाईने अभ्यास केलेला दिसून येतो. कथानकाची रचना करताना त्यांनी एका कथेच्या स्पष्टीकरणासाठी दुसरी कथा, एका कथेचा संदर्भ दुसऱ्या कथेशी जोडत उत्तम रचनातंत्राचा वापर केलेला दिसून येतो. स्वर्गाच्या सुरक्षेसाठी आणि मानवीसृष्टीचा अंत करावा की न करावा यासाठी देवसंसदेचे भरलेले अधिवेशन, त्यातील देवदेवतांचे वाद-प्रतिवाद, त्यांचे मानवाविषयीचे आकलन, संसदेत झालेला गोंधळ, यमाची सातव्या वेतन आयोगाची मागणी, देवांनी एकमेकांची काढलेली उणीदुणी, हमरीतुमरीवर आलेले देव आणि शेवटी निर्माण झालेला मारामारीचा प्रसंग... अशी रचना करताना भारतीय संसदेच्या अधिवेशनातील सगळ्या घडामोडींचा लेखकाने चपखल वापर करून घेतला आहे. भारतीय समाजाबद्दल जे जे सांगायचे आहे, जे जे तत्त्व प्रतिपादन करायचे आहे ते अगदी समर्पकपणे या त्या पात्राच्या तोंडी बसवले आहे. समकालीन राजकारणावरची टीकाटिप्पणीही यात दिसून येते. ही टिप्पणी उपरोध-उपहासाने भरलेली असल्याने व जाता जाता त्यात कधी कधी वक्रोक्तीही दडली असल्याने गंभीर विधाने विनोदात कधी परावर्तीत होतात ते वाचकांच्या लक्षातही येत नाही. काही ठिकाणी मात्र प्रत्येक प्रसंगी विनोदाची जागा शोधण्याच्या हव्यासापायी विषयांची आणि त्यावर केलेल्या कोट्यांची दाटी झालेली दिसून येते. ती टाळता आली असती. अर्थात असे असले तरी आपल्या शैली वैशिष्ट्यांना साजेशी भाषा कळमकरांनी उपयोजिली असल्याने ही बाब वाचकांच्या आस्वादात कोणताही अडथळा निर्माण करीत नाही. कळमकर कधी कधी सामान्य व्यावहारिक मराठी भाषेपेक्षा अंमल सस्कृतप्रभावित मराठी वापरतात. अर्थात ही भाषा पात्ररचनेनुसार बदलत जाते. दूधवाल्याची भाषा वेगळी, यमाची वेगळी, इतर देवांची वेगळी, देवस्त्रियांची वेगळी, राजकारण्यांची तर त्याहूनही वेगळी, प्रत्येकाला साजेलशी. दूधवाल्याला देवेंद्रासमोर हजर केल्यानंतर देवरक्षकाची भाषा बघा. ''सायकल नामक एका दुचाकीस उभट पात्रे लावून हा भ्रमण करीत होता. आम्ही त्याचा पाठलाग केला. हा एका पानपटरी नामक छोट्याशा थुंकीनिर्मिती केंद्रासमोर जाऊन थांबला. त्या केंद्रासमोर याच्यासारख्या जीवजंतूंची तोबा गर्दी माजली होती. अनेक जण तांबुलमिश्रित एक भुकटी मुखात घालून सभोवार अविरत थुंकीसिंचन करत होते, तर काहीजण तोंडात कसलेसे शुभ्र नळकांडे धरून मुखावाटे मेघाप्रमाणे वायू सोडत होते. अनेकांचे ओठ तर कुणीतरी निर्दयतेने ठेचल्याप्रमाणे मंगळ ग्रहासारखे तांबूस दिसत होते. या मनुष्याने तेथील कागदी चलन देऊन एक आयताकृती तांबूलपुडी पुडी व पृथ्वीच्या आकाराची एक चुनाडब्बी घेऊन पोटाजवळच्या वस्त्रकप्प्यात घातली. त्याक्षणी आम्ही त्यास झडप घालून ताब्यात घेतले.'' तर देवेंद्रासमोर शुद्धीवर आल्यावर सायकलवाला म्हणतो, '' माही सायकल कुठाय...? आरं तिला दुधाची केंडं होती ना बाबांनो.'' अशा भाषिक आविष्कारांमुळे कादंबरीभर विनोदाची पखरण झालेली आढळून येते. मात्र ही कादंबरी केवळ विनोदी प्रहसन नाही, भारतीय लोकशाहीच्या सुधारणेसाठी, निवडणूक प्रक्रियेच्या सुधारणेसाठी व भारतीयांच्या एकूण वर्तनसुधारासंबंधी ती बरेच काही सुचवू पाहते. खरे तर ही कादंबरी म्हणजे दूषित सामाजिक, राजकीय परिस्थितीचा ओनामा आहे. असामाजिक तत्त्वांवर उपरोधिक तऱ्हेने केलेला प्रहार आहे. संजय कळमकरांची 'विनोदी साहित्यिक' ही प्रतिमा जपण्याबरोबरच ही कादंबरी त्यांच्या साहित्यिक प्रतिमेला आणखी विस्तृत आयाम प्राप्त करून देऊ शकेल, असे वाटते.

**एका स्वर्गस्थ देशाची गोष्ट–**
**लेखक : संजय कळमकर,**
**ग्रंथाली प्रकाशन, मुंबई.**
**प्रथमावृत्ती– फेब्रु. २०२०**

❖❖

**प्रा. डॉ. सुधाकर शेलार**
मराठी संशोधन केंद्रप्रमुख, अहमदनगर महाविद्यालय,
अहमदनगर. भ्रमणभाष - ९८९०९१३२३६.
shelarsudhakar@yahoo.com



अनुक्रमणिका

क्रांतिकारकांचे चरित्रकार
विष्णू श्रीधर जोशी यांच्या
कर्तृत्वाबाबत माहिती देणारा
प्रा. डॉ. गणेश राऊत यांचा लेख.

# लेखनातील क्रांतिकार्य

प्रा. डॉ. गणेश राऊत

क्रांतिकारकांची शास्त्रशुद्ध चरित्रे लिहिणे हे काम क्रांतिकार्याएवढेच महत्त्वाचे आहे. हे ज्यांना कळले ते विष्णू श्रीधर जोशी हे इतिहास लेखनातील एक क्रांतिकारकच आहेत. २० ऑगस्ट १९२० रोजी त्यांचा जन्म झाला. या वर्षी २० ऑगस्ट २०२० रोजी या घटनेची शताब्दी पूर्ण होणार म्हणून त्यांचे कृतज्ञ स्मरण करण्यासाठी ही शब्द सुमनांजली.

ठाणे शहरात जन्मलेल्या आणि शालेय शिक्षण तेथेच झालेल्या जोशी यांचे महाविद्यालयीन शिक्षण पुण्यातील सर परशुरामभाऊ पटवर्धन (एस. पी.) महाविद्यालयात झाले. पदवीधर झाल्यावर ते मुंबई महानगरपालिकेत नोकरीस लागले. सुमारे ३६ वर्षे सेवा करून जोशी निवृत्त झाले. जोशी यांना महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने २० मे १९९६ रोजी एक मानपत्र दिले. त्या मानपत्रात मंडळाचे अध्यक्ष विद्याधर गोखले यांनी ज्या भावना व्यक्त केल्या आहेत त्या जोशी यांचे अचूक वर्णन करणाऱ्या आहेत. या मानपत्रात लिहिलेले आहे,

"महाराष्ट्रातल्या देशप्रेमाने रसरसलेल्या धगधगीत राष्ट्रवादी विचारधारेशी समांतर वाटचाल करीत, मौलिक माहितीनं खच्चून भरलेली स्वतंत्र ग्रंथरचना आपण सातत्यानं गेली पन्नास वर्षे केलीत आणि साधार सत्यनिष्ठ चरित्र- लेखनाचा एक आदर्श पाठ घालून दिलात, म्हणून गौरववृत्ती आणि मानपत्र देऊन आपल्याला अभिवादन करताना महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाला आनंद होत आहे. परवशतेच्या शापातून मातृभूमीला मुक्त करण्यासाठी सशस्त्र क्रांतिकारकांनी ब्रिटिश राजवटीत आपल्या रक्ताचा सडा शिंपलेला होता. हे ज्वलंत सत्य तुम्हाला प्रतीत झालं. त्यानंतर अहोरात्र जुनी कागदपत्रं चाळून आपण अस्पृष्ट इतिहास अभ्यासिलात. हाती पुरावे लागल्यानंतर, मूळ साधनांशी इमान राखून आणि परिणामांची काडीमात्र क्षिती न बाळगता तुम्ही सशस्त्र क्रांतिकारकांची साधार चरित्रं लिहिण्याचे व्रत स्वीकारलंत. त्या कार्यापासून तुम्ही कधीही विचलित झाला नाहीत. हे स्पृहणीय आहे. अशा प्रकारची चरित्रं लिहिणाऱ्यांचे तुम्ही अग्रणी आहात."

अशा शब्दांत जोशी यांचा सत्कार शासनाने केला. जोशी यांनी लिहिण्याचा श्रीगणेशा केला वयाच्या विसाव्या वर्षी. विशीतच त्यांनी 'शोभा' नावाची क्रांतिकारकांच्या जीवनाशी निगडीत कादंबरी लिहिली. ब्रिटिश सरकारने या कादंबरीवर ४ एप्रिल १९४० रोजी जप्ती आणली. पुढे जप्ती उठली; परंतु कारकीर्दीची सुरुवात आक्षिप्त वाङ्मयाने झाली. पुढे त्यांनी 'मंगला' आणि 'पहाटेचं चांदणं' ही कादंबरी लिहिली. कादंबरीची मध्यवर्ती कल्पना अर्थातच क्रांतिकारकांचे जीवन हीच

होती.

जोशी यांचा जन्म ज्या कार्यासाठी झाला होता ते कार्य म्हणजे वासुदेव बळवंत फडके यांचे चरित्र लेखन. फडके यांच्या चरित्राचा सर्वांगीण अभ्यास करण्यासाठी जोशी यांनी तत्कालीन वृत्तपत्रे, मुंबई ते एडन सरकार यांच्याशी पत्रव्यवहार, फडके यांच्या आयुष्यातील महत्त्वाची भौगोलिक स्थळे ( उदाहरणार्थ जन्मस्थळ शिरढोण) यांना भेटी दिल्या. दोन वर्षे भरपूर अभ्यास केला. सर्व सिद्धता झाल्यावर ग्रंथ लिहिला. या ग्रंथाला स्वा. सावरकर यांनी 'पुरस्कार' लिहिला. त्यात सावरकर लिहितात... 'मराठी वाङ्मयात वासुदेव बळवंतांचे ह्या चरित्रापेक्षा अधिक मर्मज्ञ, साद्यंत नि साधार असे चरित्र आज उपलब्ध नाही.' यावर अधिक काही लिहिण्याची गरज आहे का?

या ग्रंथाची प्रथमावृत्ती १९४७ मध्ये निघाली. फडके यांच्या संदर्भात हे स्फोटक लिखाण छापण्यासाठी कोणताही प्रकाशक पुढे येत नव्हता म्हणून जोशी यांनी हा चरित्र ग्रंथ स्वखर्चाने प्रसिद्ध केला. या ग्रंथानेच जोशी यांच्या आयुष्याची दिशा निश्चित केली. पत्रव्यवहार करणे, मौखिक इतिहास शब्दबद्ध करणे, आठवणी लिहून काढणे, त्या तपासून घेणे अशा पद्धतीने जोशी यांनी काम केले. संगणक आणि झेरॉक्स मशीन हे स्वप्नातसुद्धा नव्हते. अशा काळात हजारो कागद लिहून काढणे हे किती जिकिरीचे काम असेल याची केवळ कल्पनाच केलेली बरी.

१९५१ मध्ये 'मृत्युंजयाचा आत्मयज्ञ' हा चरित्रग्रंथ जोशी यांनी लिहिला. यात क्रांतिकारकांची सचित्र चरित्रे आहेत. या क्रांतिकारकांची माहिती आणि छायाचित्रे मिळविणे हे अत्यंत जिकिरीचे काम होते. जोशी यांनी कार्यालयीन कामकाज सांभाळून हे काम दोन वर्षांत पूर्ण केले. फडके यांच्या चरित्रापेक्षा हे काम जास्त अवघड होते कारण हे क्रांतिकारक गुप्तकटांचे सूत्रधार होते. क्रांतिकारकांनी प्रसंगी स्वतःची ओळख लपवून, टोपणनावे घेऊन (उदाहरणार्थ सेनापती बापट) काम केलेले होते. हौतात्म्य पत्करलेल्या क्रांतिकारकांच्या व्यक्तिगत आठवणी त्यांच्याबरोबरच नष्ट झाल्या. स्वतःच्या आठवणी लिहून ठेवणारे क्रांतिकारक तर दुर्मिळच कारण असं काही लिहून ठेवणे म्हणजे इंग्रज सरकारला तयार पुरावाच देणे होय. अशा प्रतिकूल



परिस्थितीत जोशी यांनी हे अवघड शिवधनुष्य पेलले. पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर त्यात भर घालता येण्याजोगी नवी माहिती उपलब्ध झाल्यानंतर पुढील आवृत्तीत जोशी यांनी भर घातली. यामुळे या चरित्रग्रंथाच्या आवृत्त्या निघाल्या. या पुस्तकाबद्दल अभिप्राय देताना आचार्य अत्रे यांनी लिहिले आहे- भारतीय क्रांतीची ही महन्मंगल पोथी प्रत्येक स्वातंत्र्य भक्ताने आपल्या देवघरात ठेवावी आणि आपल्या मुला-बाळांसमोर तिचे पठण करून दाखवित जावे एवढी तिची योग्यता आहे. म्हणूनच या ग्रंथाचे नाव 'मृत्युंजयाचा आत्मयज्ञ' यथार्थ आहे.

१९७३ मध्ये 'कंठस्नान आणि बलिदान' या ग्रंथातून जोशी यांनी चापेकर बंधू आणि रानडे यांचे चरित्र मांडले. या ग्रंथातून चापेकर आणि रानडे यांच्या कर्तृत्वास योग्य तो न्याय देण्यात आला होता. 'अत्याचारी इंग्रज अधिकाऱ्यांना आणि देशद्रोही स्वबांधवांनाही कट करून मारण्याच्या आणि पवित्र भगवद्गीता हाती घेऊन धैर्याने फाशी जाण्याच्या हिंदुस्थानातल्या क्रांतिकारकांच्या परंपरेचे दामोदर हरि चापेकर हे जनक होते.' अशा शब्दांत जोशी यांनी चरित्रनायकांना न्याय दिला. याची योग्य ती दखल दुर्गा भागवत यांनी १९७५ च्या कऱ्हाडच्या अधिवेशनात घेतली. आपल्या अध्यक्षीय भाषणात भागवत यांनी ग्रंथाचे कौतुक केले.

१९७८ मध्ये भगतसिंग, राजगुरू आणि चंद्रशेखर आझाद यांच्या जीवनावरील 'वडवानल' हा ग्रंथ लिहून पूर्ण केला. १९८५ मध्ये स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या क्रांती

**जोशी यांचा जन्म ज्या कार्यासाठी झाला होता ते कार्य म्हणजे वासुदेव बळवंत फडके यांचे चरित्र लेखन. फडके यांच्या चरित्राचा सर्वांगीण अभ्यास करण्यासाठी जोशी यांनी तत्कालीन वृत्तपत्रे, मुंबई ते एडन सरकार यांच्याशी पत्रव्यवहार, फडके यांच्या आयुष्यातील महत्त्वाची भौगोलिक स्थळे ( उदाहरणार्थ जन्मस्थळ शिरढोण) यांना भेटी दिल्या. दोन वर्षे भरपूर अभ्यास केला. सर्व सिद्धता झाल्यावर ग्रंथ लिहिला. या ग्रंथाला स्वा. सावरकर यांनी 'पुरस्कार' लिहिला. त्यात सावरकर लिहितात... ''मराठी वाङ्मयात वासुदेव बळवंतांचे ह्या चरित्रापेक्षा अधिक मर्मज्ञ, साद्यंत नि साधार असे चरित्र आज उपलब्ध नाही.'' यावर अधिक काही लिहिण्याची गरज आहे का?**

जीवनावरील 'क्रांतिकल्लोळ' हा ग्रंथ पूर्ण केला. शामजी कृष्ण वर्मा, मादाम कामा, सरदार राणा, विरेन्द्रनाथ चटोपाध्याय, सरदार अजित सिंग, लाला हरदयाळ, डॉ. खानखोजे, रासबिहारी बोस, राजा महेंद्रप्रताप आणि चंपकरमण पिल्ले यांना न्याय देण्यासाठी 'अग्निपथावरील परागंदा' हा ग्रंथ जोशी यांनी सिद्ध केला. ग्वाल्हेर आणि कोल्हापूर येथील क्रांतिकारकांच्या जीवनावर आधारित 'वणवा हिंद देशीचा' हा ग्रंथ जोशी यांनी तयार केला. सरदार उधमसिंग, मदनलाल धिंग्रा, विष्णू गणेश पिंगळे यांच्या जीवनावर आधारित 'प्रलयातील पिंपळ पाने' हा ग्रंथ जोशी यांनी लिहिला.

झाशीच्या राणीचे चरित्र लिहून झाल्यावर लेखक ज्यांना तीन-चार वेळा भेटला होता अशा नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्या जीवनावर आधारित 'शृंखला खळखळा तुटल्या' हा ग्रंथ वाचकांच्या भेटीस आला. किशोरवयीन मुलांना क्रांतिकारकांच्या जीवनातून प्रेरणा घेता यावी म्हणून 'क्रांतिकारकांच्या २०२ साहसकथा' त्यांनी लिहिल्या. झुंज सावरकरांची, 'अखेर उजाडलं पण देश रक्तबंबाळ' हे दोन ग्रंथ सावरकरांच्या जीवनावर जीवनावर आधारित तर, अभिनव भारत आणि हुतात्मा कान्हेरे यांची माहिती देणारा 'ज्वालामुखीचे अग्निनृत्य', वासुदेव बळवंत फडके आणि बहादूरशाह जफर यांच्या जीवनावर आधारित 'पूर्णाहुती आणि वाताहत' तर इंग्लिशमध्ये 'द फर्स्ट इंडियन रिबेल अगेन्स्ट ब्रिटिश वासुदेव बळवंत फडके' हा ग्रंथ त्यांनी लिहिला. यासाठी त्यांना ४ मानाचे पुरस्कार मिळाले.

प्रासंगिक लिखाणामध्ये त्यांनी 'अमृतबझार पत्रिका', 'भारतज्योती', 'किर्लोस्कर', 'केसरी', 'मराठा', 'नवशक्ती', 'नवा काळ' इत्यादी वृत्तपत्रांमधून लेखन केले. लेखाच्या सुरुवातीलाच मी जोशी यांना क्रांतिकारक म्हटले आहे. जोशी यांच्या पत्नी सौ. लीलाताई या पूर्वाश्रमीच्या मराठे घराण्यातील होत. जोशी यांचे सासरे श्री. त्रिंबक गंगाधर मराठे हे पेण येथे शिक्षक होते. त्यांनी बॉम्ब तयार करण्याची कला अवगत केली होती. स्वातंत्र्यवीर सावरकरांनी पाठविलेली ब्राउनिंग पिस्तुले मराठे यांनी पेणच्या जंगलात पुरून ठेवली होती. नाशिक कटाच्या खटल्यात मराठे यांना सावरकरांच्या बरोबरीने १० वर्षांची शिक्षा झाली होती. ही शिक्षा त्यांनी १९११ ते १९२१ या काळात हैद्राबाद (सिंध) येथे भोगली. अशा क्रांतिकारकांचे जावई होण्याचे भाग्य जोशी याना लाभले. चंद्रशेखर आझाद यांची स्मृती जपण्यासाठी जोशी यांनी आपल्या मुलाचे नाव चंद्रशेखर ठेवले.

असा हा क्रांतिकारक लेखन झंझावात २५ एप्रिल २००१ रोजी थांबला. त्यांच्याकडील लेख, कात्रणे, छायाचित्रे, अप्रकाशित कागदपत्रे याचा ठेवा श्री. चंद्रशेखर जोशी यांनी स्वातंत्र्यवीर सावरकर राष्ट्रीय स्मारक (मुंबई) यांना दिला. अभ्यासकासाठी तो उपलब्ध आहे. पुराव्याशिवाय लेखन न करणाऱ्या जोशी यांचा वारसा पुढे नेणाऱ्या ताज्या दमाच्या अभ्यासकांची कागदपत्रे वाट पाहत आहेत.

❖❖

**डॉ. गणेश राऊत**
उपप्राचार्य, इतिहास विभाग प्रमुख, एच. व्ही. देसाई महाविद्यालय, पुणे-२. चलभाष :- ८४५९७७२०१८
ई-मेल gdrauthistory@gmail.com

ज्येष्ठ लेखिका प्रतिभा रानडे यांच्या 'स्मरणवेळा' या लेखसंग्रहाचे परीक्षण करणारा लेख.

# बाईपणाचा ताळेबंद : स्मरणवेळा

डॉ. संजय नगरकर




गजातुनी मी पाहत बसले
आकाशाचे सुनीळ मार्दव
पाताळातुनी सरसर आली
अंधाराची मुसळे भीषण

इंदिरा संतांच्या या काव्यपंक्ती वाचता-वाचता वाचक म्हणून आपण गुंतत जातो कवयित्रीच्या मनात उठलेल्या एकाकीपणाच्या कल्लोळात. सांजवेळा भरून काढणाऱ्या आठवणींच्या गहिऱ्या गाभाऱ्यात. तसेच काहीसे स्वरूप असते ललित गद्याचे, ज्यासच वि.शं. चौगुले यांनी मुक्तगद्य असे संबोधले आहे. तर आनंद यादव त्यास इंग्रजीत 'फॉर्मलेस फॉर्म' अशी संज्ञा असल्याचे नोंदवितात. भावकवितेशी नाते सांगणारा, आत्मसंवादी स्वरूपाचा, तर कधी स्मरणकोशातील अनुभवांवर भाष्य करणारा असा हा वाङ्मयप्रकार अनेक लेखक-लेखिकांनी समृद्ध केला. निबंध, वैचारिक निबंध, लघुनिबंध असा प्रवास करीत करीत नंतर तो 'ललितगद्य' या नावाने स्थिरावला, त्याचा मूळ प्रेरक माँन्तेन हा लेखक मानला जातो. त्याचे स्वरूप काहीसे 'कोलाज' सारखेच आहे. 'स्मरणवेळा' या लेखसंग्रहाचे अवलोकन करताना त्याचा प्रत्यय येतो. लेखिका प्रतिभा रानडे त्यासंदर्भात म्हणतात, 'दैनंदिन कष्टप्रद आयुष्य जगताना हवा असतो चित्त स्वस्थ करणारा अवकाश. जगून झालेल्या आयुष्यातील स्मरणवेळा हा अवकाश देत असतात. त्याच अवकाशात नितळपणे दिसू लागतात इतिहासचित्र..... हे सारं मनाच्या ओंजळीत अलगद पकडून लिहिलं जातं स्मृतिवृत्त. ते वाचायचं पुन:पुन्हा आल्हाददायक भविष्यासाठी...'

**प्रतिभा रानडे संक्षिप्त परिचय:**

स्त्री लेखिका म्हणून लेखन करणाऱ्या प्रतिभा रानडे यांचा आस्थाविषय 'स्त्रीत्वाचा शोध आणि बोध' हाच आहे. स्त्रीवादी साहित्याच्या क्षेत्रातील एक आश्वासक











